# जयसिंगराव नाटक.



हें

पुस्तक

भास्कर बल्लाळ निमकर

यांनीं

गणपत कृष्णाजीचे छापखान्याचे मालक आत्माराम कान्होबा
यांजकडे छापविलें.

मुंबई.

सन १८८९

# प्रस्तावना.

काल्पनिक किंवा खरोखर घडलेल्या गोष्टी लिहून व रंगभूमीवर प्रयोग रूपानें प्रत्यक्ष करून दाखवून त्यांतील तात्पर्य वाचक अथवा प्रेक्षक यांच्या मनांत बिंबवून द्यावें या करितांच नाटकांची योजना केलेली असावी. नायक नायकादि मुख्य व उपपात्रें यांनीं आपापलीं जीं काहीं बरीं वाईट कामें करून आपले हेतू सिद्धीस नेले असतील त्यांतील बऱ्याचे परिणाम कसे चांगले झाले व वाईटाचे कसे वाईट झाले यांचें हुबे हुब चित्र उठवून दिलें पाहिजे. आतां हें चित्र बराबर उठवून देण्यासाठीं त्यांत शृंगार, वीर, करुणादिरसांचा यथावकाशें व यथायोग्य समावेश केला पाहिजे. वर दर्शविलेल्या गोष्टी मनांत ठेऊन जयसिंगराव नाटक लिहून प्रियवाचकांस सादर केलें आहे. आतां या नाटकांत अवश्य असे गुण किती आहेत व ते कितपत उतरले आहेत हें पाहण्यासाठींच कां होईना ? परंतु प्रिय वाचकांनीं तें समग्र अवलोकन केलें असतां ग्रंथकर्ता आपल्या अल्प श्रमाचें साफल्य झालें असें समजेल.

या नाटकांतील संविधानकांत अप्रयोजक, असंभवनीय, अमानुषीय व स्त्रीपुरुषादी लहान मोठ्यांस अश्लाघ्य अशा गोष्टी जितक्या न येतील तितक्या न आणण्याचा प्रयत्न केला आहे. कोणत्याही इंग्रजी, मराठी किंवा संस्कृत ग्रंथाच्या आधारानें हें नाटक रचिलेलें नसून केवळ स्वकपोल कल्पित आहे.

ज्या मुदतींत हें पुस्तक छापून प्रसिद्ध करावें असें योजिलें होतें, त्या मुदतींत तें कित्येक विशेष कारणांनीं तयार झालें नाहीं या बद्दल ग्रंथ कर्ता मोठा दिलगीर आहे.

मुंबई तारिख ३०
नवंबर १८८९. } ग्रंथकर्ता.

# जयसिंगराव नाटक.

अंक १ ला.

## प्रवेश १ ला.

**स्थल**—राणीचा महाल.

**पात्रें**—**दौलतराव राजा, राणी, प्रधान, वैद्यराज, सेनापती व गजाऊ** दासी.

**रा**— (**राणी** पलंगावर प्रेतवत् पडली होती तिजकडे पाहून अत्यंत दुःखानें ) **वैद्यराज, राणी**साहेबांस तुह्मीं त्रैलोक्य चिंतामणी नांवाची मात्रा देऊन बराच वेळ झाला. तरी त्यांची अद्याप कोठें हालचाल दिसत नाहींती ?

**वै**—**महाराज**, ही मात्रा देऊन कायती अर्ध घटिकाच झाली आहे. कृपाकरून उदकांतील ही घटिका पहावी ह्मणजे खात्री होईल. अजून अर्ध घटिका गेली पाहिजे. ह्मणजे या मात्रेचा काय विलक्षण चमत्कार आहे, तो महाराजांस दिसून येईल.

**रा**— (फार दुःखी होऊन) **वैद्यराज**, एकेक पळ हें मला युगासमान जात आहे. आणि अर्ध घटिकेचा अवकाश आहे ह्मणून सांगतां. हाय हाय, काय करावें ! बरें, पण मगतरी **राणी** आमच्याशीं, या आमच्या प्रियकर **राजपुत्र** व **राजकन्या**, हे आमचे **प्रधान, सेनापती**, वगैरे मंडळी, यांच्याशीं चार शब्द बोलतीलना !

**वै**—महाराजांपाशीं मीं कधींही अनृत बोलणार नाहीं. या दुखण्यांतून त्या बऱ्या होणें, ह्मणजे त्यांचा केवळ पुनर्जन्मच झाला, असें ह्मटलें पाहिजे. त्या विषयीं मीं खात्रीपूर्वक कांहींच

सांगूं शकत नाहीं. परंतु आतां दिलेल्या मात्रेच्या योगानें, त्यां आज पंधरा दिवस ज्या अगदींच बोलत नाहींत, त्या थोडा वेळ बोलूं लागतील; त्यांना क्षुधा वगैरे तेवढ्या थोड्याच अवकाशांत चांगली लागेल; व त्या जणुं आजारी नव्हत्याच, अशी त्यांची स्थिती होईल.

**राजा**—( गहिंवरयेऊन ) **वैद्यराज**, तुह्मीं ह्मणतां अशी **राणी**साहेबांची प्रकृति पाहतांच, मीं तुमचें दरिद्र हो नाहींसें करीन, व आमच्या पदरच्या सर्व वैद्य मंडळीचें प्रमुखत्व तुह्मांकडे देईन ! मात्र **राणी**साहेबांचा अंतकाल समीप आला असल्यास त्यांच्याहातून दानधर्म व्हावा; सर्व गोष्टींची त्यानीं निरवानिरव करावी; व त्यांच्या मनांत आमच्यापाशीं जें कांहीं बोलावयाचें असेल, तें त्यांनीं बोलावें, हा आमचा हेतु आहे. तेवढा सिद्धीस गेला ह्मणजे झालें.

**वैद्य—माहारज**, सर्वत्रांच्या मनकामना सिद्धीस नेणारे **गजानन**महाराज समर्थ आहेत. ते आपला आशाभंग करणार नाहींत, अशी माझी खात्री आहे.

[ इतक्यांत एक मोठा ब्राह्मणसमुदाय आल्याचें, व तो आपल्या भेटीची अपेक्षा करीत असल्याचें, **प्रधानानें** येऊन सांगितल्यावरून **महाराज** तिकडे गेले, व बरोबर कांहीं ब्राह्मण घेऊन परत आले. नंतर ]

**राजा—भटजी**महाराज, आपण आणिलेलें तीर्थ आणा इकडे ?

**भटजी— महाराज**, हें पहा सुवर्णपात्रांत आहे. तें **राणी**साहेबांस प्राशन करावयास देऊन, त्यांच्या नेत्रांस वारंवार लावावें; ह्मणजे ईशकृपेनें त्यांस गुण पडेल.

[ **राजानें** तीर्थ **राणी**च्या नेत्रांस लावून **राजपुत्राला**

प्रधानजी बरोबर देऊन ब्राह्मणाशीर्वाद घेण्यास पाठविलें. आणि त्यासर्वांस दक्षणा देऊन त्यांची पाठवणी करावयास सांगून आपण तेथेंच बसला. इतक्यांत ]

**वैद्य**—**माहराज**, आपण **राणीसाहेब** किंचित् हाल-ल्या असें पाहिलें काय ?

**राजा**—( अत्यंत आल्हादानें ) काय, काय, काय, काय ह्मणतां ? अहो खरेंचकां ? पण जरा थांबा. मला पाहुंद्या.

**वैद्य**.—**प्रधानजी**, त्या तेथील दोन शाली इकडे द्या. त्या आंगावर घातल्या पाहिजेत.

( नंतर हातापायांस व सर्वांगास कांहीं उष्णोपचार थोडा वेळ केल्यावर एखादें मनुष्य ज्याप्रमाणें झोंपेंतून जागृत होतें, त्याप्रमाणें **राणी**साहेब एकाएकीं उठून बसल्या, व सर्वत्रांकडे एकसारख्या पाहूं लागल्या. तेव्हां )

**राजपुत्र**—**आईसाहेब**, **आईसाहेब**, तुह्मीं किती दिवस हो निजलां होतां? मीं, आपली ताई, आपले महाराज, अशीं आह्मीं सर्व तुह्मांस उठवितां उठवितां अगदीं कंटाळून गेलों. (असें ह्मणून धांवत जाऊन मांडीवर बसला. राजकन्याही असेंच कांहीं बोलत शेजारीं जाऊन बसली. )

**राजा**—( अत्यंत आनंदानें वैद्यास कडकडून भेटून ) वैद्यराज, शाबास, शाबास. धन्य तुमची व तुमच्या विद्येची. शाबास, शाबास. आजचा आनंदाचा दिवस तुमच्या योगानें आला. आह्मांस तर आशा नव्हती. अहाहा! ही केवढी आनंदाची वेळ आहे बरें ! तो पहा चिमुकला राजपुत्र, व ती राजकन्या, आपल्या आईपाशीं कशीं जाऊन बसलीं आहेत तीं !

**वैद्य**—" न मातुः परदैवतं. " हेंच खरें. मुलानां माते सारखें अन्य कोणीही प्रिय नाहीं.

**राजा**–प्रधानजी, असे जवळ या.

**प्रधान**—आज्ञा, **महाराज.** ( असें म्हणून तो व इतर सर्व पलंगानजिक जाऊन उभे राहतात. )

**राणी**–( चांगली शुद्धीवर येऊन व सर्वत्रांकडेपाहून ) **गजाऊ**, चूळभरावयास थोडें पाणी आणग.

**गजाऊ**- ( एकासुवर्णपात्रांत पाणी घेऊन ) जी सरकार, हें घ्या (असें म्हणून राणीच्या पायांपडून) अगोदेवा, लईग्वाड केलंस. (कपाळाच्या दोहों बाजूवर बोटें मोडून) इडा पिडा समदी जावो. **बाईसाब**, हे आपल्या मांडीवर धाकले महाराजकसे बसल्याती बघितलेंका ? आन् या ताईसाबबी हते तुमाजवळ बसल्यातीकी.

**राणी**–(राजा व वैद्यराज यांस नमस्कार करून). महराजांचा जयजयकार असो. **महाराज**, आपण येथें आहां काय ?

**राजा**–होय. आपल्या दुखण्याची अशी स्थिती झाली आहे कीं आज पंधरादिवसांत आपण कोणाशीं एक शब्दही बोललां नाहीं, किंवा कोणाकडे पाहिलेंही नाहीं. आपल्या राजवैद्यानीं तर हात टेकलेहोते. यामुळें आम्हांस आपल्या जगण्याची आशाच राहिली नव्हती. परंतु, केवळ परमेश्वरकृपेनेंच हे वैद्यराज ( बोटानें दाखवून ) एकाएकीं येथें आले, व आपल्यापाशीं असलेली दिव्यमात्रा देऊन, त्यानीं तुम्हांस सावध केलें. यामुळेंच आज हा सुदीन आम्हांस आला आहे.

**प्रधान**–**आईसाहेब** दीर्घायुषी होवोत. **आईसाहेब**, आपली प्रकृति अशी बिघडल्यामुळें, सर्व राज्यांतील प्रजा अगदीं हळहळून गेली आहे. हे नवीन वैद्य आम्हांसर्वांस प्रत्यक्ष परमेश्वराप्रमाणेंच वाटत आहेत. कां, **सेनापती** असेंचना ?

**सेनापती**--**आई** साबास्नीं **आईअंबाबाई** चांगली बरी करो. **आई**साब, आपली अशी अवस्था झाली, न् **म**-

**हाराज** सरकार, आन् धाकटे **महाराज**, अन् **ताईसाब**, यांनीं बघा, अश्शी अन्नच टाकलिया. आतां आपण उठलां, ह्मणून आमा समद्यांसनीं असा आनंद झाला है, कीं जणुं आमची **अंबाबाईच** आमास्नीं भेटली.

**राणी**—**महाराज**, मीं या दुःखण्यांतून वांचेन अशी मला तर आशा नाहींच. यावेळीं ह्मणाल, तर मला कांहींएक होत नाहीं. परंतु आपल्या चरणापाशीं माझी एक विनंति आहे. वचन द्याल तर बोलत्यें.

**राजा**—प्रिये, मला तुझ्या प्राणाहून अधिक प्रिय काय बरें आहे! तुझ्या मनांत जें काय असेल तें बोल. मीं तें सर्व कबूल करण्याचें वचन देतों, हें घे.

**राणी**—( मोठा गहिंवर येऊन, व **राजपुत्र** व **राजकन्या** या उभयतांस प्रेमानें जवळ घेऊन आणि त्यांचें चुंबन घेऊन रडूं लागत्ये व ) **महाराज**, आपण सार्वभौमराजे आहां. आपल्यास कोणत्याही गोष्टीची उणीव नाहीं. आपल्यास माझ्याहूनही अधिक चांगल्या, अशा शेंकडों स्त्रिया मिळतील. परंतु माझ्या पाठीमागें या माझ्या मुलांचें काय होईल, हीच मला मोठी काळजी उत्पन्न झाली आहे. आपण या मुलांचे पिते आहां, तेव्हां मीं आपल्यास सांगावें असें नाहीं. आपण त्यांचें पालनपोषण उत्तमप्रकारें करालच. परंतु माझ्या पाठीमागें आपण विधुरस्थितींत फार दिवस रहाल, असें मला वाटत नाहीं. आणि तसे न राहिलां ह्मणजे या मुलांचे मातेरें झालेंच, असें समजावें.

**राजा**—प्रिये, तूं आज सुमारें एक वर्ष आजारी आहेस. व आतां या दुखण्यांतून उठशील अशी आशाही राहिली नाहीं. माझे पंचही प्राण सर्वस्वी तुजवर असल्यामुळें, तुझ्या पश्चात् माझी काय स्थिती होईल, हें माझें मलाच समजत नाहीं. असो, पण तूं

जें सांगशील त्याप्रमाणें मीं खचित करीन, हें मीं तुला पुनः वचन देऊन सांगतों.

**राणी**--(जमलेल्या मंडळीकडे पाहून) **महाराज**, आपण माझ्या इच्छेप्रमाणें करण्याचें कबूल करून वचनही दिलें आहे. आतां माझी विनंती काय आहे हें सांगण्या पूर्वी आपण प्रथम **जमनाबाईला** बलावून आणा. ह्मणजेमग काय तें मीं सांगेन.

( **जमनाबाई**चें नांव राणीसाहेबांनीं घेतांच, सर्व मंडळी तटस्थ झाली, व एकमेकांकडे पाहूं लागली. त्यांत राजाला तर फारच आश्चर्य वाटलें. )

---

## प्रवेश २ रा.

**स्थल-राणीचा महाल. पात्रें**-राजा, राणी, राजपुत्र व राज्यकन्या, जमनाबाई, प्रधान, सेनापती, वैद्य, व इतर दासदासी.

( राणी तुलशीची पूजा करीत ध्यानस्थ बसली होती ती तुलसी देवीस कर्पुरादी धूपदीप नैवेद्य दाखवून प्रार्थना करीत आहे तों. )

**वैद्य**--राणीसाहेबांचा जयजयकार असो--**आईसाहेब** आपल्या अशा भयंकर प्रकृतीच्या वेळीं आपल्यास जें कांहीं अवश्य कर्तव्य आहे, तें अगोदर करून घ्यावें. कारण आपल्या इच्छेप्रमाणें आपणांस मीं स्नान करूं दिलें, हें बरें नाहीं. पण आतां त्वरा करा, हीच प्रार्थना आहे.

**राणी**--( ध्यानस्थ मूर्ती विसर्जन करून व मंडळीकडे पाहून ) **महाराज, जमनाबाई** आल्या काय ?

**जमनाबाई**--जी **आईसाहेब**, मीं आपल्या चरणाची दासी चरणसेवेस हजर आहें. माझा बहुतेक सर्व जन्म आपल्या अन्नावरच गेलेला आहे. आपल्या दासदासीपैकींच मीं एक. मीं

आपलें सर्व आयुष्य येथेंच घालविलें. परंतु आपल्या दर्शनाचा आजच्याप्रमाणें लाभ आजपर्यंत झाला नव्हता. तो अलभ्य लाभ आज मला झाल्यामुळें मीं आपल्यास मोठी धन्य समजत्यें. मजवर आईसाहेबांची अवकृपा असेल, असें जें मला वाटत होतें, तें सर्व खोटें असून आपण दयासागर आहां, अशी आतां माझी खात्री झाली. आतां या दासीच्या हातून आजपर्यंत जे अपराध झाले असतील, त्यांची मला क्षमा असावी. कारण ते मीं जाणून बुजून केले नाहींत. ( असें ह्मणून मोठ्या गहिंवरानें दुःखित होत्साती राणीच्या चरणीं लागली. )

राणी—हं, हं, **जमनाबाई**, हें काय? मीं का देवी आहें ह्मणून तुह्मीं मला नमन करतां? हं, उठा, व अशा माझ्या जवळ येऊन बसा.

ज—(फारच दुःखी होऊन व रडतरडत) आपण या देशाची राज्ञी. ह्मणूनच आह्मां आपल्या प्रजाजनांस आपण प्रत्यक्ष ईश्वराच्या ठिकाणीं आहां. **आईसाहेब**, मला माझ्या अपराधाबद्दल खरोखरच सांगत्यें, मोठा पश्चात्ताप होत आहे. तर मीं आपल्यास शरण आल्यें आहें. वाटेल ती माझी व्यवस्था करावी.

राणी—( मोठ्या सद्गदित् अंतःकरणानें **जमनाबाईस** उठवून मोठ्या प्रेमानें आलिंगन देऊन व आपल्या सन्निध बसवून ) **जमनाबाई** तुमची माझी आजपर्यंत कधीं भेट झाली होती काय?

ज—नाहीं **आईसाहेब**. कधीं नाहीं.

राणी—बरें, आज तुह्मीं आपण होऊन येथें आलां काय?

ज—(मोठी लज्जायमान झाल्यामुळें थोड्या अवकाशानें, नाहीं **आईसाहेब**.

राणी—तर तुह्मीं येथें कश्या आलां?

**ज.**—( फारच लज्जायमान होऊन ) आपल्या मनांत मजविषयीं यत्किंचित्‌ही राग नाहीं, व ह्मणूनच हा आपण मजवर अनुग्रह केला, हें मला आतां पूर्णपणें समजलें. आपल्या दयालूपणा विषयीं सर्व राज्यभर व जिकडेतिकडे जी कीर्ति आहे, ती उगीच नाहीं. यथायोग्य आहे. याविषयींही माझी आतां पक्की खात्री झाली. **आईसाहेब**, आपणांस खरं सुद्धां वाटणार नाहीं, पण आपल्या सेवेंत मीं आपलें आयुष्य घालविलें असतें तर बरं झालं असतें, असं मला आतां मनापासून वाटत आहे. असो.

**वैद्य**—( सुवर्णपात्रांत कांहीं शक्तिवर्धकऔषध घेऊन ) **आईसाहेब**, एवढें औषध कृपा करून घ्यावें.

**राणी**—( किंचित्‌ थांबल्यासारखें करून ) वैद्यराज, हें काय आहे?

**वैद्य**—बोलण्याचे आपल्यास फार श्रम होत आहेत, ते न व्हावे अशा प्रकारचें हें औषध आहे. तें आपण प्राशन करावें.

**राणी**—फार उत्तम (असें ह्मणून प्राशन करून ) **महाराज**, माझी विनंति आपण मान्य करालना ?

**राजा**—प्राणसखे, हें काय विचारावें ! आजपर्यंत मीं तुझ्या मनाविरुद्ध कधींच वागलों नाहीं. तर मग आज जें तूं सांगशील तें मीं करण्यास मागें सरेन काय ?

**प्रधान**—महाराजांचा जयजयकार होवो. **महाराज**. आईसाहेबांची अत्यवस्थ स्थिती ऐकून, नागरिकलोकांचे थवेच्याथवे राजवाड्यापुढें आईसाहेबांच्या दर्शनास आले आहेत. त्यांच्या राजभक्तीकडे लक्ष देऊन, त्यांची इच्छा पूर्ण करणें महाराजांच्या हातीं आहे. मला आज्ञा होईल, तर गच्चीवर हें हें ह्मणतां बसण्याची उत्तम व्यवस्था करतों.

**राणी**—हे जगदंबे आई, कुलस्वामिणी, माझ्या राजभक्तप्रजेस सुखी ठेव. **महाराज**, आपली आज्ञा असेल, व वैद्यरा-

जांची हरकत नसेल, तर. प्रधानजी, मीं गच्चीवर येण्यास कबूल आहें. मात्र माझ्यानें तेथपर्यंत चालवणार नाहीं.

**ज**—**आईसाहेब**, आपल्याच अन्नानें धष्टपुष्ट झालेल्या या देहाचा दुसरा काय उपयोग ! मीं आपल्यास अगदीं न दुखवितां तेथपर्यंत उचलून नेल्यें.

**राजा**—(मोठ्या आनंदानें) शाबास, **जमना**, शाबास.

## प्रवेश ३ रा.

**स्थल**—राजवाड्यापुढील भव्य व शोभायमान गच्ची.

**पात्रें**—राजा, राणी, प्रधान, जमनाबाई, व प्रजाजन.

( राजवाड्यापुढें जें मोठें जंगी पटांगण होतें, त्यांत मुंगीचाही रिघाव होणार नाहीं इतके प्रजाजन, राणीसाहेबांचें शेवटचें दर्शन घेण्यास जमले होते. त्या सर्वांनीं राणी गच्चीवर आली असें पहातांच, अत्यंत प्रेमानें व नम्रतेनें तिजला नमन करून, एकसारखे गच्चीकडे पहात उभे राहिले. )

( प्रजाजनाची आपल्यावरील भक्ती व प्रेम पाहून राणीला मोठा गहिंवर आला, व तिच्या नेत्रांतून प्रेमाश्रु टप, टप, टप, गळूं लागून तिच्या तोंडावाटे एकही शब्द निघेना. राजा, प्रधान वगैरे मंडळीचीही तीच अवस्था झाली. )

**राणी**—( बराच वेळ गेल्यावर ) **महाराज**, धाकटे महाराज, ताईसाहेब, जमनाबाई, प्रधानजी, सेनापती व वैद्यराज, तुह्मीं सर्व, जरा जवळ या. माझ्यानें मोठ्यानें बोलवत नाहीं. पण **महाराज**, मीं आतां जें बोलेन व जें करीन तें आपण मान्य करालना ?

**रा.**—( एकसारखा रुदन करीत असल्यामुळें त्यांच्यानें स्पष्ट कांहींच बोलवेना. परंतु राणीस फार दुःख झालेलें पाहून

**राणीसाहेब** मीं तुह्मांस पूर्वींच वचन दिलें आहे. व आतांही या सर्वांसमक्ष वचन देऊन सांगतों कीं, तुह्मीं जें सांगाल, तें मीं याचवेळेस तुमच्यासमक्ष करीन. व जें कराल, तें याचवेळेस मान्य करून तदनुसारें व्यवस्था करीन.

**राणी.**—**जमनाबाई**, मीं व तुह्मीं महाराजांस सारख्याच आहोंत. व आपलें उभयतांचें त्यांच्याशीं बहुतेक सारखेंच नातें आहे. यासाठीं आपण एकमेकी बहिणीच आहोंत असें ह्मणण्यास हरकत नाहीं. **जमनाबाई**, माझा अंतकाल तर आतां घटका दोन घटकेच्या आंतच होईल. मला या वेळीं मरण हें लग्नासमान आहे. परंतु—(राजपुत्र व राजकन्या यांच्याकडे बोट करून बोलणार तों तिला दुःखाचा जो हुंदका आला त्यामुळें तिच्यानें पुढें कांहींच बोलवेना. हें पाहून राजा वगैरे सर्व मंडळी रुदन करूं लागली. )

**जम**—( अत्यंत दुःखित होऊन व मोठा गहिंवर येऊन ) **आईसाहेब**, हा माझा देह आपल्या चरणापाशीं ठेविला आहे. याचें लागेल तें करा. आपण जो हुकूम करालतो मला शिरसामान्य आहे.

**रा**—**जमनाबाई**, माझ्या पाठीमागें माझ्याजागीं दुसरी राणी येईलच. व तसें झालें म्हणजे माझा **धाकटा** व **ताई**, यांची काय व्यवस्था होईल हें सांगवत नाहीं, हीच मला मोठी काळजी लागली आहे. तीं सुरक्षित रहातील अशी त्यांची व्यवस्था झाली म्हणजे मला कांहींएक काळजी राहिली नाहीं. ती काळजी दूर करणें तुमच्या हातीं आहे.

**जमना**—काय, **आईसाहेब**, माझ्या हातीं आहे ! ती कशी?

**प्रजाजनांपैकीं एक**—(राजवाड्यापुढील पटांगणांतील उंच दगडीस्तंभावर चढून मोठ्यानें ) **महाराज**, राजा-

धिराज, आईसाहेबांचें शेवटचें दर्शन घेण्यास आम्हीं सर्व आलों, त्याप्रमाणें तें तर आम्हांस मिळालें. परंतु त्या आपल्या अंतकाळीं आम्हांस जी आज्ञा करतील ती आम्हीं मोठ्या कळकळीनें पाळूं. यासाठीं त्या जें सांगतील तें आपण प्रधानजीकडून आम्हां आपल्या आज्ञांकित प्रजाजनांस कळविण्याची आज्ञा व्हावी.

**राणी**—**प्रधानजी**, तिकडे काय गडबड आहे हो ?

**प्रधान**—( प्रजाजनांचा हेतु कळवितो )

**राणी**—ठीक आहे. **प्रधानजी**, त्यांना काय सांगायचें तें मीं आतां सांगत्यें. तें त्यानां सांगा.

**प्रधान**—आज्ञा **आईसाहेब**.

**राणी**—**महाराज सरकार**, माझ्यानें आतां फार बोलवत नाहीं. परंतु आपल्या धाकटे महाराजांची व ताईसाहेबांची मीं आतां शेवटची व कायमची व्यवस्था करणार आहें. तर, आपण मला अभिवचन दिल्याप्रमाणें ती आपल्यास मान्य होऊन त्याचप्रमाणें आपण करालना ?

**राजा**—( अत्यंत दुःखि होऊन स्फुंदत स्फुंदत ) राणीसाहेब, आपल्या मनांत काय बोलावयाचें आहे तें मीं समजलों. मीं आपणांस जें वचन दिलें आहे तें कायम आहे. आपण जें बोलाल व जी व्यवस्था कराल ती आपल्या समक्ष याच वेळीं मीं कायम करून देतों म्हणजे झालें ना ?

**वैद्यराज**—( राणीला फार महत्वाची गोष्ट अद्याप बोलावयाची आहे व ती तर शक्तिहीन होत चालली असें पाहून, सुवर्णपात्रांत कांहीं मादक पदार्थ घालून) **आईसाहेब**, हें औषध घ्यावें ?

(तें प्राशन केल्यावर राणी कांहीं वेळ स्तब्ध राहिली. त्यामुळें

राजा, राजपुत्र, राजकन्या, जमनाबाई, वगैरे सर्व मंडळी घाबरून, कांहीं रुदन करीत, व कांहीं दुःखित, अशीं राणीसमीप येऊन तिजकडे एकसारखीं पहात स्तब्ध उभीं राहिलीं. )

**राणी**—( थोड्या वेळानें सावध होऊन ) **जमनाबाई, ताई, बाळा, महाराज, प्रधानजी** व **वैद्यराज**, तुह्मीं जवळ या.

**जमना—आईसाहेब**, आह्मीं सर्व आपल्या अंगेंदीं सन्निध आहों. काय आज्ञा असेल ती सांगावी. ही आपली दासी सर्व कांहीं करण्यास तयार आहे.

**राणी.**—( फारच दुःखि होऊन व अत्यंत प्रेमानें राजपुत्र व राजकन्या यांस जवळ घेत्ये व त्यांस प्रेमालिंगन देऊन त्यांच्या आंगातोंडावरून हात फिरवून.) **गजाऊ** हीं मुलें जेवलीं कायग?

**राजपुत्र** व **राजकन्या** ( उभयतां एकदम)—आईसाहेब, आह्मीं जेवलों पण तुम्हीं हो कां जेवीत नाहीं. तुम्हीं कधीं हो बरीं होणार? (राजपुत्र) आई, मीं आज तुझ्याजवळ जेवावयास बसेन आं. मीं आमच्या रोजच्या महालांत नाहीं जेवणार बरें.

(हें लाडाचें भाषण ऐकून राणी वगैरे सर्वत्रांस मोठा गहिंवर येऊन तीं रडूं लागतात. )

**राणी.**—( आपण दुसऱ्या जेवणाच्या वेळेपर्यंत कशाची जगतों हें मनांत येऊन काय बोलावें हें सुचेना. परंतु मुलांस धैर्य यावें ह्मणून ) **बाळा, ताई**, आपण आज सर्व **महाराजां**सह एकत्र जेऊं बरें.

**राजपुत्र—आईसाहेब**, हे आपले महाराज, तुह्मीं, या कोण नवीन बाई आहेत त्या, गजाऊ, रामजी, प्रधान आणि दुसरे सर्व, कां बरें रडत आहेत ?

**राणी**—(मोठ्यानें रडत) **बाळा**, तुला काय सांगूं! (असें

ह्मणून अधिकच रडूं लागल्ये ) नंतर, **बाळा, ताई**, तुह्मीं माझी एक गोष्ट ऐकाल ना ?

**राजपुत्र**—काय **आई**, मीं सर्व दिवसभर खेळतों तसा खेळूं नये हेंच ना ? नाहीं खेळणार झालें. तुह्मीं, महाराज व गुरुजी, जसें सांगाल त्याप्रमाणें वागेन ह्मणजे झालेंना.

**राजकन्या—आईसाहेब**, मीं तुमची, **महाराजांची** किंवा दुसऱ्या कोणाची, कधींतरी अवज्ञा केली आहे काय ? **आईसाहेब**, तुह्मीं सांगाल त्याप्रमाणें मीं वागेन.

**राणी**—( फार गहिंवरून ) बाळानों, मीं काय बोलत्यें, तें नीट ऐका, व त्याप्रमाणें वागा बरें. ( प्रधानजीकडे वळून ) प्रधानजी, माझा अंतकाळ घटका, फार तर दोन घटकेंत होईल. यासाठीं मीं आतां जी व्यवस्था करणार आहें, ती चांगली लिहून घ्या. व खालीं प्रजाजन आले आहेत, त्यांस कळवा.

**प्रधान**—आज्ञा **आईसाहेब**

**राणी—जमनाबाई**, मीं बोलत्यें इकडे चांगलें लक्ष्य द्या. मीं जरी राणी आहें, तथापि, मीं व तुह्मीं, या, महाराजांच्या दासीच समजावयाच्या. ह्मणजे आपण उभयतांनीं, ते सांगतील त्याप्रकारची चाकरी करावी, हाच आपला धर्म. व आपण उभयतांनीं ती चाकरी यथाशक्ति बजावलीही. हें पहा, मला संतती काय ती हा राजपुत्र व ही राजकन्या. त्यांचीं लग्न कार्यें होईपर्यंत मीं जगल्यें असत्यें, तर त्यांचे सुख सोहाळे पाहिले तरी असते. परंतु मीं हतभागी, यामुळें तें माझ्या नशिबीं नाहीं. असो—( सद्गदित होऊन, व गहिंवर आल्यामुळें किंचित् स्तब्ध राहून ) **जमनाबाई**, माझ्या पाठीमागें माझ्या मुलांचें मातृवत्

पालन पोषण करणारें कोणीचहो नाहीं! दास, दासीची, किंवा कोणत्याहि वस्तुची ह्मणजे त्यांस कधीं उणीव पडेल असें मुळींच नाहीं. किंवा महाराज, त्यांचें कांहीं कमी पडूं देतील, अथवा त्यांच्यावर माया ममता कमी करतील असेंही नाहीं. परंतु आईशिवाय मुलांचा जन्म व्यर्थ आहे. यासाठीं माझें तुह्मांस हेंच सांगणें आहे कीं, माझ्या मुलानां माझ्या पाठीमागें माझ्या जागीं तुह्मीं सर्व प्रकारें व्हावें.

**जमनाबाई—आईसाहेब**, आपण हें असें काय बोलतां! हें होईल तरी कसें! ह्मणजे, मीं नाकबूल आहें असें नव्हे परंतु.—

**राणी—जमनाबाई**, परंतु काय ? व हें होण्याला अशक्य तें काय आहे ? महाराज सरकार तर, या व्यवस्थेला आपला रुकार देतीलच. मगहो हरकत कशाची. ?

**जमनाबाई—आईसाहेब**, माझ्याकडून कोणतीच हरकत नाहीं. आपण जें सांगाल तें मीं मोठ्या आवडीनें करीन.

**राणी—जमनाबाई**, तुम्हीं कबूल अहां, हें ऐकून माझी अर्धी काळजी दूर झाली, असें मीं समजत्यें. ( नंतर राजाकडे वळून ) **महाराज सरकार**, या मुलांची जी मीं व्यवस्था करीत आहें, ती आपल्यास पसंत आहेना ?

**राजा**—( मोठा दुःखि होऊन ) प्रिये, हीचशी काय ? या राज्यांत जी काय तूं व्यवस्था करशील, ती मला मान्य आहे. यांत तूं कांहींच गैर करीत नाहींस. शिवाय, तूं असें पहा, कीं आजपर्यंत मीं तुझ्या मनाविरुद्ध कधींतरी वागलों आहें काय ? किंवा तुला यत्किंचित्तरी दुःख दिलें आहे काय? याच **जमना** विषयीं तूं कधीं कधीं मला लागून बोलत असस. व थोडीबहुत कुरकुरही करीत असस. परंतु तुझें बोलणें मीं सर्व सहन करीत

गलों. " तूं मला बोलणार कोण " असें कधींतरी बोललों काय? सारांश काय, कीं मीं तुझ्या इच्छेविरुद्ध कधींच वागलों नाहीं; तर मग तूं व्यवस्था करीत आहेस त्या मोठ्या महत्वाच्या व नाजुक कामांत मीं तुझ्या आड येईन, असें तुझ्या मनांत आलें तरी कसें ? असो. प्रधानजी, राणीच्या पश्चात् त्यांच्या इच्छेप्रमाणें **जमना** इजला **राजपुत्र** व **राजकन्या** यांची पालनपोषण करणारी नेमण्यांत आली आहे. तिला योग्य वाटतील ते, व तितके दास दासी ठेवण्याचा अधिकार आहे. त्यांना लागेल तें द्रव्य, व मागतील ती वस्तु तुम्हीं मला न विचारितां देत जावें. अशा अर्थाचा वट हुकूम लिहा. व त्याच्या शेवटीं असेंही लिहा कीं, **जमना** ही 'सदर हुकूम रद्द करा' असें लेखी कळवीपर्यंत तो रद्द होऊं नये. ( राणीकडे वळून ) प्राणप्रीये, आतां तुझ्या इच्छेप्रमाणें झालें काय? किंवा कांहीं राहिलें आहे ?

**राणी**—धन्य धन्य तुमच्या कृपाळुपणाची **महाराज**. माझ्या सर्व इच्छा आपण पूर्ण केल्यात. **महाराज, जमनाबाई** विषयीं मीं आपल्यापाशीं कधीं कधीं कठोर वचनानें बोलत होत्यें, याबद्दल मला आतां मोठा पश्चाताप होत आहे. म्हणून त्याबद्दल मला आपण क्षमा करावी.

**राजा**—प्रिये, त्याबद्दल मला कधींच राग येत नसे, कारण, तिजविषयीं तुझ्या मनांत द्वेष उत्पन्न होणें, हें साहजिक आहे. असो, तुला आणखी कांहीं मागावयाचें आहे काय ?

**राणी**—होय **महाराज**, माझ्या अंतकाळापूर्वीं माझ्या हातून आणखी धर्मादाय व्हावा, व या दासीला, **जमनाबाईला** व या माझ्या उभयतां मुलानां आपण कधींही विसरूं नये, हेंच माझी आपल्या चरणीं शेवटची प्रार्थना आहे. ( गहिंवरून व

:खित होऊन राजाच्या चरणीं मस्तक ठेविते. नंतर) **प्रधान-जी**, तुम्हीं तो हुकूम लिहिला काय?

**प्रधान**—होय, **आईसाहेब.**

**राजा**—आणा तो इकडे. ( त्यावर राजमुद्रांकित मोरतब करून राणीच्या हातांत देतो. )

**राणी**— ( तो घेऊन **जमनाबाईस** देत्ये, व झालेला प्रकार प्रजाजनांस कळविण्याविषयीं प्रधानास हुकुम करत्ये. व तो त्याप्रमाणें करतो.

**प्रजाजन**—— समुदायापैकीं एक, पूर्ववत् स्तंभावर उभा राहून. **महाराज** व **आईसाहेब**, आपण राजपुत्र व राजकन्या, यांच्या विषयीं केलेली व्यवस्था आम्हांस अत्यंत मानवली. **जमनाबाई**सारखी सुज्ञ, शहाणी व दयाळू स्त्री, या आपल्या राज्यांत तर दुसरी मिळणें अशक्य आहे. काय त्यांचें सौजन्य! काय त्यांची लीनता व विनय! केवढें त्यांचें औदार्य व अदबी! त्या आपल्या पदरीं एक मोठें रत्नच आहेत असें आम्हीं समजतों. असो, राजपुत्र व राजकन्या, या उभयतांस त्यांच्या ताब्यांत दिलेली व्यवस्था ऐकून आम्हां सर्वांस अत्यंत आनंद झाला आहे. त्यांस कोणत्याच गोष्टीची उणीव पडणार नाहीं, हें तर खरेंच. परंतु आम्हीं आपली राजनिष्ठ प्रजासुद्धां, त्यांजवर जिवापलीकडे प्रेम ठेवीतजाऊं.

**राणी**—**जमनाबाई**, आज माझ्या जन्माचें सार्थक झालें असें मीं समजत्यें. कारण महाराजांचें मजवर अत्यंत प्रेम असून, माझ्या पश्चात्, माझ्या मुलांची व्यवस्था, माझ्या इच्छेनुरूप त्यांनीं मला करूं दिली; त्याचप्रमाणें तुम्हीं मला माझ्या धाकट्या **यमुना** नांवाच्या बहिणीसारखीच भेटलां असें मला वाटतें. यामुळें माझ्या आनंदास पारावारच नाहीं—(दु:खित होऊन)

**जमनाबाई**, माझी धाकटी बहीण **यमुना** जर आज असती तर मीं माझ्या मुलांस तिच्या स्वाधीन केलें असतें. परंतु काय करावें ! ती गेली. ती कशाची जगली असेल ! माझ्या बाबांची तरी काय अवस्था झाली असेल, कोण जाणें ! त्यांच्याबद्दलचें सर्व दुःख मीं माझ्या मुलांकडे पाहून विसरल्यें. काय माझ्या बाबांचा पराक्रम तुम्हांस सांगूं ! हजार पांचशांत त्यांच्यासारखा वीर मिळणें कठीण. **संपतराव** सेनापतीचें नांव ऐकिलें, कीं शत्रूंनीं पळ काढलाच. हा त्यांच्या नांवाचा दरारा होता. परंतु आतां त्याचा काय उपयोग ! असो, ईश्वर त्यांस सुखी ठेवो म्हणजे झालें.

**जमनाबाई**—(गहिवरून उठून, राजा व राणीस नमस्कार करून) **महाराज**, व **आईसाहेब**, आपण मला आज जो मान दिलात व राज्यांतील कोणा एकाकडेही न देतां मजकडे जें नाजुक काम सोंपविलेंत, त्यामुळें मीं गर्वानें फुगून जावें एक, नाहींतर अत्यंत आनंदित तरी व्हावेंच. परंतु मला या पैकीं कांहींच झालेलें नाहीं. कारण मीं कोण, व माझी योग्यता काय, हें मीं पूर्णपणें जाणत आहें. असो, मजकडे दिलेलें काम मीं जिवापलीकडे करीन, हें मीं माझे वडील **संपतराव** सेनापती यांच्या पायांची शपथ घेऊन सांगत्यें. (हें ऐकून राणी, राजा व इतर सर्व, जमनाबाईकडे एकसारखे टक टक पाहूं लागले ) माझ्या दुर्दैवानें मला जी ही स्थिती प्राप्त झाली आहे, त्याबद्दल मला नेहमीं अत्यंत दुःख होत आहे. असो. झाली गोष्ट पुनः येत नाहीं. परंतु पश्चात्तापानें पापाचा नाश होतो असें सांगतात. त्या न्यायानें, **ताई**, नाहीं **आईसाहेब**, मीं आपल्या चरणाचीच शपथ घेऊन सांगत्यें कीं, महाराज सरकारचें व माझें, आजपर्यंत जें नातें होतें तें, या घटकेपासून मीं तोडिलें. **आईसाहेब**, आपण

मजकडे दिलेलें काम, ह्मणजे राजपुत्र व राजकन्या यांचें पालन पोषणकरणें, यापेक्षां यापुढें माझें अधिक कर्तव्य नाहीं, असें समजून, त्याप्रमाणें मीं वागत जाईन. नंतर (अत्यंत गहिंवरून) **आईसाहेब** (असें म्हणून राणीच्या कानांत कांहीं सांगून) आपली नाहींशी झालेली बहिण **यमुना**, ती हीच हतभागी जाधवांच्या कुलास कलंक लावणारी. ही स्थिती मला कशी प्राप्त झाली, आपल्या बाबांची काय अवस्था आहे, वगैरे गोष्टी माझ्यानें येथें सांगवत नाहींत. आपण माझी वडील बहीण हें एकमेकींस यावेळीं समजलें, ही फारच आनंदाची गोष्ट झाली. (असें ती बोलत आहे तों)

**राणी**—(मोठमोठ्यानें रडत तिच्या गळ्यास मिठी मारून व स्फुंदत स्फुंदत ) माझ्या लाडके **यमुताई**, कशीग तुझी ही अवस्था झाली ! कोणा दुष्टानें तुला या नीच स्थितींत आणून सोडलें ! तूं दहाबारा वर्षांची होतीस तेव्हांपासून येथें आहेस हें खरें. परंतु आपणां वीरकन्यांस, ही नीचावस्था यावी काय ! पूर्वजन्मीं तूं काय पातक केलें होतेंस कीं त्यामुळें तुला ही अवस्था आली, हें समजत नाहीं ! असो, भवितव्यापुढें कोणाच्यानें जाववत नाहीं हेंच खरें ( असें म्हणून पूनः तिला मिठी मारून रडूं लागत्ये. )

**जमना**—ताई, आतां मजबद्दल शोक करून काय उपयोग ! गोष्ट होऊनें गेली. या माझ्या पापाचरणास मृत्यूशिवाय अन्य शिक्षाच नाहीं. आईबाप, बहिणभाऊ, यांच्या नांवाला व आपल्या कुळाला, कालिमा आणणारी जी मीं, त्या मला, आपलें कृष्णमुख कोणाएकालाही दाखवूं नये असें वाटतें. म्हणून मीं या घटकेस येथून खालीं उडी टाकून मुक्त झाल्यें असत्यें. परंतु आपल्या मुलांसाठीं–पण असें कां, तीं मुलें माझींच आहेत—

मला तसें आतां करवत नाहीं. पण **ताई**, तूं आतां बोलत नाहींस ती. व अशी जड कां होऊं लागलीस ?

**राणी**—( नाड्या जात चालल्या होत्या व शब्दोच्चारही स्पष्ट होत नव्हता अश्या स्थितींत )—बया **यमु**, इकडे ये ?

**जमना**—ताई, मीं तुझ्या अगदीं जवळ आहे बेर.

**राणी**—( राजपुत्र व राजकन्या यांचे हात **जमनाच्या** हातांत देऊन ) **महाराज**, आपण जरा पुढें या ?

**राजा**—( एकसारखा खालीं पाहत होता तो मोठ्यानें उ-सासा टाकून पुढें जातो व ) प्राणप्रिये, हा मीं जवळ आलों.

**राणी**—( बहिण व मुलें यांचे हात महाराजांच्या हातांत देऊन मोठ्या ओढत व खोल शब्दानें ) **महाराज**, आतां मीं जात्यें बरं. या माझ्या **बाळांचा** व **यमुताईचा**, आतां तुह्मीं सांभाळ करा. मजवरील व यांच्यावरील माया कमी करूं नका. मला आतां दानधर्म करूं द्या. वेळ लावूं नका. राम. राम. राम. देवा, हे कोण लोक आले? ( भिऊन ) राम, राम, राम—

(नंतर रुपयानीं भरलेलीं सुवर्णताटें प्रधानजीनीं पुढें आणून ठेविलीं, व उपाध्यायाच्या मंत्रोच्चाराप्रमाणें राणीनें त्यावर उदक सोडिलें. नंतर राजवाड्यांत जमलेल्या भिक्षुक व धर्मार्थि लोकांस तीं वाटून दिलीं. त्याचप्रमाणें सहस्र गोप्रदानांचें राणीनें उदक सोडिलें. या वेळीं राजवाड्यांत भिक्षुकांची व राजवाड्यापुढें याचकजनांची व त्यानां धर्मादाय करण्यामध्यें सरकारी अंमलदारांची मोठी गर्दी उडून गेली होती. राणीला घरघर लागून तिच्यानें वर्णोच्चार स्पष्ट करवत नव्हता. तथापि तिच्या मुखानें रामनामाचा घोष चालला होता. इतक्यांत तिनें मोठ्या प्रयासानें म,म, महाराज, असें ह्मटलें. यावेळीं राजा, राजपुत्र, राजकन्या, राज्ञिभगिनी वगैरे सर्व दासदासी एकसारखें रुदन करीत होतीं. तेव्हां )

**राजा**—(रुदन करीत व मोठ्यानें स्फुंदत स्फुंदत पुढें जाऊन व राणीचें मस्तक आपल्या मांडीवर घेऊन एक हात तिच्या आंगावर फिरवूं लागला, व दुसऱ्या हातानें मुलांचे डोळे पुसून) **राणीसाहेब**. मीं आपल्याला मांडी दिली आहे बरं. तुम्हीं आतां अगदीं भिऊं नका. मुखानें रामनाम चालूंद्या. मुलांविषयीं, किंवा तुमच्या बहिणीविषयीं, कांहीं काळजी करूं नका.

**सेनापती**—(एकुलता एक मुलगा परागंदा झाल्यामुळें सदा दुःखी, व रणांत जरी मोठा शूर व क्रूर, तरी मनाचा मोठा कोंवळा असल्यामुळें या वेळच्या हृदयभेदक देखाव्यानें अगदीं विव्हळ होऊन रुदन करीत करीत राणीच्या नजिक येऊन,) आईसाब, आपुन आमास्नीं टाकून चाललां, आं. आपले प्राण घुटवळत्याती व्हय, नकाबरं. लइ शांत असा. तुमास्नीं बघून हीं मुलें व आपली बहिन कशीं अक्साबोक्सी रडत्याती बघा ?

**राणी**—( डोळे मिटलेले उघडून सेनापतीकडे पाहून मोठ्या प्रयासानें ) **सेनापतीसाहेब** ?

**सेनापती**—जी **आईसाब**, आपुन चाललां. पन राज्यांत लई हाहाःकार होईल बगा—असो, आई अंबाबाई, तुमचा आत्मा सुखी ठेवो! (इकडे तिकडे साशंक पाहून) **आईसाब**, आपलीं मुलें व बहिण यांचें तुमच्यामागें कसें व्हईल या दुःखानें तुमचा जीव घुटवळतो है, वई. तुमीं त्यांचा समदा बंदोबस्त चांगला केलाया ? आन् मग तुमास्नीं काळजी कशापायीं ?

**राणी**—(सर्व समजून पुन्हां डोळे उघडत्ये व मुलांकडे व बहिणीकडे मोठ्या दीन वदनानें पाहून त्यांच्याकडे बोट करून ) **सेनापतीसाहेब**, हीं उघडीं पडलीं हो!-(तिच्यानें पुढें बोलवेना)

**सेनापती**—( राणीच्या मनांतील आशय समजून व मोठा

दुःखी होऊन ) **आईसाब**, मुलांचा बंदोबस्त तुमीं केलाच हैं. आनीं मींबी श्रीकुलस्वामिण अंबाबाईची व आपल्या पायांची शपथ घेऊन सांगतों, कीं माझ्या जिवांत जीव आहे पर्यंत, त्यांच्या केंसालाही मीं इजा होऊं देणार न्है. झालें, तुमास्नीं कांहीं काळजी नग. ( असें ह्मणून अधिक रडूं लागतो. )

**राणी**—( हें ऐकून मोठ्या आनंदित मुद्रेनें सेनापतीकडे पाहून अस्पष्ट रीतीनें वर्णोच्चार करीत ) **बाळानों, यमुताई, म, म, महाराज, सेनानानाप**—राम, राराराम. ( असें ह्मणून डोळे मिटत्ये. )

**राजपुत्र व राजकन्या**—( एकदम ) आईग, आई, हे आई, बोलाकिहो—( असें म्हणून मोठ्यानें किंकाळी फोडितात. )

**जमना**—( मोठ्यानें रडत रडत राणीच्या आंगावर एक हात टाकून जवळच पडत्ये ) ताई, अग ताई, तूं माझी वडील बहिण हें मला आतांच समजलें व लागलिच तूं मला सोडून कशीग चाललीस ! ( असें ह्मणून मोठ्यानें रडूं लागत्ये. )

( इतक्यांत राणीनें प्राणोत्क्रमण केलेलें पाहून सर्व रडूं लागतात. )

**अंक १ ला समाप्त.**

# अंक २ रा.

## प्रवेश १ ला.

**स्थल**—दादासाहेब ( राजश्यालक ) व नायब प्रधान यांचा छोटेखानी दिवाणखाना. **पात्रें—दादा व रामशास्त्री.**

**दादा**—( आपल्याशींच ) शाबास या दादासाहेबाची ! महाराज **दौलतराव** राजेसाहेब यांचें लग्न, आपल्या बहिणीशीं झाल्यास आज सहा सात वर्षे झालीं. एवढ्या अवकशांत, या **दादासाहेबाला** म्हणून कोणत्याही गोष्टीची उणीव पडली नाहीं. प्रत्यक्ष राजसत्ताच माझ्या हातांत आहे, असें म्हटलें तरी चालेल. माझ्या इच्छेनुरूप आजकाल राजकारभार चालला आहे, असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. प्रधानसुद्धां, राजाचा हुकूम झाला असला तरी, त्याविषयीं माझें अनुमोदन घेतल्या वांचून कांहीं एक करीत नाहीं. मग इतर राजसेवकांची काय कथा ! महाराज सरकार म्हणजे, कळसूत्री बाहुल्याप्रमाणें माझ्या केवळ हातांत आहेत. मीं जसें सांगेन त्याप्रमाणें ते राजकारभार करीत आहेत. माझ्या बहिणीबरावर त्यांचें लग्न झाल्यावरही, पूर्वसांप्रदायाप्रमाणें, त्या **जमना** जारिणीच्या सल्लामसलतीनें ते वागत होते. परंतु पुढें त्या **भटानें** सुचविल्या प्रमाणें तजवीज करतांच, राजेसाहेब हळुहळू आमच्या हातांत येत चालले. काय बेट्या त्या भटाची युक्ती तरी ! गुलाम, लुच्चा खरा. पण आपल्यास त्याचा मोठा उपयोग आहे. त्याचें साह्य नसतें, तर आमचे हाल कुत्रा खाताना ! त्यानें कसें भगिरथ प्रयत्नानें आमच्या बहिणीस राणी करण्याचें राजाच्या मनांत बिंबून दिलें ! ती त्यांच्या कशी नजरेस पाडली !

कसा एक ज्योतिषी उत्पन्न केला, व " आमच्या बहिणीबराबर लग्न केलें असतां राजसत्ता द्विगुणित होऊन राजाला संतती व संपत्ती अधिक प्राप्त होईल, " हें त्याजकडून राजाच्या कानीं जावें या साठीं त्या **जमनास** कशी हाताशीं धरली ! प्रथमतः ती ह्मणेल तें आपण कबूल करून, आमच्या बाबांकडूनही कसें कबूल करविलें ! व कार्यभाग होतांच **जमनाला** संशय उत्पन्न न होऊं देतां तिला हळुच कशी सोडून दिली! या सर्व गोष्टी मनांत आल्या ह्मणजे हा **भट** या राज्यांत प्रधानच शोभेल असें ह्मटल्यावांचून रहावत नाहीं. बरें पण मला येतों ह्मणून सांगून तो अद्याप कां बरें आला नाहीं !

( इतक्यांत **रामशास्त्री** वैद्य येतात. )

**दादा**—कां **वैद्यराज**, एवढा वेळ कोठें होतां ?

**राम—दादासाहेब**, मीं आपलें तन आणि मन आपल्या कार्यार्थ अर्पण केलें आहे. मला येण्यास जो अवकाश लागला, तो आपल्या कामासाठींच.

**दादा**—हं. असें काय ? मग काम झालें का ?

**राम**—अलबत. त्या दोघांस आपण व राणीसाहेब, यांनीं बलाविलें आहे असें सांगून आलों. ते रात्रीं येतील. त्यावेळीं आपली स्वारी वाड्यांतच असावी.

**दादा**—अहो. मीं वाड्यांतच आहें. पण तुह्मीं ज्यांना बलाविलें ते कोण आहेत ? व ते आपलें काय काम करणार ? हें तुह्मीं मला अद्याप सांगितलें नाहीं.

**राम—दादासाहेब**, आपले इच्छेनुरूप सर्व कांहीं मीं करीत आहें. व ईश्वरकृपेनें आपलीं बरींच कामें सिद्धीसही गेलीं आहेत. दोन तीन मोठीं महत्वाचीं कामें अद्याप होणें आहेत. तीं कशीं सिद्धीस जातात, ही मला मोठी काळजी लागली आहे.

**दादा**—तें खरें. पण तुह्मीं आज जें काम करण्याचें योजिलें आहे, तें कोणतें ?

**राम**—आपल्या **बाळासाहेबांस** प्रसिद्धपणें युवराजकरणें हेंच.

**दादा**—ओहो. फार उत्तम. पण, तें ह्मणजे फार कठीण आहे असें मला वाटत नाहीं. याबद्दल आपण जो जाहिरनामा प्रगट करूं, त्याच्याविरुद्ध कोण जाणारआहे ? व कदाचित् कोणीं गेलाच, तर ही बघितलीना ( असें ह्मणून आपली तरवार दाखवितो. )

**रामशास्त्री**—तें खरें, पण, या कामाला सर्व प्रजा विरुद्ध येईल, हें मीं तुह्मांस खात्रीनें सांगतों.

**दा**—( रागानें व ऐटीनें तरवार हातांत घेऊन आपल्या सभोंवती फिरवून ) असें काय ! वेळ येईल तेव्हां दाखवीन.

**रा**—पण त्याविषयीं आज वादविवाद कश्यास पाहिजे.

**दा**—( किंचित् विचार केल्यासारखेंकरून ) होय बाबा, तुह्मीं ह्मणतां तेंही एक प्रकारें खरेंच आहे. पण आज तुह्मीं काय करणार, तें कळविलें नाहीं?

**रा**—( दादासाहेबांच्या कानाशीं लागतो व आपला हेतू सांगून त्यांना तो मान्य अमान्य झाला किंवा काय, हें पहाण्यासाठीं त्यांच्या मुखचर्येकडे एकसारखा पहात ) कां, बेत कसा काय आहे ?

**दा**—( आंगावर कांटा येऊन व मोठ्यानें उसासा टाकून शास्त्रीबुवांकडे एकसारखा पहात) कठीण बुवा ! पण मला तर हें काम करावें लागणार नाहींना ?

**रा**—( **दादासाहेब** हा, आपला बेत ऐकून घाबरून गेला आहे. असें पाहून, पुनः त्याच्या कानाशीं लागतो. व कांहीं

सांगून ) आतांतरी **दादासाहेब**, हें काम केलेंच पाहिजे किंवा नाहीं? किंवा आपली मर्जी नसेल, तर मीं तें सोडून देतों. पण हें काम मीं सोडून दिलें, कीं आपला एक हेतू निर्फळ झालाच ह्मणून समजा.

**दा**—तुमच्या कामाला मीं कधीं हरकत केली आहे काय? तुमच्या मर्जीप्रमाणें चालू द्या. पण त्यांत मला कांहीं एक काम सांगू नका म्हणजे झालें.

**रा**—ठीक आहे, मीं आतां जातों.

---

## प्रवेश २ रा.

**स्थल**—**जमनाबाई**चा महाल. **पात्रें**—**जमनाबाई, राजपुत्र, राजकन्या, रामभट, ठ्यंकय्या**आचारी, **विठू** शिपाई व **गजाऊ.**

**जमनाबाई**—कां **बाळा**, घोड्यावर बसणें, दांडपटा-खेळणें, तरवार परजणें, भालाबर्ची, जंबियादी शस्त्रें यथायोग्य वापरणें. निशाण मारणें व अल्पस्वल्प शिकार करणें, यांची माहिती तुला आतां बरीच झाली असेल, नाहीं बरं?

**राजपुत्र**—**मावशी**, मीं घोड्यावर कसा बसतों, निशाण कसें मारतों, व शिकार कशी करतों, याची तूं परवांचना माझी परिक्षा घेतलीस. आणि पुन्हाग काय विचारितेस?

**जमना**—**बाळा**, तूं मोठा हुषार, शूर, व पटाईत आहेस, असें मी समजत्यें. पण लोकांना तसें वाटलें पाहिजेना? आपले जुने राजवैद्य **रामशास्त्री**, या कामांत मोठे हुषार आहेत, व एकदोन दिवसांत ते तुझी परिक्षा घेणार आहेत, म्हणून मीं हें तुला आज विचारिलें.

**राजपुत्र**—कोण पाहिजे तो पाहिजे त्या वेळीं माझी परिक्षा घेईना, मीं तयार आहें. जेवढें मला शिकविलें आहे त्यांत मीं चुकणार नाहीं, समजलीस. हा कोण वीर आहे माहित नाहीं वाटतें ? ( असें ह्मणून कमरेची आपली लहान तरवार काढून वीरश्रीनें फिरवूं लागतो. )

**ज**—( आनंदानें गहिंवरून राजपुत्राला पोटाशीं धरत्ये व त्याचें मुखचुंबन करून ) शाबास, **बाळा**, शाबास.

**राजकन्या**—अहाहारे वीर ! केवढा हा शूर गडी ह्मणून सांगावें ! पण याची बडबड सगळी बायकांत हो, मावशी.

**राजपुत्र**—कांग ताई, तुला यांत काय समजतें. तूं आपली सागरगोटे खेळावे, फेरमाऱ्या खेळावे, व झोपाळ्यावर बसून ओंव्या म्हणाव्या, हींच तुम्हां बायकांचीं कामें. तुम्हांस आम्हां वीरांच्या खेळाची काय माहिती ?

**राजकन्या**—खरंच बाई कोणी म्हणेल ! केवढा शूर योद्धा पण मावशी हा !

**राजपुत्र**—चलग ताई, आतां ते **दादासाहेब** इतक्यांत येतील, आणि मग तुझी धांदल उडेल.

**राजकन्या**-(किंचित रागावून) पुरेपुरे, धाकटे **महाराज**, तुम्हीं मोठे शहाणे अहां, पुरे आतां. पुष्कळ बोललां तुम्हीं बरं.

**जमना**—अशी रागावतेस काय बरं ताई, तुझा तो धाकटा भाऊ ना ? थट्टेनें बोलत आहे तो. बोलूंदे त्याला.

**राजकन्या**—मावशी, तूं आपली त्याच्याकडलीच बोलत जा बरं. धाकटे **महाराज**, मला अशी थट्टा आवडायची नाहीं बरं.

**राजपुत्र**—मी अशीच थट्टा करीन जा. तूं काय माझें करशील ?

( अशा रीतीनें त्यांचें बोलणें चाललें होतें इतक्यांत)

**रामभट—बाईसाहेब**, काल राजदरबारीं काय झालें तें आपल्यास मीं सांगितलेंच आहे. त्याविषयीं काय विचार करावयाचा ?

**जमना—भटजी**, "राजानं मारलं व पावसानं भिजविलं," तर त्याची फिर्याद कोणाजवळ न्यायची. महाराजांची वृत्तीच आलिकडे फिरत चालली आहे. त्याला काय करावं ! नाहींतर आजपर्यंतची वहिवाट म्हटली म्हणजे, दिवसारात्री मिळून, ते पांच सहावेळ तरी इथ यायचे. राजकारभारसंबंधी गोष्टी बोलत बसायचे. मला विचारायचं व माझ्या सल्लामसलतीनें सर्व कांहीं करायचं. तें आतां सर्व फिरलें. ते आतां एकेक दोन दोन दिवसांत इकडे येत नाहींतसेच झाले आहेत. राजपुत्र व राजकन्या यांच्याशीं कितीतरी वेळ लडिवाळपणानें बोलत असत. ते आलिकडे, कांहीं तरी कुसपट काढून त्यांस रागावूं लागले आहेत. असो, त्यांची मर्जी.

**राम—बाईसाहेब** आपल्यास राग न यावा, पण हें असें होईल असें मीं पूर्वींच भविष्य केलें होतें. तो दुष्ट **रामशास्त्री**, महाराजांचें लग्न ठरविण्यासाठीं येथें येत असे, तेव्हांच मीं समजलों कीं या गोंडबोल्याच्या मनांत कांहींतरी दगा आहे. महाराज सरकार हे पूर्वीं तुमच्या अध्यीवचनांत होते ते आतां इकडे ढुंकूनही पाहिनातसे झाले. नव्या राणीला पसंत करण्यालाही तुम्हींच कारण. त्याचवेळीं तुम्हीं त्या नापसंत केल्या असत्या, म्हणजे आज असें कां झालें असतें! पण तुमचा स्वभाव पडला फार दयाळू, त्याचीं हीं फळें. असो, आज दुसऱ्या राजपुत्रास राजदरबारीं युवराजाचीं वस्त्रें मिळून त्याबद्दल सर्व शहरभर मोठा महो-

त्सव होणार आहे. तर असें झालें ह्मणजे आपल्या **धाकटे** महाराजानीं काय करावयाचें !

**जमना—रामभटजी**, तुम्हीं काल रात्रीं हें वर्तमान मला सांगितलं तेव्हांपासून मला चैन पडत नाहीं. सर्व रात्रभर व आज हा वेळपर्यंत मीं विचार करीत बसल्यें आहें. परंतु कांहींच सुचत नाहीं. महाराज सरकार इथ आले असते, तर त्यांस समक्षच विचारिलं असतं. परंतु ते येण्याचं बंदच झालं. तेव्हां आतां काय करावं ! (असें ह्मणून दुःखानें उसासा टाकून हातावर गाल टेंकून स्वस्थ विचार करीत बसली.)

**रामभट—बाईसाहेब**, आपल्यास तर कांहीं युक्ती सुचत नाहींना ? आतां मला वाटेल तें करण्याची मला परवानगी असावी. मीं धाकटे महाराजांचें अन्न खाऊन भला गलेलठ्ठ झालों आहें. त्याचा उपयोग श्राद्धपक्ष झोडण्याच्या पलिकडे केलाच पाहिजे. कांरे व्यंकय्या, असेंचना ?

**व्यंकय्या**—असा नाहीं तर कसा. बाईसाहेबांस आम्हीं सांगत होते. त्यानीं ऐकला नाहीं. आतां तुम्हीं जसा करेल तसा हा व्यंकय्या करेल.

**विठू—बाईसाब**, या राज्यांत असा जर अन्याव व अंधेर असेल, तर हा पट्टा ध्या ( असें म्हणून गळ्यांतील पट्टा काढून पुढें ठेवतो. )

**जमनाबाई**—अरे **विठू**, हा अन्याय मीं कांरे करत्यें ! अरे उलट तुम्हां सर्वांप्रमाणें मीही म्हणत्यें कीं, हा अन्याय आहे. पण करावं काय ? हा प्रकार जर माझ्या संबंधानं असता, तर मीं एक क्षणभरही या राज्यांत राहिल्यें नसत्यें. परंतु करावं काय ? जीव कसा तडफडत आहे. असं वाटतं कीं या मुलांस घेऊन कुठ दूर जावं. परंतु तसेंही

माझ्यानें करवत नाहीं. किंवा आलेलें संकट दूर करण्यास मला एखादि युक्तीही सुचत नाहीं. अरे पण माझा उजवा डोळा कां बरं लवत आहे ?

**विठू—बाईसाब,** आलं हय अरिष्ट, तें दिसतय. आन् त्यापाय डोळा लवतुई. आन् कशापायीं दिसरा. पण तुमीं लई इगुतवान हय तर मग कांहीं युगुत कोढा की आज सांजचा बेत पालथा पडेल अशी.

**जमना**--अरे बा, मीं बायको मनुष्य. मला युक्ती ती कशाची सुचत्ये. जसं त्या बाळाच्या नशिबीं असेल तसं होईल. मीं तरी काय करावं ! या राजवाड्यांत ती ( नूतन राणी ) नागीण व तो ( तिचा बंधु ) काळ सर्प घुसलीं आहेत. तीं आतां कुणकुणाला चावतील,व त्यांचें वीष कुणकुणाला बाधेल,हें सांगवत नाहीं. काय मेला चमत्कार आहे ! हींच सर्व माणसें, प्रथमप्रथम माझ्या अगदीं अर्ध्या वचनांत होतीं. तींच आलिकडे मला केवळ विचारीत नाहींत एवढंच नाहीं, तर त्यांची भेट होत्ये त्यावेळीं माझा आपमान तर करतात. टाकून व लागून तर बोलतात. व इतर सर्वांनीं माझें ऐकूं नये, माझा अपमान करावा, अशाविषयीं त्यांना उलट उत्तेजनही देतात. याच कैकयेनें व त्या दुष्टानें, आज वर्ष दोन वर्षें, नाहीं नाहीं तें सांगून महाराज सरकारचें मन मजविषयीं व (मुलें दूर होतीं त्यांजकडे बोट दाखवून ) त्या दोन हतभागी मुलांविषयीं दूषित केलें आहे. आतां महाराज, राणी, व राजवाड्यांतील इतर माणसें, आमचा द्वेष करितात. असो. काय होईल तें खरं. मी तर बाबा अगदीं भांबावून गेल्यें आहें. माझा उजवा डोळा लवत आहे व दुसरींही दुश्चिन्हें होत आहेत. काय आई कुलस्वामिणी करील तें खरं.

**रामभट—बाईसाहेब**, आजचें अरिष्ट टळण्यासकांहीं तरीयुक्ती काढिली पाहिजे. मग काय होईल तें होवो. आपण मात्र मला दोष देऊं नये, ही माझी आपल्यास विनंती आहे.

**जमना**—म्हणजे तुम्हीं हो काय करणार, व मीं तुम्हांला दोष तो कशाबद्दल देऊं नये ? मला यांत कांहीं समजत नाहीं. स्पष्ट सांगा पाहूं ?

**रामभट—बाईसाहेब**, आपण कांहीं घाबरूं नये. अनन्वित, किंवा अनुचित, असें मीं कांहीं एक करणार नाहीं.

**जमना—रामभटजी**, माझ्या मनाला आज समाधान म्हणून कसं तें वाटतच नाहीं. जें समजलें आहे, त्या शिवाय दुसरं कांहीं अरिष्ट येणार आहे किंवा काय, याविषयीं ज्योतिषी बुवांस तरी विचारावं. **विठू**, ज्योतिषी बुवांस बलावून आणरे.

**विठू—बाईसाब**, अशीं घाबरतां कश्यापाई. तुमीं कधीं कोणाचें वाईट केलें न्हाईंका कान्हयीं. तुमीं तर समद्यांवर अक्षी उपकारच केल्या ती. मगहो तुमास्नी कश्यापाई भिती ? तुमीं सवस्त असा. समदी परजा बगाया मुळें लई हळहळतीया.

**जमना**—तुम्हां सर्वांच्या तोंडांत साखर पडो व तुम्हीं म्हणतां त्याप्रमाणेंच होवो बरें बाबा. म्हणजे मीं तुला सोन्याचें-कडं बक्षीस देईन. अरेपण, माझ्या मनाला कसंसंच वाटूं लागत आहे. तर तूं जाऊन आधीं ज्योतिषी बुवांस घेऊन ये.

( सर्व निघून जातात. )

## प्रवेश ३ रा.

**स्थल—जमनाबाईचा** महाल.

**पात्रें—जमनाबाई, धाकटे महाराज, ताईसाहेब. व दादासाहेब.**

**धाकटे म**—मावशी **आई**, अशी तूं रडत कां बसली आहेस. तुला कोणी रागावलें कीं काय? मला सांग, मीं जाऊन आतांच त्याला शासन करतों.

**जमना**— ( मुलाचें हें प्रेमयुक्त भाषण ऐकून अधिकच रडें येऊन ) **बाळा**, अरे **बाळा**, कायरे तुला सांगूं !

**ताई—मावशी** तूं अशी कांग दुःख करत्येस? तुला काय झालं ?

**जमना**—मुलानों, तुम्हांला मीं काय सांगू ! आज मला जर मृत्यु येईल, किंवा ही पृथ्वी दुभांगून मला आपल्या पोटांत घेईल, किंवा आकाशांतील वीज मजवर पडून माझा अंत होईल, तर फार बरं होईल.

**धाकटे म—आई**, पण तुला एवढें दुःख होण्याला झालें तरी काय? सांगून तर पहा? तुला वाटत असेल, कीं मीं काय लहान आहें. मीं तो जाऊन एखाद्याला काय शासन करणार ! पण तुला सांगतों, कीं शस्त्रास्त्रासह मीं पाहिजे त्या-च्याशीं जाऊन युद्ध करीन, व तुझ्या कृपेनें पराजित होणारच नाहीं. मीं लहान ह्मणून मला असा तसा लिचापिचा समजूं नको. तुला कोणीं दुःख दिलें हें सांग मात्र, कीं त्याला शासन करण्यास मी गेलोंच ह्मणून समज. तुला फार काय सांगू. **महाराज** सरकारानीं जरी तुझा अपराध केला असेल, तरी “ तुह्मीं माझ्या आईला कां रागावलां ” ह्मणून जाऊन त्यांना विचारीन. कांहीं भिणार बिणार नाहीं. अं.

**जमना**—( दुःखानें गहिंवरून ) **बाळा**, पूर्वींचे महाराज ते आतां नव्हत हो. त्यांना आपल्या सर्वांचा मोठा कंटाळा आला आहे. ते आपलं ऐकते, तर आपणावर अशी वेळ कां आली असती ! काय देव करील तें खरं. पण **बाळा**, तुझे ग्रह मोठे

वाईट आले आहेत. म्हणून तर आज दोनप्रहरीं तुझ्या हातून मीं दानें करविलीं.

**ताई**—**बाळा**, आई म्हणते तें खरं आहे. सकाळीं ज्योतिषीबुवा आले होते, ते सांगत होते कीं तुजवर मोठं अरिष्ट आलं आहे म्हणून. आणि दान केलीं म्हणजे तुला कांहींएक व्हायचं नाहीं, असेंही पण त्यांनीं सांगितलेलं मीं ऐकलं.

**धाकटे म**—याचमुळें का तूं आई रडत आहेस? हत् तिच्यारे. अग मला कशाची भिती? ही तरवार घेऊन चोपून टाकीन सर्वांना. तूं कां घाबरतेस.

( इतक्यांत राजदरबारांतून शिपाईप्याद्यांसह **दादासाहेब** आल्याचें विठू येऊन सांगतो. व हुकुम झाल्यावरून त्यांस आंत घेऊन येतो.)

**जमनाबाई**—कां **दादासाहेब**, आज मोठा धामधुमिचा दिवस, आणि तुमचं इथ येणं कसं झालं!

**दादा**—**धाकटे** महाराजांस घेऊन येण्याविषयीं **महाराज** सरकारचा हुकुम झाला, म्हणून त्यांस नेण्याकरितां मीं आलों.

**जमना**—( प्रथम घाबरली परंतु महाराजानीं राजपुत्रास बलाविलें, यावरून आपण ऐकिलं तें सर्व खोटं असें मनांत येऊन किंचित् आनंदित झाली. परंतु मनांतील संशय गेला नाहीं. तथापि ) ठीक आहे, महाराजांची आज्ञा शिरसावंद्य आहे. **बाळा**, इकडे ये.

**राजपुत्र**—काय आई?

**जमनाबाई**—तुला महाराज सरकारानीं बलाविलं आहे. तर तूं **दादासाहेबां**बराबर जाण्याकरितां आपला पोषाख करून ये.

**दादा**—कां **जमनाबाई**, तुह्मीं, **ताई** व **धाकटे** महा-राज, अशीं काय विचार करीत बसलां होतां ?

**जमना**—कांहीं नाहीं, विचार कशाचा करायचा आहे. बसल्यें होतें मुलांना घेऊन इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलत.

**दादा**—बरें पण, मजविषयीं आपल्यास विसर नाहींना पडला ?

**जमना**—आपल्याविषयीं विसर कसा पडेल !

**दादा**—तर मग माझें काम आपण खास करणार, असें मीं समजावेंना ?

**जमना**—तें माझ्याहो काय हातांत आहे. मीं आपली घातल्या अन्नाची व सांगितल्या कामाची. सर्व कांहीं महाराजां-च्या हातांत, आणि ते आपल्या अर्ध्या वचनांत.

**दादा**—तें सर्व खरें. परंतु महाराजानींच हें काम तुमच्या-कडे संपविलें आहे, ह्मणून तुह्मांला विचारतों. कां, **ताई**साहेब, कसें काय आहे ? काल राणीसाहेबांकडून तुह्मांला बलावणें आलें होतें ना ?

**ताई**—होय.

**दादा**—मग तुह्मीं आलां नाहीं त्या.

**ताई**—माझं एकटीचं राणीसाहेबांपाशीं कांहीं काम न-व्हतं ह्मणून आल्यें नाहीं. **मावशीला** व **बाळाला** कांहीं बला-वलं नव्हतं. !

**दादा**—त्यांचें कांहीं काम नव्हतें, तुमचेंच एकटीचें काम होतें.

**ताई**—पण असं माझं एकटीचंच तिथं काय काम होतं ?

**दादा**—तुह्मीं आलां असतां ह्मणजे समजलें असतें काय काम तें.

**ताई**--मीं एकटी कांहीं तिथ यायची नाहीं. आल्यें तर मावशी बराबर येईन.

**दादा**-- (हें ऐकून मोठा रागावून ) ठीक आहे. **जमनाबाई**, हे **धाकटे** महाराज आले. आह्मीं आतां जातों.

**जमना**--**बाळा**, इकडे ये.

**राजपुत्र**--काय, **आई** ?

**जमना**--तुला महाराज सरकारांकडून बलावणं आलं त्याप्रमाणें तूं आतां तिकडे जा. पण ( असें म्हणत आहे तों तिला दुःखाचा मोठा हुंदका आला व तिच्यानें पुढें बोलवेना .)

**ताई**--**मावशी, बाळ** जातो म्हणून आज तुला फारसं वाईट वाटतं. ?

**राजपुत्र**--आई आपली आज रडतच आहे मघांपासून. तिला किनई **ताई**, माझ्या विषयीं आज आपली भीतीच वाटत आहे. **आई**, अग **आई**, तूं अशी भिऊं नको.

**जमना**--( आपलें दुःख आवरून ) **बाळा**, जपून जा व लवकर येहो. मीं तुझ्या येण्याकडे अगदीं डोळे लावून बसल्यें आहें बरं.

**राजपुत्र**--लवकर येईन बरें, **आई**-- (तिच्या कानांत) ते दादासाहेब पहा ताईकडे कसे टक लावून रागानें पहात आ-हेत ते.

**दादा**--( राजपुत्र काय बोलला हें समजून रागानें ) **जम-नाबाई**, काय पाल्हाळ लावला आहे हा. धाकटे महाराज काय देशांतरीं जात आहेत कीं काय !

**जमना**--**बाळा**, जाबरं ( इतक्यांत ) **ताई**, ती काजळाची

डबी इकडे आणग ? ( ताईनें डबी आणल्यावर राजपुत्राच्या गालाला काजळाचीं बोटें लावून त्याची रवानगी करत्ये.)

---

## प्रवेश ४ था.

**स्थल**—राजदरबार.

**पात्रें**—**महाराज** सिंहासनावर बसले आहेत. **प्रधान**, **सेनापती** व इतर **सरदार** व **मानकरी** आपापल्या दर्जाप्रमाणें बसले आहेत. सिंहासनाच्या पाठीमागें चिकाचे पडदे लावून त्याच्या पलिकडे राणीसाहेब बसल्या आहेत.

**राजा**—**प्रधान**जी, आज दरबार भरविण्याचें कारण काय, हें सर्व दरबारास कळवून स्वारी बाहेर काढण्याची तयारी करावी.

**प्रधान**—आज्ञा सरकार.

**सेनापती**—स्वारीबाहेर निघण्याची समदी तयारी है. **महाराजा**स्नीं अगदीं काळजी नग.

**प्रधान**—( दरबार भरविण्याचें कारण सांगत आहेतो )

**सेनापती**—**परधान**जी, तुमीं काय म्हणालां. पुना सांगा पाहूं?

**प्रधा**—(पुनः सांगतो.)

**सेनापती**— काय, **महाराज** सरकार, अन् तुमच्या राज्यांत हा आंधार !

**महा**—काय झालें सेनापती.

**सेनापती**—**धाकटे** महाराज असतांना, तुम्हीं दुसऱ्या **राजपुत्रास** गादीचे वारस करतां, हें काय ?

**दादा**—हो, हो, महाराज सरकारची तशीच मर्जी आहे. मग तुम्हीं काय म्हणतां ?

**सेनापती**—( या बोलण्याकडे लक्ष न देतां ) कां **प्रधान**जी, असे मूग कां खाल्लिया. बोला की ?

**प्रधान**—महाराज सरकारची जशी मर्जी आहे, त्याप्रमाणें झालेंच पाहिजे.

**सेनापती**—महाराज सरकारच्या राज्यांत जर अन्याय होत असेल तर तो त्यांनां दाखविणें हें तुमचें व आमचें काम आहे. मग तुम्हीं कश्यापाईं सांगत नाहीं ?

**दादा**—**महाराज** सरकारचा जसा हुकुम होईल त्याप्रमाणें तुम्हांला ऐकलेंच पाहिजे. खरें कीं नाहीं प्रधानजी ?

**प्रधान**—खरें आहे, **दादासाहेब**.

**सेनापती**—( फार रागावून ) "खरें आहे **दादासाब**." **प्रधान**जी, असें बोलायला तुम्हांला कायबी वाटत न्हईं ! अहो, या राज्याचा संमदीकडे काय डंका. आन् तुम्हीं हें काय करतां, याचा जरा इचार करा ! आमचें त्यांत काय गेलें, पण दुनिया काय म्हणेल ?

**दादा**—**प्रधान**जी, तुम्हीं काय ऐकतां. तुम्हीं आपलें काम करा.

**सेनापती**—( दादासाहेबांकडे तिरस्कारयुक्त पाहून आपणाशींच ) काय करावें ! समदा अन्याय चाल्लिया ! कोणबी ऐकत न्हईं. परधानजी,अन् त्यो कालचा दादासाब, यांचें खातें यकूच दिसतिया. पन अपुन असूनशेनीं असा अन्याय ! मग आम्हीं शूरते कसचे. अपुन महाराजांसच एकवार इचारावें. ( नंतर मोठयानें) **महाराज** सरकार, माझी एक इनंती है, ती क्रिरपाकरून ऐकूनशेनीं कायतो न्यायानें हुकुम करा.

**राजा**—**सेनापती**, कायतें बोला.

**सेनापती**—पहिल्या राणीसाब कैलासवाशी झाल्या, तवां

त्यानीं आपणांस आन् आम्हां समद्यांस, काय सांगितलें तें आपल्या लक्षांत हैना ? मग आज हा दरबार भरूनशी **धाकटे महाराजांचा** गादी वरून हक्क कश्यापाई काढून टाकतां? दोघे बी राजपुत्र ल्हान हैती. जो पुढें लई हुशार निघेल त्यास गादी द्या. पन, आजच हा अन्याय करूं नका. आमीं आपल्या हुकुमाचे चाकर आहों, म्हणून हात जोडूनशी येवढी भीक मागतों, ती मला द्यावी.

**राजा**--( न्याई व कोमल अंतःकरणाचा असल्यामुळें त्याला हें बोलणें रुचून म्हणाला ) **सेनापती**, तुम्हीं बोललां तें बराबर आहे. माझेंही तुमच्यासारखेंच मत आहे. पण—

**रामशास्त्री**—( दादासाहेबांस हळुच ) **दादासाहेब**, आजचा सर्व बेत खास फसणार बरें. आजच्या कृत्यास महाराजांचेंच अनुमोदन आहेसें दिसत नाहीं.

**दादा**—आजचा ठरलेला बेत सिद्धीस न्यावयाचाच. कोणीही हरकत केली, तरी ऐकावयाचें म्हणून नाहीं. मग महाराज जरी आडवे आले तरी–(नंतर) हें पाहिलेंत काय? (असें म्हणून ज्यावर सरकारचा शिक्का मोरतब झाला आहे असा एक कागद त्यास दाखवितो.)

**रामशा**--( आनंदित होऊन ) वा, हें मोठें चांगलें केलेंत. आतां आपलें काम झालेंच म्हणून समजा. परंतु तो म्हातारा मोठा कडवा व माथेफिराऊ शिपाई आहे. कसें तरी त्याला संभाळलें पाहिजे.

**दादा**--अरे जारे. अशा हजारों म्हाताऱ्यांनीं काय करायचें आहे. बरळतो आहे बिचारा. बरळूंदे.

**सेना**--कां **परधानजी**, महाराजसरकार काय बोलल्याती तें ऐकिलें का ?

**प्रधान**--मला सरकारचा तसा हुकुम झाला तर मीं त्याप्रमाणें करीन. माझें काय ?

**नरसिंहशास्त्री न्यायाधीश**--कांहो **प्रधानजी**, आतां सेनापतिनीं महाराजांस विनंती केली व ती त्यानीं मान्य केली. आणखीं तुम्हांला निराळा हुकुम तो कोणता पाहिजे ?

**दादा**--**प्रधानजी**, तुम्हांस महाराजांचा एकवार हुकुम झाला आहे, तोच कायम. तो आतां फिरावयाचा नाहीं. तुम्हीं आतां **बाळा साहेबांस** नवीन वस्त्रें देऊन दरबार बरखास्त करा.

**धाकटे महाराज**--प्रधानजी **महाराज सरकारचा** हुकुम, तुम्हीं तोडणार काय ? कसा तोडतां तो पाहूं बरें. ? ( असें ह्मणून आपल्या जाग्यावरून उठून तरवारीस हात घालतो. )

**सेनापती** व **न्यायाधीश** व इतर दरबारची मंडळी--शाबास, **धाकटे महाराज**, शाबास. राजपुत्र असावा तर असाच शूर असावा. शाबास, शाबास. ( अशी राजपुत्राची सर्व दरबारभर जी वाहावा झाली तिच्या योगानें सर्व दरबार दणाणून गेला. )

**दादा**--( हा उत्कर्ष न सहन होऊन व दांत ओंठ खाऊन ) **प्रधानजी**, ( सेनापतीकडे बोट करून ) या थेरड्यानें मघांपासून फारच बडबड लाविली आहे. याला मीं आतांच्या आतांच शासन करितों. जुना व म्हातारा व महाराजांच्या पदरचा असल्यामुळें, येवढा वेळ मीं गय केली. परंतु आतां त्याला एक शब्दही बोलूं देणार नाहीं. ( नंतर सेनापतीला उ-

हेरून ) कां रे, ए थेरड्या, तुला तुझा जीव हवा असले, तर गप्प बैस. तुझा न्याय व अन्याय, आह्मीं कांहीं एक जाणत नाहीं. महाराजांच्या हुकुमाप्रमाणें आह्मीं तर आजचा समारंभ पार पाडणार व आह्मांस तुझ्या सारखे जे वेडे पीर अडथळा करतील, त्यांना आह्मीं याच वेळेस धारातीर्थास पोहोंचवूं. ह्मणून तुला पुनः एकवार सांगतों, कीं तुझ्या बडबडीनें कांहीं-एक व्हावयाचें नाहीं. **धाकट्या** महाराजांसारख्या अविचारी व पोकळ डौल मारणारांस, तुझ्या व्यर्थ बडबडीनें, दरबारचा, ह्मणजे महाराजांचा, अपमान मात्र करण्यास उत्तेजन मिळतें. दुसरें तर कांहीं एक नाहीं.

**सना**—( हें ऐकून अत्यंत रागावून ) काय, **दादासाब** आज तुम्हीं तीनचार येळां या दरबारांत मला टाकून बोललां तें मीं ऐकून घेतलें. ह्मणून आतां लांब जीभ काढून बोलतां काय ? व माझी बरोबरी करतां काय ? तूं कालचा बच्चा. तुझे ओंठ पिळले तर त्यामदून दूध निघेल. अन् तुला शौर्याची व दरबारची कायरे म्हायती ! राज्य मिळवण्यासाठीं व त्यांत बंदो-बस्त व सवस्थता ठेवण्यासाठीं या सेनापतीनें काय काय केलें हें तुला काय म्हाईत ? तूं आपला राजशालक आहेस. फुकाचें खा, पी, व सवस्थ बैस. **महाराज** सरकार आमचे मावाप आ-हेत. त्यांना आम्हीं बऱ्यावाईट गोष्टी सांगूं व ते आमचें ऐकतील, किंवा आमास्नीं शिक्षा करतील. या कामांत तुला बोलण्याची अगदीं गरज नाहीं. तुला पुनः एकदां सांगतों, कीं तूं राजशालक आहेस ह्मणूनच तुला मीं आज जीवदान देत आहें. नाहींतर तुला तुझ्या उध्धटपणाबद्दल आतांच्या आतांच यमपुरीस पाठविला असता.

**दादा—प्रधानजी, बाळा साहेबांस** वस्त्रें भूषणें

देऊन मोठ्या समारंभानें नगरांत मिरवीत घेऊन चला. मीं या म्हातारड्याचा बंदोबस्त करून तुमच्या पाठोपाठ आलोंच. (असें म्हणून तरवार उपसून सेनापतीच्या आंगावर धांवून गेला.)

( इतक्यांत प्रधान, रामशास्त्री वगैरे मंडळींनीं त्वरा करून धाकट्या राजपुत्राला अलंकार व वस्त्रांनीं भूषित करून घेऊन आले, तों **सेनापती** व **धाकटे** महाराज हे आपापल्या तरवारी बाहेर काढून तेथें धांवत गेले. )

**सेनापती**—खबरदार **परधानजी**. जर भलतें सलतें महाराजांच्या इच्छेविरुद्ध कांहीं कराल, तर मला तुमच्यावरही हात टाकण्याची येळ येईल. ( धाकटे महाराजांकडे बोट करून ) या छोट्या वीराच्या आईच्या अंतकालीं मीं जें त्यांना अभिवचन दिलें आहे, त्यापरमानें यांच्या जिवास किंवा पदवीस मीं यव-ढाबी धोका बसूं देणार न्हाई. त्याबद्दल मीं आपला परानबी खर्च करावा लागला तरीबी करीन.

**दादा**—**थेरड्या**, तुझा अंतकाल आज समीप आला आहे. निमकहरामा, बेशर्म्या,महाराजांची आज्ञा उल्लंघन करण्यास तुला कशीरे शरम वाटत नाहीं ! हं, **प्रधानजी**, तुम्हीं धाकट्या राजपुत्रास घेऊन चला. मीं यांचा बंदोबस्त करतों.

**धाकटे महाराज**—( पुढें सरसावून व तरवार उपसून ) हं, **दादासाहेब**, खबरदार सेनापतींच्या आंगावर हात टाकाल व त्यांस शिव्या द्याल तर. ते महाराजांच्या हुकुमाप्रमाणेंच वा-गत आहेत. तुम्हींमात्र दरबारची अमर्यादा करीत आहां, या-बद्दल संभाळा. तुम्हीं सेनापतीवर हात टाकला, कीं मीं तुमच्यावर टाकलाच म्हणून समजा.

**दादा**—(धिःकारयुक्त ) **धाकटेमहाराज**, तुम्हीं आपली बडबड आतां पुरे करा. तुम्हीं फार बोललां. तुमची वेळ

अजून यावयाची आहे. अजून तुम्हांला जेवावें कसें हें माहित नाहीं. हें तुमच्नें काम नव्हे. लहान तोंडानें असा मोठा घांस घेऊं नये.

( इतक्यांत सिंहासनाच्या पाठीमागचा चिकाचा पडदा उघडून राणीसाहेब बाहेर येतात. महाराज उठून त्यांच्या समीप जातात. त्यावेळीं दरबारांत चाललेल्या गडबडीबद्दल राणी राजास फार टाकून बोलत्ये व राजास या भालेराईबद्दल फार वाईट वाटतें. परंतु निरुपायास्तव तिजबराबर निघून जातो. तेव्हां )

**नरसिंहशा**---शांतपापं ! शांतपापं ! शांतपापं ! काय अन्याय हा ! ! आणि या राजदरबारीं ! आपल्यास येथें क्षणभरही बसणें योग्य नाहीं. ( असें ह्मणून उठून जातात. )

**दादा**---हं, **प्रधानजी**, चला तुह्मीं आतां येथून. ( असें ह्मणून आपल्या सभोंवतीं पाहून कांहीं सांकेतिक खुणा करून आपण सेनापतीच्या आंगावर जाऊन पडला. )

( परंतु तो थोर व वृद्ध योद्धा, हा आपल्या आंगावर चालून येत आहे असें पाहून, किंचित् मागें सरला, त्यासरसी दादासाहेबांनीं साष्टांग नमस्कार घातला. तेव्हां **धाकटे** महाराज व **सेनापती** त्याच्यावर जाऊन तुटून पडले. अशी लठ्ठालठ्ठी चालली असतां दरबारची मंडळी हें भांडण मिटवण्याचा यत्न करूं लागली. कोणी सेनापतीस ओढीत आहेत, कोणी धाकट्या महाराजांची समजूत करीत आहेत, तों दीन, दीन, करीत काळे धिप्पाड सुमारें पंचवीस अरबलोक हातांत नागव्या तरवारी घेऊन आले, व सेनापतीस सलाम करून त्यांतील जमादार बोलूं लागला. )

**जमादार**---**सेनापतीसाब**, आप दादासाबकूं छोड देव, और अपनें रस्तेसें चले जाव. नहींतो बडी मुष्कल होगी.

**सेनापति**---जमादार, तुंम तो हमारा नौकर होके ऐसी क्या बात करते हो. तुंम अपनें मकानपर जाव, और सब लोग समेत तय्यार रहो. और हंम जब बुलावे उसीबख्त हजर होना.

**जमादार**---आपकी बात हंमकुच सुनते नहीं. आप **दादा**साबकूं एकदम छोडदेना. बस्स. ( नंतर धाकटे महाराजांस ) सरकार, आपतो अभी बच्चे हो. येकाम आपका नहीं. आप दादासाबकूं छोडके अलग रहो, और क्या क्या मजा होतीहै, सो देखते रहना.

**राजपुत्र**---अरे चल गुलामा. तूं मला जायला कोणरे सांगणार ? तूंच येथून चालताहो. आला आहे तिथे मला शिकवायला.

**जमादार**---अच्छा **सेनापती** साब, और **छोटे महाराज**, आप हमारी बात सुनते नहीं. बहोत अच्छा. ( नंतर आपल्या शिपायांस ईषारत करतांच ते सर्व पुनः दिन, दिन, करीत सेनापती व धाकटेमहाराज यांच्या आंगावर तुटून पडतात. त्यावेळीं सर्व दरबारचे लोक भयाभित होऊन हे नरपशु काय करीत आहेत हें पहात आहेत, तों ते सर्व त्या उभयतांसह एकाएकीं नाहिसे झाले. )

---

## प्रवेश ५ वा.

**स्थल**---राजवाड्याच्या दक्षिण दरवाज्या पुढील रस्ता.

**पात्रें---रामभट, व्यंकय्या, विठू** व दुसरे हजारों नागरिक लोक.

**रामभट**---अहो, आपल्या व्यंकय्यानें दरबारांत झालेला वृत्तांत सांगितला, तो ऐकलातनां ? तें वर्त्तमान ऐकून माझ्या आंगाचा अगदीं तिळपापड होऊन गेला आहे. केव्हां तो दाद्या माझ्या

दृष्टीस पडेल, व केव्हां मीं त्याच्या मानेचा घोंट घेईन, असें मला झालें आहे.

**विठू**—( गहिंवरून ) त्या चंडाळानें भरदरबारांत मारेकरी घालूनशेनीं आमच्या मोठया इस्वाख़ु सेनापती साहेबांस अन् आपल्या चिमुकल्या महाराजांस पकडून नेलें तवां त्याचे हात कसे हो गळून न्हयीं पडले ! बरं दाद्या, माझ्याशीं गांठ आहे. तुझे, अन् तुकडे तुकडे न्हायीं केले तर माझें नांवच ईटू न्हैं, समजलास.

**नागरिक** लोकसमुदायापैकींएक—अरे तुह्मीं यंव करूं, त्यंव करूं, अशा येथें व्यर्थ गप्पा मारित काय बसलेत. देवदर्शन करून ते लोक परतलेसें वाटतें. ते असे पुढें आले, ह्मणजे कायतो त्यांना हात दाखवा.

**त्र्यंकप्या**—(धांवत धांवत येतो व मोठया लगबगीनें व हळुच) अरे, असे बसलेत काय ? उठा लवकर. ते आले पहा. पण देवळांत काय मजा झाली तो तुह्मीं एकला काय ?

**सर्व**—काय, काय, त्र्यंकप्या, कायरे झालें ?

**त्र्यंकप्या**—ही सर्व मंडली मोठया थाटानें जेव्हां देवळांत गेली, तेव्हां राजोपाध्ये हातांत स्मरणी घेऊन इकडे तिकडे फिरत होता.

**लोक**—मग.

**त्र्यंकप्या—दादासाहेब** सर्व लव्याजम्यासुद्धां आंत गेले, तेव्हां त्यांना तेथें कोणीच खडी ताजिम दिली नाहीं.

**लोक**—बरें मग.

**त्र्यंकप्या**—त्यामुळें त्यांचा मोठा पित्त खवळला, व ते राजोपाध्यास अद्वा तद्वा बोलूं लागले

**लोक**—पुढें काय झालें ?

**त्र्यंकय्या**—तें राजोपाध्यांस न सहनहोऊन तेही त्यांना उलट टाकून बोलले. तेव्हां दादासाहेब त्यांना मारण्यासाठीं त्यांचे आंगावर धांवला. परंतु प्रधानजीनीं त्यांना मागें ओढला, म्हणून उपाध्ये बचावले. परंतु त्यांना कैद करून बरावर आणिला आहे.

**लोक**— अरेरे, काय अनितीचीं एका मागून एक अशीं हीं कृत्यें होत आहेत !

**त्र्यंकय्या**—अरे, ते राजवाड्याच्या त्या कोपऱ्यानजिक आला पहा.

( या वेळीं त्र्यंकय्या वगैरे लोक समुदायानें, युवराजसमारंभाच्या मंडळीवर दगडाचा जो वर्षाव केला, त्यामुळें हत्ती, घोडे, पायदळ वगैरेची मोठी दाणादाण उडाली. दगड, कोण व कोठून मारीत आहेत, हें प्रथम समजेना. परंतु थोड्याचवेळानें जेव्हां समजलें तेव्हां लोकसमुदायावर चाल झाली. तेव्हां उभयपक्षाची मोठी चकमक उडाली. आपण ज्यास मारीत आहों, तो आपला शत्रू आहे किंवा मित्र आहे, हें कोणासच समजलें नाहीं. जो सांपडेल त्यास मारावें, असें चाललें इतक्यांत. )

**दादा**—( ज्या ठिकाणीं लोक अगदीं हात घाईवर आले होते त्या ठिकाणीं आपला हत्ती आणून ) अरे, बघतां काय ? या दंगाकरणारांस ठारकरून टाका. त्यांची अगदीं दया करूं नका.

**त्र्यंकय्या**—**रामभटजी**, आधीं इकडेया ? तुह्मीं तिकडे काय करतो. हा काळ बघा. आधीं याला खालीं ओढा.

**रामभट**—कोणरे आला **त्र्यंकय्या** ? (नंतर नीट पाहून) तूं त्याला भ्यालास वाटतें. अरे या शत्रूंना अगोदर कापून काढूं या. मग त्याला.

**त्र्यंकय्या**—**रामभटजी**,हा दादासाहेब, येथें येऊन आ-पल्या लोकांना उत्तेजन देत आहे. त्यालाच उडवा ह्मणजे झाला. तुह्मीं असा काय करते.

**रामभट**—आधीं या लोकानां आणि मग **दाद्याला**.(असें ह्मणून जी कत्तल चालली होती त्यांत जाऊन मिसळला. )

**दादा**—( मोठ्या रागानें ) अरे या काळ्याला ( त्र्यंकय्याला ) आधीं माझ्या देखत कापारे. अरे कोणी ऐकत नाहीं कायरे?

**त्र्यंकय्या**—अरे तुझा बापाला मारायला कोण येतो तो पाहूंतर खरा. **दादा साहेब**, धाकटा महाराज कुठे आहे तो आधीं आणून द्या. नाहीतर ही बर्चीतला काय ? ( हातांतील बर्ची दाखवून ) तुमच्या उरांत जाऊन बशेल. समजलां.–

**दादा**—( आपल्या जवळच्या सेवकांस ) जारे आधीं तुह्मीं आणि त्या पाजीला जिवंत धरून आणा, ह्मणजे मीं आपल्या हातानें त्याला मारीन.

( आपल्याला धरण्यासाठीं लोक पाठीस लागले आहेत असें पाहून **त्र्यंकय्या** युद्धाच्या गर्दींत शिरला,तो त्यांच्या दृष्टीस पुन्हा पडला नाहीं. उलट त्यांतील एकास जखम झालेली पाहून दुसरा पळाला मात्र. या हाणामारींत लोक समुदायांतील लोक बरेच पडले; पुष्कळांस जखमा झाल्या; व पळून जावें तर सभोंवतीं शत्रूचा गराडा असें शेष राहिलेल्या लोकांवर मोठें संकट आलें. त्यावेळीं कोठें दीन, दीन, कोठें हर हर महादेव; कोठें, आय आई, राम राम राम, असें ऐकूं येत होतें. असे ते नागरिक लोक मोठ्या संकटांत पडले होते. हें छोटेखानीं युद्ध राजवाड्याच्या दक्षण दरवाज्यापुढें चाललें होतें. राजसैन्यानें नागरिक लोकांची अगदीं दाणादाण उडविली, व ते अगदीं हतवीर्य व निर्बल झाल्यामुळें त्यांची कत्तल होण्यास

अवकाश लागला नसता. त्यावेळचा तो कल्होळ, व विलाप ऐ-कून आंगावर रोमांचच उभे राहावे. अशा वेळीं र.जवाड्याच्या तिसऱ्या मजल्यावरून कोणीं मोठ्यानें ओरडत खालीं धाडकन लोकांच्या आंगावर पडला. हें एकाएकीं वरून काय पडलें, याचा फारसा विचार न करतां सर्व सैन्य भयाभीत होऊन प-लायन करूं लागलें.)

**त्र्यंकप्या व रामभट**--( एकदम व आनंदानें ) अरे, हे आपले शूर **सेनापती. त्र्यंकप्या**, त्यांच्या कंमरेला पागोटें आहे तें लवकर तोडुन टाक.

**दादा**--(कांहीं लोकांसह तेथें येऊन सेनापतीस पाहिल्यावर आश्चर्यानें व चपापल्याचें कांहींएक न दर्शवितां त्यांस उद्देशून ) अरे निमकहरामा, बंडखोरा, ह्मातारड्या, उडी मारून येथें पळून आलास काय? कांहीं चिंता नाहीं. आतां तुला जिवंत ह्मणून सो-डावयाचा नाहीं. ( नंतर सैन्याला उद्देशून ) अरे, बघतां काय ? या दुष्टाचें शीर उडवा.

**सेनापती**--( सावध होऊन व आपली तरवार बाहेर काढून दादासाहेबांच्या हत्तीजवळ येतो व ) अरे दुष्टा, मोफत खाऊ, कोणालारे निमकहराम अन् बंडवाला ह्मणतुइस. खबरदार भलतें सलतें बोललास तर. तुझ्या जिभेचे तुकडेच करून टाकीन.

**जमादार**--( मुजरा करून ) **सेनापतीसाब**, आप कायकुं लढते ? बंदेकूं हुकुम फरमाव, उसकुं पकडके अभी आपकेपास लें आतां हूं.

**सेनापती**--कौन, **कन्हयालाल** ?

**कन्हया**--जी सरकार.

**सेनापती**--**जमादार**, ये क्या दंगा है ? सब लोगोंकुं

अपनें घर जाने देव, और, दुसरे **महाराजकू** राजवाडेमें पांचायके पिछे यहां आव.

**जमादार**—(सैन्यांतील लोकांस सेनापतीचा हुकुम सांगतांच आपापलीं शस्त्रें आवरून ते निमुटपणें तेथून निघून गेल्यावर नागरिकलोकांनींही पळ काढला. नंतर दुसरे **राजपुत्र**ही राजवाड्यांत सुरक्षित गेलेले पाहून परत सेनापतीजवळ येऊन ) सेनापतीसाब ?

**सेना**—क्यंव, **कन्हया** ?

**कन्हया**—सेनापतीसाब, सब लोग अपनें अपनें मकानपर गये. अब आपका क्या हुकुम है ?

**सेना**—कां, **दादासाहेब**, तुमची भोवळ अजून जिरली न्हैंई वाटतें ? संध्याकाळीं दरबारांत काय झालें, त्याची आठवण न्हैंई का ?

**दादा**—अरे जा मुरदाडा, तूं काय करायचें आहेस ? तुझ्यासारखे शेंकडों थेरडे माझ्या खिशांत आहेत.

**कन्हया**—**सेनापतीसाब**, ये बदमाष लंबे मूंसे बडी बातें करता है, मुझकों हुकुम करो, इसी बख्त ये चोरका बंदोबस्त करताहूं.

**सेनापती**—अच्छा **कन्हया**, बहुत अच्छा. देखो, ये शेंदाडशिपाईका क्या डर है ! लेकीन **महाराजका** ठपका आवेगा. नहीं तो, इसके पुरजे उडा देऊंगा.

**रामभट**—( सेनापतीच्या कानांत ) **सेनापतीसाहेब**, **धाकटे महाराज** कोठें आहेत ?

**सेना**—( घाबरून ) कां, ते **जमनाबाई** साहेबांकडे गेले न्हैंई का ?

**विठू**—न्हं साब, **धाकटे महाराज** न्हैई आले, ह्मणुनशी **बाईसाब**, आन् **ताईसाब**, अक्सा बोक्सी रडत्याती.

**सेनापती**—कां, **दादासाहेब**, आपला हेतू साधावा ह्मणुनशी आमच्या धाकट्या महाराजास्नीं कुणीकडे नेऊन ठेवलया ?

**रामशास्त्री**—( दादासाहेबाच्या कानाशीं लागून ) यां-च्याशीं फारवेळ बोलण्याची किंवा तंटा करण्याची ही वेळ नाहीं. कांहीं तरी निमित्तानें खालीं उतरा, व एका कोतवाली घोड्यावर बसून येथून चालते व्हा कसे.

**कन्हया**—क्यंव **दादासाब, सेनापतीसाबकुं** जबा-ब देना. ?

**दादा**—जारे हरामखोरानों, तुम्हीं कोण मला विचारणार.

**सेनाप**—**कन्हया**, यहां कुच दगा है ऐसा मालूम पडता है. ये बदमाषकुं छोडके तुंम तपासकरो, और **धाकटेमहाराजकुं** लेकर जलदी आव ?

**कन्हया**—इस काममें दगाजरुर है, ऐसा मेरेभी ध्यानमें आता है. और करीमखा जमादारभी यहां आया नहींथा. ये बडा हरामजादा है. फिकरनहीं. हंम जाके तपास करके, और छोटे महाराजकूं लेके जरुर आताहूं. ये मेरे दस जवान अपनें साथ रखना. अपना जान है तबतक ये तुम्हारे बालकुंजराभी इजा न करनें देंगे. मेरेसाथ दसजवान बस्स है.

( नंतर सर्व निघून जातात. )

**अंक २ रा समाप्त.**

# अंक ३ रा.

## प्रवेश १ ला.

**स्थल**—**रामशास्त्री** वैद्य यांचा वाडा.—**पात्रें. जानकीबाई** ( रामशास्त्र्यांची स्त्री. ) **गोपिकाबाई. उमाबाई. नर्मदाबाई.** ( शेजारणी. ) **रामभट** व **कन्हयालाल** जमादार.

**रामभट**—**जमादारसाहेब**, आपण **करीमखा** जमादाराचे घरीं, तो कोठें व कशासाठीं गेला आहे, परत केव्हां येणार, त्याच्या बराबर कोण कोण आहेत, याविषयीं तपास केला. परंतु त्याची ती कोण बिबी की फिबी, कांहिंच पत्ता लागूं देईना. नंतर आपण सर्व सैन्यांत, पाहरेकऱ्यांपाशीं, पागेंत, अशा अनेक ठिकाणीं तपास करून या वैद्य राजांकडे आलों आहों. आतां येथें तरी ईशकृपेनें पत्ता लागो म्हणजे झालें.

**कन्हया**—**पंडतजी**, हमारे जीकूं बहोत अपसोस हुवा हय. किसलिये, **दादासाब** और ये तुम्हारे **बैद्यराज**, और **वो करीम**, ये तीन्हों बडे नालायख अदमी हय. **छोटे महाराजकूं** लेकर ये लोगोंका भागजानेमें क्या मतलब हय सो भगवत् जाने!

**रामभट**—अहो बराबर आहे. **दुसऱ्या राजपुत्रास** जर युवराजवस्त्रें द्यायचीं आहेत, तर **थोरले महाराजांस** ठेऊन काय उपयोग? त्यांत सर्व प्रजा व अमीर उमराव, हे त्यांनां अनुकूल आहेतना?

**कन्हया**—ये बात तो सच हय ऐसा मालुम पडता हय. देखो, **पंडतजी**, ये **बैद्य**, बडाखराब आदमी हय.

**रामभट**—हो, हो, हें काय विचारतां? त्यांनें तर नीती-

मान, व सर्व गोष्टींनीं उत्तम अशा या राज्यांत, हा वडवांमी पेटवून दिला आहे !

**कन्हया—पंडतजी**, सच हय. अच्छा. यहां तुम तपास तो करो ?

**रामभट**—होय ( असें ह्मणून शास्त्र्यांच्या वाड्यानजिक जातो, व एका खिडकींतून आंत पाहून परत येऊन ) **जमादारसाहेब**, या वाड्यांत जाऊन ह्मणजे आपल्यास कांहीं समजेल, असें मला वाटत नाहीं. परंतु मीं आतां त्या खिडकींतून आंत पाहिलें, तेव्हां शास्त्रीबुवांची बायको, व दुसऱ्या कांहीं बायका बोलत बसल्या आहेत, असें मला आढळलें. तें ऐकून त्यांत कांहीं आपणांस समजलें तर पाहूं चला ? ( असेंम्हणून ते खिडकीपाशीं जाऊन उभेराहून ऐकतात. )

**गोपिकाबाई—जानकी**बाई, अहो, मागल्या जन्मीं तुह्मीं देव चांगला पुजला होता, ह्मणून हें सूख तुह्मांस मिळत आहे. तुह्मांला का कोणत्या गोष्टीचा तोटा आहे ?

**उमाबाई**—खरंच हो **गोपिका**बाई. दैवानं द्यावं न् नशिबानं खावं. अहो मीं थोडीका कटकट घरीं लावत्यें. पण मेलं माझं ऐकतो कोण ?

**जानकीबाई—उमाबाई**, कशाची न् कुणाला हो तुह्मीं रोज कटकट लावतां ?

**गोपिकाबाई**—हें हो काय मेलं विचारावं, **जानकी**बाई. अहो, घरांत यजमानांला. अणखीं कुणाला ? आणि ऐकलंत का? मीं घरांत रोज थोडीका बोलत्यें ? पण ज्याचें नांव तें. ऐकाचं कसंतें ह्मणून नाहीं !

**नर्मदाबाई**—अहो, घरो घरीं त्याच परी. सूख कुणाला नकोका आहे ?–मीं बाई घरांत सांगून सांगून दातांच्या कण्या

केल्या हो ! पण मला रोज ह्मणायचं, " तूं का आमच्यापेक्षां शहाणी आहेस? तुह्मां बायकांची अक्कल काय ती चुलीपाशीं? तुह्मांला आमच्या पुरुषांच्या कामांत काय समजतं " ?

**कन्हया—पंडतजी,** " घरांत, और कण्याचा दात, और चुलीजवळ बायको " ये सुन्नेमें अपना क्या फायदा हय ?

**रामभट—**( नाकावर बोट ठेवून ) हं, जरा गप्प बसा.

**जानकीबाई—**अहो, देवाच्या दयेनं आतां कांहीं आमचे दिवस बरे आले आहेत बरं. नाहीं असें नाहीं. पण तुमचे किनई नेहमींचेच चांगले आहेत हो! नाहीं काहो **उमाबाई** ?

**उमाबाई—** काय अमची वडलार्जित दोन तीन हजारांची नेमणुक आहे तीच ना ? तुमच्या सारखी पूर्वीची पांच दहा हजारांची असून अणखी ही मिळत आहे, असें तर अमचें नाहींना ?

**गोपिकाबाई—**अहो, तुमच्या आपल्या पांच,नीं दोन हजारांच्या गोष्टी कुणीकडे, नीं अमची पांचशांची गोष्ट कुणीकडे ! ह्मणून तर मीं रोज घरांत ह्मणत्यें, कीं शास्त्रीबुवांना तरी एकदां भेटायचं ? ह्मणजे ते **दादासाहेबां**कडून कांहीं तजवीज तरी करतील. पण मला आपलं रोज ह्मणायचं, कीं आपल्याला अनीतीचा पैसा नको. इश्श मेलं, असें काय ? पैसा तो. आपला जिकडून मिळेल तिकडून मिळवावाच. खरंच कीं नई **जानकीबाई** ?

**जानकीबाई—**बाई, तुह्मीं खरं बोललां हो ! आमच्या घरांत जर असं केलं असतं, तर आह्मांला **दादासाहेब** कशास विचारेत, आणि हें मिळालं असतं काय ? ( असें ह्मणून आंगावरील जवाहीर दाखवित्ये. )

**नर्मदाबाई—**बाई, तुमचे शास्त्रीबुवा कीनई, तुमच्या

आपले अर्ध्या वचनांत आहेत, ह्मणून ठिक आहे. त्यांत तुह्मीं पडल्यात दुसऱ्या पणच्या व लाडक्या. मग काय विचारायचं आहे ! असो, पण अलिकडे तुह्मांला नवीन दागिने काय काय केले आहेत ?

**उमाबाई व गोपिकाबाई**—( एकदम ) असं मेलं काय विचारावं तें! आज सगळं राज्य **दादासाहेबांच्या** हातांत व **दादासाहेब शास्त्री** बुवांच्या हातांत. मग कशाचा बाई तोटा?

**जानकीबाई—नर्मदाबाई, उमाबाई, गोपका-बाई**, तुह्मीं कशा घालून पाडून बोलतां तें मीं समजत्यें. पण बाई, मीं तुमच्या सारखी कुठ आहें ?

**गोपिकाबाई**—आमच्या सारखं नसायला काय झालं ! आमच्याहून कांकण भर अधिकच अहां बरं !

**उमाबाई**—( **नर्मदाबाई**च्या कानांत ) **गोपकाबाई जानकीबाई**ना असें लाऊन काय बोलतात या ?

**जानकीबाई**—कां बाई, कानांत कुजबुजायला इथं कुणी परकं का आहे **उमाबाई** ?

**उमाबाई—जानकीबाई**, आतां रात्र झाली. घरीं नाहींका यायचं झालं असेल? म्हणून आपलं मीं चला म्हटलं हो. दुसरं कांहीं कुजबुजल्यें नाहीं.

**कन्हया**— क्यंव **पंडतजी**, हंम येह बात कुच समजते नहीं. इन्के लब लब लब बाताचलते हय. चलो तुंम ?

**रामभट**— ( मनांत ) या दगडोबाला गप्प बसायला एकवार सांगितलें, तरी याची आपली बडबड आहेच ! आणि आपला, ' पंडतजी चलो, ' असें म्हणतोच आहे ! ( नंतर मोठ्यानें व त्रासून ) जरा दम धरा हो.

**कन्हया**-- अभीभी ठेरो ? अरे तेरा भलाहोजावे. अच्छा, तुंम खूष रहो.

**रामभट**— ( हा मोठ्यानें बोलतो हें कोणी ऐकेल म्हणून भिऊन ) अहो जमादार साहेब, जरा गप्प बसा ?

**जानकीबाई**— अहो, अजुन कांहीं निजायची वेळ झाली नाहीं. जरा बसाना ?

**उमाबाई**—कां, **जानकीबाई**. अहो, रोज आम्हीं इथून केव्हां जाऊं, असं होतं, नीं आजचसा हा आग्रह ?

**गोपिकाबाई**—**उमाबाई**, तुम्हीं लहानबिन कीं कायहो ? अहो, आज घरांत शास्त्रीबुवा नसतील नीं काय ? म्हणुन हा आग्रह चालला आहे. हें का तुंम्हाला अजून समजलं नाहीं ?

**उमाबाई**—खरंचका **जानकीबाई**, आज शास्त्रिबुवा घरांत नाहींत ? अग बाई ! मलाहो हें काय ठाऊक ? तरी म्हटलें आज हा आग्रह कां ?

**नर्मदाबाई**—खरंच सांगा **जानकी**बाई, शास्त्रीबुवा घरांत नाहींत का ?

**जानकीबाई**—अहो, आज मोठा हाणामारिचा दिवस-ना ? ह्मणून दोनप्रहरींच बाहेर जायचं झालं. इतक्या लवकर उन्हाचं कुठ जायच, ह्मणून माझ्या मनांत पुष्कळवेळां विचा-रायचं आलं. पण बाई, तसं कसं विचारावं ? ह्मणून आपले आढेवेढे घेऊन एकदां विचारलं.

**गोपिकाबाई**—मग त्यांनीं काय सांगितलं ?

**जानकीबाई**— “ संध्याकाळपर्यंत मला दरबारांत काम आहे. नंतर **अंबाबाईच्या** वनांत जायचं आहे. तिकडून प्रहर रात्रीच्या सुमारास घरीं येईन, ” असं मला जातानां सां-गायचं झालं.

**सर्व बायका**---एवढ्या रात्रीं **अंबाबाईच्या** वनांत तें काय काम आहे बाई !

**जानकीबाई**---तें कुणाला बाई ठाऊक ?

**गोपिकाबाई**---पण आतां प्रहर रात्र तर होत आली, नाहीं का ?

**नर्मदाबाई**---हो, केव्हांच झाली. प्रहर रात्रीचा चवघडा तुह्मीं नाहींका ऐकलात ?

**उमाबाई**---चला तर बाई आपापल्या घरीं. **जान-किबाई**, आह्मीं आतां जातों बरं ?

( सर्व निघून जातात. )

---

## प्रवेश २ रा

**स्थल**---**अंबाबाईच्या** वनांतील एक निबिड झाडी.

**पात्रें**---**राजपुत्र, करीमखां** जमादार, **गुणाजी, अहंमद, साबाजी** व दूसरे मारेकरी.

(दोन तीन मोठाल्या मशाली व पलितें पेटवून मोठा उजेड केलेला होता, तरी दाट झाडी असल्यामुळें तो दूर अंतरावरून व त्या झाडी बाहेरही, लहान दिव्या प्रमाणें दिसे. अशा ठिकाणीं राजपुत्रासभोंवतीं नग्न तरवारी हातांत घेतल्या आहेत अशा क्रूर मारेकऱ्यांनीं गराडा दिला आहे. )

**करीमखां**- कां **धाकटे** महाराज, तुमची भोवळ अजून जिरली की नाहीं ?

**धाकटेम**---तूंरे गुलामा मला विचारणार कोण ? आधीं तूं माझे हात व पाय बांधले आहेस ते सोड ?

**करीम**---हात पाय सोडण्याची गोष्टच सोडून द्यावी ! ते सोडण्यासाठीं का बांधले आहेत ?

**राजपुत्र**---तर कशा साठीं ?

**करीम**---तें तुला आतांच समजेल?

**राजपुत्र**---(रागावून) ‘ अरे तुरे ’ तूं कुणाला ह्मणतोस रे गुलामा ? तुझी जीभच कापून टाकतों पहा आतां ? ( असें ह्मणून हातपाय सुटण्यासाठीं मोठ्यानें जोर करतो. )

**करीम**---असा जोर करून तूं सुटणार काय ?

**राजपुत्र**---अरे, पुन्हः अरे तुरे करतो ?

**करीम**---मग काय अरे तुरे करायला तुझ्या बापाची मला भीति बीति आहे कीं काय ?

**राजपुत्र**---( जोर करूनही सुटत नाहीं असें पाहून रडा वयास लागून ) बरें, तूं अरे तुरे करून माझा बाप काढतोस काय ? मीं आईला सांगेन आणि तिच्याकडून बक्शील तुला कशी शिक्षा करवीन ती ?

**करीम**---बरं बरं, तूं आधीं उठून उभा रहा?

**राजपुत्र**---( रडत रडत) नाहीं रहात जा.

**करीम**---( रागानें ) ऊठ ह्मणून सांगतों, तरी उठत नाहीं, आणि बसला आहे तिथे रडत ? ( असें ह्मणून त्याच्या अंगावर धांऊन जातो. )

**राजपुत्र**---( रडें आवरून व आवेशानें ) पण माझ्याशीं तुझें काय काम आहे, तें अगोदर सांग?

**एकमारेकरी---जमादारसाब**, सांगाकी त्यांस्नीं काय काम तें ?

**करीम**---ऐकरे, ए, **पोरा**, ऐक. तुला उभा करून मारायचं, हें काम आहे, समजलास ?

**राजपुत्र**---( फार भिऊन मोठ्यानें रडूं लागतो. नंतर थोड्या वेळानें कांहीं युक्ती सुचून) बरं **करिमा** तूं

मला पुष्कळवेळां अरे तुरे केलेंस. शिव्या दिल्यास. हें सर्व मीं **महाराजांस** किंवा **आईस** सांगून, तुला शिक्षा करवणार नाहीं, ह्मणजे झालें ना ? आतां सोड बरं मला ?

**करीम**--अरे वाः, हा मोठा आतां लाडांत आला आहे? यंवरे यंव ! गुल गुल गुल कसा बोलतो आहे पहा ?

**राजपुत्र**—( आपल्याला हे लोक खास मारणार असें समजून मोठ्या काकुळतीनें ) बरें **जमादारसाहेब**, तुह्मीं सांगाल तसें मीं करतों. पण तुह्मीं मला मारणार कां हें तरी सांगा ?

**करीम**—तुला काय सांगायचें आहे त्यांत ?

**दुसरा मारेकरी—जमादारसाब**, कह दे इस्कूं ? उस्में क्या हय ? नहीं तो हम कह देते ?

**करीम**—खबरदार तुंम कहेंगे तो ?

**पहिला मा**—क्यंव, हंम कहेंगे तो क्या गुन्हा होयेगा ?

**करीम**—बस बस्स, ज्यादा बात मत करो ?

**राजपुत्र**—मला कां मारतां याचें कारण तुह्मीं कोणीही मला सांगा ? कारण, मीं कोणाला कधीं मारलें नाहीं, किंवा कोणापाशीं कधीं भांडलोंही नाहीं. मग मला कां बरें मारतां ?

**करीम**—ए, **गुणाजी** मीं तमाखु पिण्यास जातों. तूं याला काय कारण तें सांग ?

**राजपुत्र-गुणाजी**, सांग बाबा काय कारण तें ?

**गुणजी—धाकटे महाराज**, मला लई वाईट वाटतिया कीं तुमावर आज हा परसंग आला ? आह्मीं या करीमखानाच्या हाताखालचे, तवां त्यानें आमापास्नीं शपथ घेऊन हथें हें काम करन्याला आणलिया ? पण तुह्मास्नीं मारण्यास कारण तुमच **दादासाबच**.

**राजपुत्र**—कोण, आमचे **दादासाहेब** !

**गुणाजी**—होय, **दादासाब**.

**राजपुत्र**—काय ह्मणतां तरी काय!

**एक मारेकरी**—( गुणाजीकडे बोट करून) इन्होनें जो कुच कह दिया हय वो सब सच्च हय.

**राजपुत्र**—( घाबरून व काकुळतीनें ) अरे पण कशासाठीं, हें मला कृपा करून सांगा तरी ?

**गुणाजी**—तें न्हई बा आपल्याला ठावक.

**राजपुत्र**—तर तें कुणाला ठाऊक आहे बाबा ?

**अहंमद** ( एक मारेकरी ) —मेरेकुं मालुम हय, और हंम कहतेहय. देखो, **महाराज**, आपकूं एक छोटा भाई हय. अच्छा. उनकूं गादी देनेंका **दादासाबका** मतलब है, और दूसरा क्या हय?

**राजपुत्र**—अरे पण कुणाला गादीद्यायची, हें **महाराजांचें** काम कीं **दादासाहेबांचें** ?

**अहंमद**—येह कुच हंम जानते नहीं.

**राजपुत्र**—बरें पण, मीं जिवंत असलों ह्मणून काय करणार? मला ती गादी नको नीं कांहीं नको. पण मला मारूं नका?

**गुणाजी**—तें आमच्या काय हातांत हाय!

**राजपुत्र**—तर तें कुणाच्या हातांत आहे तें सांगा ?

**गुणाजी**—**दादासाहेबांच्या**.

**राजपुत्र**—( आपल्याला वांचविणें यांच्या हातांत नाहीं असें ऐकून, व हे आपल्यास खास मारणार असें मनांत येऊन, मोठमोठ्यानें रडून ) अग आई, अग आई, मला हे मारीत आहेत पहा! मीं कायग आतां करूं ! तुह्मीं तरी कोणीं येऊन मला यावेळीं सोडवा ! अहो **महाराज**, तुह्मीं राजे व मीं तुमचा मुलगा. असें असतां, मला **दादासाहेबांनीं** मारवावेंना!

**दादासाहेब** हे आज तुमच्यापेक्षांही मोठे झाले काय ! **महाराज**, माझ्या धाकट्या भावास तुमच्या मनांत गादी द्यावयाची असेल तर खुशाल द्या? मीं नको नाहीं ह्मणत. पण मला मारूं नका येवढेंच. मीं गादीसाठीं त्याच्याशीं भांडणार नाहीं, आणि जें द्याल त्यांत खुषी राहीन. **जमादारसाहेब**, मीं काय बोललों, तें ऐकलेंना ? माझा जीव वांचविणें तुमच्या हातांत आहे. **जमादारसाहेब**, मला जर तुह्मीं न माराल, तर तुह्मीं मागाल तें मीं देईन.

**एक मारेकरी**—( विनोदानें ) अरे, तुला गादीच मिळत नाहीं, मग आह्मीं मागूं तें तूं कसेंरे देशील ?

**राजपुत्र**—कां, हे माझ्या आंगावरील सर्व दागिने देतों, व आणखीं हवें असेल तर माझ्या आईकडे चला, ह्मणजे तुह्मांला जें हवें तें देईन.

**मारेकरी**—वाः, तुझ्या आईकडे जा, आणि तेथें तूं तिला सांगून आह्मांस कैद करीव, व तुला आह्मीं मारीत होतों असें सांगून आह्मांस मारीव. वाः, खाशी युक्ति. पण हें तूं चांगलें लक्षांत ठेव, कीं असें कांहीं आह्मीं करणार नाहीं.

**करीम**—( तंबाखु ओढून येतो व आपली तरवार बाहेर काढून ) क्यांरे, त्या पोराची बडबड अजून चाललीच आहे काय ? आतां बस्स करा. आपल्याला परत घरीं जाण्यास उशीर होतो. चला एकदां उरकुन टाका, ह्मणजे आपण मोकळे झालों.

**राजपुत्र**—( आंगावर कांटा उभा राहून व भयाभित होऊन मोठ्या काकुळतीनें त्यांची विनवणी करून रडूं लागून ) अयाई, कायग आतां करूं मीं ! ! !

**करीम**—( मोठ्यारागानें त्याच्याआंगावर धांवत जाऊन )

कारे कारट्या, तुला गप्प रहायचें नाहीं काय ? तूं याच्याही पेक्षां मोठ्यानें रडलास, किंवा हवें तें देऊं केलेंस, तरी तुला आतां आह्मीं जिवंत ह्मणून सोडीत नाहीं. चुप्प. अरे, अगदीं गप्प. असा गाढवासारखा काय बसला आहेस ? उठून उभा रहा. ( तो गप्प राहीना व उठून उभाही राहीना व आपण मोठे जमादार साहेब असतां आपला यानें अपमान केला असें मनांत आणून, त्याला लाथ मारून. ) *हा, उठत नाहींस ? तुला कोण हुकुम करीत आहे माहित नाहीं वाटतें ? चल उठ आधीं.

**राजपुत्र**—( या नीचानें आपल्यास लाथ मारली, याचें मरणप्राय दुःख होऊन, संतापानें उठला व ) अरे चांडाळा, नीचा, दुष्टा, तूं मला लाथ मारलीस काय? बरें, आहे, कांहीं चिंता नाहीं. आह्मां राजपुत्रांस लाथ मारून घेण्यापेक्षां ठार मरणें बरें. अरे काळतोंड्या, तूं माझ्या समोर अगदीं उभा राहूंनको. उभा राहशील तर बघ—( असें ह्मणून कमरेची तरवार काढावयास जातो. परंतु हातांत बिड्या असल्यामुळें त्याचा नाइलाज होऊन दांत ओंठ खाऊन व त्याच्याकडे रागानें पाहून ) अरे दुष्टा, अधमा, तूं आपल्याला शूर ह्मणवितोस ना ? अरे, माझ्यासारख्या लहान मुलास मारावयास तुह्मीं आठ दहा असामीं हवे काय ? असेच तुह्मीं शूर वाटतें ? धिक तुमचें जिणें! माझ्या हातांपायांत बिड्या घालून तुह्मीं मला मारणार ! वाः, मोठे शूर खरे तुह्मीं ! अरे, मग एखाद्या मोठ्या वीरास मारावयाचें असल्यास तुम्हांला दाहा पांच पलटणें किरे लागतील ! जर तुह्मीं खरे शूर असाल, तर मला मोकळा करा आणि मग खुशाल मला मारा. तसें मरणें मला लग्नासमान आहे. परंतु असें मरणें, व असें मारणें, हें दोघांसही अयोग्य आहे.

**गुणाजी**—जमादार साब धाकटे **महाराज** म्हणत्या-ती तें खरंखुरंचकी हय? अपुन का शूर न्हई? मग कशापायीं याखीं भ्यावें?

**अहंमद**—देखो सब भाई, यह लडका कैसी मीठी और सच्चीबाता करता हय? आप सब इत्ते अदमी होके, बच्चेके हात पांवमें बीडी रखके इस्कूं मारना, ये नामर्दका काम हय. इस्कूं आगल छोडदेव, पिछे उस्कूं मारनेंकी बात.

**करीम**—( याचप्रमाणें आणखी कांहीं मारेकरी म्हणाले असें पाहून रागानें चवताळून ) अरे निमकहरामानों ! बक्षिसें मिळविण्याच्या आशेनें 'हम यंव करूंगा, और त्यंव करूंगा' अशा आणा शपथा वाहून, आतां असें ह्मणतां कायरे लुचानों? तुमच्या हातून जर हें काम होण्यासारखें नव्हतें तर येथें आलेत कशाला ?

**अहंमद**—( रागावून तरवार उपसतो व आंगावर धांवत जाऊन) देखो **जमादारसाब**, तुंम इस माफक गाल्याद्योंगे, तो आपकुं यहांके यहां साफ करूंगा. पिछे यह लडकेकी बात. तुंम क्या जमादार हुवे, इसखातर ऐसा मूं चलाते क्या? एक बख्त तुंमकूं कहदिया हय? दूसरे बख्त यह समसेरसें तुम्हांरा शीर उडा द्योंगा.

**करीम**—अरे चल मुरदाडा, तुझ्यानें काय व्हायचें आहे ! तुझ्या सारखे असे शेंदाडशिपाई मीं छपन्नकोटी खेळविले आहेत. पण तें असो. या वेळीं मीं गप्प बसतों. तुझ्या दांडगेपणा-बद्दल तुला बक्षीस उद्यां. समजलास गुलामा ?

**अहंमद**—(अत्यंत रागाऊन मोठ्या आवेशानें ) साले, हंमकहते हय तोभी तूं मूं चलाते, और गाल्या देते? अच्छा. आवतुम ऐसे मैदानमें. ( असें म्हणून करीमाच्यां मानेला हिस्का मारून

त्याला पुढें लोटला व ) साले, तुम्हारा जान हम कैसा लेते देख. ( असें म्हणून करीम सावध होत आहे तों, तो, त्याच्या आंगावर धांवला. )

( तेव्हां त्यांची बाचाबाची व लठ्ठालठ्ठी बरीच झाली. इतक्यांत इतर मारेकरी मध्यें पडून त्यांनीं तो तंटा मिटविला. नंतर. )

**करीम**—( अत्यंत लज्जायमान होऊन ) **गुणाजी**, तुह्मीं कोणीतरी या पोराच्या हातापायांतील बिड्या काढा. मग आपण सर्व याचीं छकलें छकलें करून टाकूं.

**राजपुत्र**—( मोकळा झाल्यावर ) मारेकऱ्यानों, तुह्मीं मला मोकळा केलात, हें फार चांगलें केलेंत. आतां वेळ कशासाठीं लावतां ? परंतु माझी एक विनंती ऐका. तुह्मीं मला मारूं नका. मीं तुह्मांला पाहिजे तें देईन. आणि माझ्या बोलण्यावर तुमचा विश्वास नसेल, व मीं तुम्हांला उलट मारवीन, असें तुह्मांस वाटत असेल, तर मीं आपल्या नगरींतसुद्धां येत नाहीं, ह्मणजे झालेंना ?

**करीम**—अरे, तुझें बरळणें आतां पुरे. त्याचा कांहींएक उपयोग नाहीं. आह्मीं तुला मारल्याशिवाय ह्मणून आतां सोडणार नाहीं. तुला तुझ्या देवाबिवाचें नांव घ्यायचें असेल तर घे व मरण्यास तयार हो.

**अहंमद— महाराज**, सरकारकूं कुच कहनेका होय तो कह दे. हंम वोह काम जरूर करूंगा.

**राजपुत्र**- (मोठा दुःखी होऊन रडत रडत ) **अहंमद-साहेब**, कायहो तुह्मांला मीं सागूं ! मज हतभाग्याला आई तर नाहींच. परंतु बाप असून नसून सारखाच आहे! नाहिंपेक्षां मीं

राजपुत्र ना! आणि मजवर हा प्रसंग यावा काय! यावेळीं माझी आई कायती माझी मावशी आहे. तिचा मात्र काय तो माझ्यावर जीव कीं प्राण आहे. ( गाहिंवरून अधिकच रडत रडत ) ती किती चांगली ह्मणून सांगू! तिला असें होणार हें समजलें होतें कीं काय, कोण जाणें! पण ती आज सगळा दिवसभर माझ्यासाठीं रडत होती. तिची माझी एकवार भेट करून दिलीत, तर मीं तुमचे उपकार कधीं ही विसरणार नाहीं. एक हें तरी करा, किंवा मला जिवंत तरी सोडून द्या.

**करीम**—तें कांहीं एक व्हावयाचें नाहीं. तू आपला मरावयास तयार हो.

**राजपुत्र**—( मोठमोठ्यानें रडत ) बरें बाबा, मारा तर मला. ( नंतर रागाऊन ) माझा जीव वांचवा म्हणून मीं तुमची प्रार्थना केली, हेंच अयोग्य काम केलें. आम्हां शूरकुलांतील मुलांस हें योग्य नाहीं. आह्मीं घरांत न मरतां युद्धांत मरावें, हेंच आह्मांस योग्य, असें मला माझ्या गुरूजीनीं ( न्यायाधीशानीं ) सांगितलें आहे. यासाठीं असें करा कीं मीं एकटा एका पक्षाला, व तुह्मीं सारे दुसऱ्या पक्षाला, असे आपण लढूं. यांत तुह्मीं मला माराल यांत शंकाच नाहीं. पण मला समरांत पडल्यानें दुःख होणार नाहीं, व मेल्यावर स्वर्गसुख मिळेल. यासाठीं ही माझी प्रार्थना कसेंही करा, पण ऐकाच.

**करीम**—( जांभई देऊन व आळस जाण्यासाठीं आंगाला आळेपिळे देऊन ) हद्द आहे बा या पोरट्याची! अरे कारट्या, आतां आपली मान खालीं कर, ह्मणजे मीं तुला एकदांचा मारून टाकतों कसा.

**अहंमद**—( सावाजी व इब्राहीम यांच्याशीं ) येह छोकरेके बोल सुनके, पेट कैसा भर जाता है. अहाहा! कैसा अच्छा

लडका है ! लकीन क्या करना ! हंमकूं येह सब मालुम था, तो हंमनें कसम न खालिथी. अभी क्या करना ! या अल्ला ! मेरे हातसेंतो ये काम होनेका नहीं ! लेकीन न करूंगा, तो कसम खालिया है ! या अल्ला, या अल्ला परवर दिगार !

**करीम**—अरे ए पोऱ्या, तूं आमच्या बराबर लढणार काय ? ठिक आहे, हो तयार. लेका, तूं एकटा, व आह्मीं इतके तरवार बहाहुर. तुझे तुकडे नू तुकडे करून टाकूं.

**राजपुत्र**—कांहीं चिंता नाहीं. मीं तयार आहें. तुह्मीं तयार अहां ना ?

( **करीम** दीन दीन दीन करीत सर्वांस त्याच्या आंगावर पडण्यास सुचवितो व ते सारे त्याच्या आंगावर धांवून जातात तों. )

**राजपुत्र**—हं हं हं जरा थांबा. मला देवाची थोडी प्रार्थना करूं द्या.

**करीम**—मग एवढा वेळ जी बडबड लाविली होतीस त्याचवेळेस प्रार्थना केली असतीस तर ? आतां चालला आहे प्रार्थना करायला. कांहीं नाहीं आतां वेळ मिळणार.

**साबाजी**—जाऊंद्या की जमादारसाब. घटकेचा कुठं प्रहर हुतुया ? देवाची परारथना करन्या आड कश्यापायीं येतां तुमीं ? ( राजपुत्राकडे पाहून ) हं, आटपा आतां लवकर.

**राजपुत्र**—( एकाहातांत नग्न तरवार, व दुसऱ्या हातांत ढाल, असे आपले हात जोडून ) हे देवा, मला योग्य मृत्यु मिळत आहे, या बद्दल तुझा व या मारेकऱ्यांचा, मी मोठा आभारी आहें. देवा, मला जो तूं असा मारवीत आहेस तो मीं असा अपराध तरी काय केला आहे ! मला तर वाटत नाहीं कीं मीं कांहीं अपराध केला आहे असें ? देवा,

**दादासाहेब** मला मारवीत आहेत हें खरें. पण त्यांचा तरी मीं असा काय बरें अपराध केला आहे, कीं त्या बद्दल त्यानीं मला ठार मारवावें ! देवाधी देवा, तूं सर्वांचा पिता असून सर्व लोकांचें पालण पोषण करणारा आहेस. असें असतां मला आज मारवीत आहेसना ! देवा, या लोकांनीं मारण्याचेंच काम पत्करलें आहे, तेव्हां त्यानां तें केलेंच पाहिजे. पण तुझ्या हातीं मला वांचविण्याचें सामर्थ्य असतां, तूं मला आज मारवीत आहेस, हाच तुझा दयाळूपणा काय ! हे देवा, काय मीं हतभागी आहे बरें ! पांचसहावर्षांचा झालों नाहीं तों माझी आई वारली. तेव्हांपासून मी व माझी बहिण **ताई**, अशीं आम्हीं पोरकीं झालों. पण तेव्हांपासून आमच्या मावशीनें आमचें पालनपोषण आमच्या आईपेक्षांही अधिक चांगल्या रीतीनें केलें. देवा, मी तर आतां मरणारच, व अंतीं मला सूखही मिळेल. पण माझ्या मावशी आईचें व ताईचें कसेंरे होईल ! त्यांना मजशिवाय या जगांत दुसरें कोणीरे नाहीं ! देवारे, तूंच माझें ऐकत नाहींस, तेव्हां महाराज तरी माझें कां ह्मणून ऐकतील ! देवा, हे देवा, महाराज हे माझे बाप व या देशाचे राजे, आणि मीं त्यांचा मुलगा. पण यावेळीं मारेकऱ्यांच्या हातून मरत आहेंना ! हरहर, हे देवा, काय हा तुझा न्यायीपणा ! देवा, महाराज तर आईचा तिरस्कार करूं लागले. मग तिचें रक्षण कोणरे करील ! मला मारावेंच असें तुझ्या मनांत होतें तर आह्मां तिघांना तरी एकदम मारावयाचें होतें. ह्मणजे कोणी कोणाचा शोक तरी केला नसता. आतां हे देवा, तूं मला मारवीत आहेस, तर असें तरी कर, कीं माझी आई व ताई, हीं याचवेळीं मरतील. असें तूं केलेंस तरच तूं खरा न्यायी. देवा, हे देवा, अरे देवा, अरे ओसुद्धां म्हणत नाहींसना ! ! हायहाय,

कायरे मीं आतां करूं ! या मारेकऱ्यांची मला आतां मोठी भीती वाटूं लागली आहे. या सर्वांच्या तरवारींचे घाव मीं कसेरे सहन करूं ! अरे, एकदां माझें बोट कापलें होतें, त्यावेळीं मीं रडून रडून सर्व वाडा गजबजून दिला होता. आणि आतां तर हे माझ्या सर्वांगाचे तुकडे तुकडे करतील, ते मी कसेरे सहन करूं ! देवा, हे प्रभो, मीं तुला हात जोडतों, कसेंही कर, पण मला जीवदान दे. हर हर, हे देवाधीदेवा, काय तो निकाल लवकर कर. हे पहा मारेकरी माझ्या पाठीस कसे लागले आहेत ते. तुझी पुरी प्रार्थनाही मला हे करूं देत नाहींत. हरहर, हे देवा, मला वांचीव, मला वांचीव, मला वांचीव ! ! !

( असें ह्मणत तो जमीनीवर धाडकन पडला. त्यावेळीं **अहंमदादि** मारेकऱ्यांचे नेत्र पाण्यानें भरून आले. त्यांस राजपुत्र पडला होता तेथेंच त्याला मारा म्हणून **करीम** सांगत असतां त्यांनीं तिकडे लक्ष न देतां ते तटस्थ उभे राहिले. इतक्यांत )

**राजपुत्र**—( खडबडून उठून व जरा आवेशानें ) धिक् माझें जिणें ! व्यर्थ मीं देवाची प्रार्थना केली ! मला मूर्खाला एवढें समजलें नाहींना कीं मीं राजपुत्र ह्मणून मजवर एवढें हें संकट ! आपल्या राज्यांत माझ्यासारखीं दुसरीं थोडीं का मुलें आहेत ! मग त्यांना कोण मारील नाहीं हें ! असो, बाबानों, आतां अगदीं विलंब लावूं नका. मीं तयार आहें ( नंतर मोठ्या आवेशानें हरहर महादेव करून ) मीं आतां कोणाला मारीन हें तुह्मांला समजणारही नाहीं. हं हं हं **करीमा**, संभाळ.

**करीम व दुसरे मारेकरी**—( दीनदीन व हरहर-माहादेव करीत राजपुत्रासभोंवती जमून ) पोऱ्या, तूं आतां कशाचा जगणार

**राजपुत्र**-(मोठ्या रागाच्या आवेशानें) **करीमा**, मवाशीं याच पायानें मला लाथ मारली होती कायरे? ( असें ह्मणून त्यानें जो एक वार केला त्या सरसा, या अल्ला, या अल्ला, या अल्ला करीत एक पाय तुटून तो खालीं पडला. )

**मारकरी**—( एकदम ) अरे पोऱ्या ( असें ह्मणून त्याला मारावयास सर्वांनीं तरवारी वर केल्या तों. )

(खबरदार गुलामानों याला माराल तर, तुमचे तुकडे तुकडे करून टाकूं, असें ह्मणत त्या आंबराईच्या एके बाजूनें एक व दुसऱ्या बाजूनें आठदहा असामी नग्न तरवारी घेऊन धांवत आले. त्या वेळीं एकाएकीं हें अरिष्ट कसें उत्पन्नझालें हें कोणासही समजलें नाहीं व त्यामुळें ते सर्व भयानें गर्भगळित होऊन लटलटां कापूं लागले, व आलेल्या शत्रूंच्या हातीं पायीं पडूं लागले. एका बाजूनें जो एक आला त्यानें **राजपुत्रास** पोटाशीं धरून त्याच्या शौर्याची मोठी तारिफ केली. दुसऱ्या बाजूनें जे आले, त्यांतील पुढाऱ्यास पाहून व ओळखून, ते मारेकरी एक सारखे खालीं पाहूं लागले, व ह्मणाले. ' **कन्हय्यालाल** जमादार साब', हमारे हातसें ये बडी तकसीर हो गई है. गुन्हा माफ करो, नहीं तो हम तुह्मारे बंदे हैं. च्याहे वैसा करो.

**कन्हया—अधीरसिंग**, देखते क्या? ये सब निमक हराम है. इस्कूं बांधके मेरे पिछे जलदी आव.

( त्यांच्या मुसक्या बांधून कन्हयालाल व तो नवखा मनुष्य चालले होते त्यांच्या पाठीमागून त्यांना चालवीलें. त्या पैकीं कांहीं **करी**मास उचलून घेऊन चालले होते. )

---

## प्रवेश २ रा.

**स्थल**—राजवाड्यांतील राणीचा महाल.

**पात्रें—राजा, राणी, दादा साहेब, वैद्य, प्रधान, सेनापती, जमनाबाई** व इतर चाकर माणसें.

**दादा**— ( आंगातील रक्तानें भरलेले कपडे तसेच ठेऊन बिछान्यावर पडून व मोठा शोक करून ) **महाराज** सरकार, मींच तेव्हढा करयाला परत आलों हो ! काय तो काळोख, नीं काय तो भयंकर देखावा! ती गोष्ट मनांत आली ह्मणजे आंगावर कसा कांटा येतो पहा !

**महाराज**—**दादा** साहेब, तुह्मीं आधीं सावध व्हा, आणि मग काय झालें तें सांगा. अरे कोण आहेरे तिथे ?

**हुजऱ्या**—जी **सरकार**, काय हुकुम हय ?

**राजा**—अरे, **प्रधानजी** आणि **दादा** साहेबांचे **वैद्यराज**, यांस बलावून आण.

**दादा**—( आंगाला मोठ्यानें आळे पिळे देऊन व एक आरोळी ठोकून ) हं, हं, **धाकटे महाराज**, जपून व मोठ्या सावधगिरीनें बरें. एकदम आंगावर जाऊं नका. आह्मीं त्याला जर्जर करतोंच. शेवटचा वार तेवढा तुह्मीं करा.

**राणी**—( हें **दादासाहेबांचें** असंबद्ध बरळणें ऐकून घाबरून रडत रडत जवळ जाऊन ) **दादा, दादा**, अरे **दादा**, असं बरळतोस काय ? व तुझ्या अंगाला रक्त कशाचें लागलें आहे ?

**दादा**—(**राणी** जवळ आली होती तिला हिसडून,) बस, बस. आधीं त्या वाघाला जर्जर करून **धाकटेमहाराजांच्या** हातून मारविणार, त्यांची शौर्याच्या कामांत वहावा करविणार, आणि मग कायतो पुढचा विचार.

( इतक्यांत **वैद्यराज** व **प्रधानजी** येतात व **राजास** मुजरे करून बाजूला उभे राहतात. )

**राजा**—( वैद्याकडे पाहून दुःखानें ) **वैद्यराज**, ही आमच्या **दादासाहेबां**ची काय अवस्था झाली आहे पहा ! त्यानां काय झालें आहे हो ?

**वैद्य**—( **दादा**साहेबांजवळ जाऊन त्यांचा हात घेऊन नाडी पाहून व सर्व शरीर तपासून) वायूचा मोठा जोर आहे !

**दादा**—( डोळे उघडून त्यांजकडे पाहून ) अरे दुष्टा, तुलारे माझ्याजवळ यावयास कोणीं सांगितलें ? मीं कोणत्या कामांत गुंतलों आहें तुला माहित नाहीं काय ? चल जा येथून अगोदर. ( नंतर ) अरे **गणोजी** बारगीर, संभाळ बरें. धाकटे **महाराजांस** इजा झाली कीं तुझें डोकें उडालेंच ह्मणून समज.

**वैद्य—सरकार**, **दादासा**हेबांस पित्त व संतापवायू झाला आहे. त्यांना औषधोपचार करण्यापूर्वीं त्यांचा हुजऱ्या त्यांच्याबराबर बाहेर गेला असेल, त्याला कोणीतरी बलवारे?

**चोपदार**—( हुजऱ्याला बलावून ) **वैद्यराज**, हा **दादासा**बांचा **हुजऱ्या** आला हई. त्याचे सोबती सांगत्याती कीं तो आल्यापासून एकसारखा रडतच हई. काय झंगून रडतोस असें इचारलें, तरीबी बोलत न्हई.

**वैद्य**—अरे **गणोजी**, असा इकडे ये ?

**गणोजी**—( रडत रडत ) जी साब.

**राजा**—अरे तूं रडतोस कां ? तुला येथें कोणी मारीत नाहीं. तूं **दादासाहेबां**बरोबर गेला होतास ना ? तुह्मीं कोणकोणरे गेलां होतां ? आणि कशासाठीं व कोठें गेलां होतां ?

**गणोजी**—(रडत रडत ) **महाराज**, **दादासाबां**-बराबर मीं गेलों व्हतों.

**वैद्य**— ( नेत्रसंकेतानें कांहीं खुणा करून ) तुमच्याबराबर आणखीं कोण होतेरे ?

**गणोजी**—( अधिकच मोठ्यानें रडून ) मीं, **दादासाब** व आणखीं पांच सहा शिपाई असे व्हतों.

**राजा**—तुह्मीं रात्रीचे कुणीकडे गेलां होतां रे ?

**गणोजी**—( रडत रडत व भीत भीत) **महाराज, दादासाब** आमास्नीं हंगाले कीं **धाकटे महाराज अंबाबा**-ईच्या रानांत रागाऊनशी गेल्याती, त्यांस्नीं आणायास चला जाऊं?

**राजा**—काय, काय, **धाकटे महाराज**, नीं रात्रीचे रागाऊन रानांत गेले ! छः, असें होणार नाहीं. कोण आहेरे तेथें, इकडे ये ?

**हुजऱ्या**—जी **सरकार**.

**राजा**—आतांच्या आतां दोन पालख्या घेऊन जा आणि **जमना** व **ताईस** घेऊन ये.

**दादा**—( वैद्यानें कानांत कांहीं सांगितल्यामुळें वायूची लहर आल्यासारखें करून उठून धांऊं लागून) अरे चला. हं. मारा, मारा, सोडूं नका, जाईल बरें ?

**राजा**—(घाबरून व खरोखरीच वायू झाला आहे असें समजून ) अरे त्या दुसऱ्या **वैद्यराजांस** बलावून आणारे ?

**राणी**—**सरकार**, माझ्या **दादाला** काय हो झालें ! तो असा बरळतो कां बरं ?

**राजा**—(मोठ्या विवंचनेंत होता तरी बाह्यात्कारी ) **प्रिय सखे**, त्यांना संताप वायू झाला आहे. औषधी उपाय चालले आहेत, व मीं दुसऱ्या वैद्यासही बलावणें पाठविलें आहे. ते आतां बरे होतील. तूं अशी घाबरतेस कशाला?

( **दादासाहेबांचें** बरळणें, पलंगावरून उडी मारणें, त्याला सर्वांनीं धरणें व आंथरुणावर नेऊन निजविणें, औषधोपचार करणें, हें चाललें आहे. **राजा राणी** मोठ्या काळजींत बसलीं आहेत इतक्यांत )

**हुजऱ्या**—**महाराज**, **जमनाबाई** साब व **ताई** साब आल्याती. **वैद्यराज** बी आल्याती.

**राजा**—**जमना**, धाकटे **महाराज** कोठें आहेत ?

**जमना**—( अत्यंत घाबरून परंतु मोठ्या नम्रतेनें ) **म-हाराज**, **दादासाहेब** संध्याकाळच्या प्रहर दिवसास आपण बलाविलें असें सांगून त्यांना इथ घेऊन आले. तेव्हांपासून ते अजून घरीं परत आले नाहींत. मीं समजल्यें ते आपल्याजवळ आहेत ह्मणून. तरी मला चैन पडेना, ह्मणून मीं दोन वेळां **त्र्यं-कय्यास** शोधासाठीं पाठविलें. तेव्हां एकदां दादासाहेब भेटले. त्यानीं सांगितलें कीं धाकटे **महाराज** आज रात्रीं यायचे नाहींत ह्मणून. **महाराज**, ते कुठ आहेत हो !

**राजा**—( **धाकटे महाराज** आज दरबारांत होते याचें स्मरण होऊन रागानें) **प्रधानजी**, **धाकटे महाराज** दरबा-रांतून घरीं गेले किंवा नाहीं याचा तपास तुह्मींही करूं नये काय?

**प्रधान**—(घाबरून) **महाराज**, ते **दादा साहेबां** बरोबर होते ह्मणून अधिक चौकशी केली नाहीं. पण आतांच्या आतां सर्व नगर धुंडाळून त्यांस घेऊन येतों. मला आज्ञा असावी.

**राजा**—बरें आहे **प्रधानजी**. या **गणोजीला**ही आप-ल्याबराबर घेऊन जा.

**गणोजी**—( अधिकच मोठ्यानें रडत ) **महाराज**, मीं आतां कुणीकडे व कस्सला जाऊं ! **धाकटे महाराज**, मीं काय हो **महाराजांना** आतां सांगूं! मलाच परतें त्या वाघानें तुमच्या बद्दल कां नाहीं खाल्लं. ( असें ह्मणून मोठ्यानें रडूं ला-गतो. )

**राजा**, **जमनाबाई** व **ताई**—( त्याच्या सभोंवती जमून

अत्यंत दुःखानें व काकुळतीस येऊन )बाबा, असें काय ह्मणतोस तें सांग तरी ! !

**गणोजी**—**महाराज**, काय सांगूं ! **धाकटे महाराज** रुसूनशी **अंबाबाईच्या** रानांत गेले व्हते, ह्मणून त्यांची समजी करूनशी **दादासाब** त्याह्लीं घेऊन येत व्हते.

**जमना**—( यावत् जन्मांत कधीं घाबरली नव्हती अशी घाबरून व मोठ्यानें रडत ) अरे बाबा, मग पुढें काय झालें ? त्यांची समजूत नाहीं का मग झाली?

**गणोजी**— तसें न्हव **बाईसाब**. आमच्या **दादासाबांनीं** त्यांची लई समजूत केली. "तुमच्यावर माझा जीवकापरानहे" असेंबी सांगितलें. पन ते ऐकतचना.

**जमना**—तो कां रुसला आहे हें मीं समजल्यें. चल बाबा, मीं तुझ्या बराबर येत्यें. मला तो कुठ आहे तो दाखीव ?

**दादा**—( वायूची एक मोठी लहर आल्या सारखें करून) अरे अरे अरे अरे अरे अरे ! अरे चांडाळानों ! अरे, त्या वाघानें त्यांना धरलें नारे ! अरे त्याला मारा व त्यांना वांचवा. अरे, असे भीतां काय? गुलामानों, मी वार करतों त्या प्रमाणें वार करा व त्यांस सोडवा. ( असें ह्मणून वारकरण्याचा आवेश करून आपले दोन्हीं हात बिछान्यावर आपटतो व बेशुद्ध पडतो. )

**राणी**—( घाबरून ) वैद्यबुवा, हें पहा हा काय करतो तो !

**राजा**—( दुःखाग्नींत पडला होता तरी ) प्रिये, अशी घाबरूं नको, ते लवकरच बरे होतील. ( गणोजीला ) अरे, तूं हा पाल्हाळ काय लाविला आहेस ? धाकटे महाराज कुठें आहेत तें एकदां लवकर सांग ? तूं त्यांच्या बराबर होतास म्हणून तुला किंवा त्यांना कोणी शिक्षा करीत नाहीं.

**गणोजी**—( पूर्ववत मोठ्यानें रडत ) **महाराज** मीं काय सांगू आतां !

**राजा**—( रागावून ) जारे सेनापतीस बलावून आण?

**जमना**— ( गांगरून व दुःखानें ) **महाराज**, कायहो आतां करावं ! कसाहो माझाबाळ रानांत एकटा राहिला असेल ! अरे देवा, त्याचें रक्षण कर !

**राजा**—( दुःखानें मोठा सुस्कारा टाकून ) अरे चांडाळा, तूं सांगत नाहींस काय? बांधारे या गुलामाला जेरबंदानें.

( चाकर लोक त्याला धरून त्याचे हात बांधितात. )

( **दादासाहेबांस** पूर्ववत वायूचे झटके येतच होते. इतक्यांत **सेनापती** येतात व **राजास** मुजरा करून जवळच उभे राहतात. )

**राजा**—**सेनापती**, तुह्मांला कां बलाविलें समजलें?

**सेनापती**—नाहीं **महाराज**.

**राजा**—हे **दादासाहेब** कसे बेमार झाले आहेत पहा. हा **गणोजी** सांगतो कीं धाकटे महाराज रुसून अंबाबाईच्या रानां गेले आणि दादासाहेब त्यांस समजावून आणावयास गेले होते, पण ते कांहीं आले नाहींत. तर तुह्मीं आतांच्या आतां जाऊन त्यांस घेऊन या. तुह्मीं येईपर्यंत मी तुमची वाट पहात बसतों.

**सेनापती**—हुकुम **सरकार**. मीं हा चाललों. परंतु **सरकार** माझी एक इनंती हय.

**राजा**—बोला कायती लवकर ?

**सेनापती**—**धाकटे महाराज** रुसून रात्रीच्या प्रहरीं रानांत एकटे जाणार न्हईत आणि—

**राजा**—आणि काय ? वेळ लावूं नका.

**सेनापती**—**महाराज** रागावणार नाहींत तर बोलतों.

**राजा**—( रागानें ) बोला हो कायतें लवकर.

**सेनापती**-**सरकार**, दरबारांत काय प्रकार झाला तो मनांत

आणा, ह्मणजे **दादासाब धाकटे महाराजांची** समजूत करायास जातीलसें वाटत न्हई. आणखीं **दादासाबनीं** मला व धाकटे **महाराजांस** दरबारांत मारेकरी घालूनशी धरून न्हेलं व्हतं. पन आपल्या पायांच्या पुण्याईनें मीं सुटलों. **धाकटे महाराजांस** मात्र कुणीकडे न्हेलं म्हाईत न्हई ?

**राजा**--**सेनापती**, तुम्हीं काय म्हणतां ? तुम्हांस व **धाकटे** महाराजांस मारेकऱ्यानीं पकडून नेलें ! आणि तें दरबारांत! ( असें म्हणून तरवारीस हात घालतो. )

**वैद्य**—(राणीस हळूच) **आईसाहेब**, आतां सर्व आपल्या हातांत आहे. सर्व उघड झालें म्हणजे मीं व **दादा साहेब** गेलोंच ह्मणून समजा.

**राजा**—( **राणी** मोठ मोठ्यानें रडत आहे असें पाहून मुलाच्या काळजीनें जरी अगदीं वेडा झाला होता तरी राणीजवळ जाऊन ) प्रिय सखे, तूं एकाएकीं अशी रडतेस हें काय बरें ! तुला काय झालें ? **दादासाहेबांबद्दल** तुला वाईट वाटत असेल तर त्यांच्याबद्दल तूं अगदीं काळजी करूं नको ?

**राणी**--( रडत रडत ) माझा **दादा** असा आजारी पडला आहे ही एक काळजी, आणि ते **सेनापती** आपल्याला दादा बद्दल भलतें सलतें सांगताहेत, तें ऐकून आपण काय कराल नीं काय नाहीं, काय सांगावें, ही दुसरी काळजी !

**राजा**--**दादासाहेबांनीं** कांहीं केलें असलें म्हणून काय झालें ? मीं, आणि त्यांना शिक्षा करीन ! असें कधीं होणें नाहीं. पण ( सेनापतीकडे वळून ) तुम्हीं एकदमचालतेव्हा ?

**सेनापती**—**गणोजी, धाकटे महाराज** कोठें आहेत तें चल मला दाखीव?

**गणोजी**—मीं मगा न्हईंका सांगितलें **सेनापतीसाब**, कीं जाऊनशी काय दावूं म्हणून?

**सेनापती**— ह्मणजे कायरे?

**दादा**—( पुन्हापूर्ववत मोठ्यानें ओरडून ) अरेरेरेरेरेरे, कायरे हा घात झाला! हायहाय, **महाराजांस** मी आतां काय सांगूं!

**गणोजी**—ऐकिलें **सरकार, दादासाब** का बोलत्याती तं?

**राजा**—अरे, **दादासाहेब** वायूच्या लहरींत बडबडताहेत. परंतु चांडाळा, तूंच कायतें सांगेनास?

**वैद्य**—( सांगण्याविषयीं नेत्रसंकेतानें खुणाकरून ) अरे बा, काय असेलतें सांग एकदां? आमच्यानें आतां धीर धरवत नाहीं बाबा.

**सेनापती**—( रागानें त्याच्या आंगावर धांवत जावून ) बोल लेका, न्हई तर तुला साफ केलाच ह्मणून समज. ( असें ह्मणून तरवार बाहेर काढतो. )

**गणोजी**—**महाराज, दादा सा**बानीं धाकटे **महाराजांची** समजूत करूनशीआमीं समदे नगरांत येत व्हतों तवां—

**राजा व जमनाबाई**—( अत्यंत घाबरून ) अरे मग काय झालें?

**गणोजी**—काय सांगूं **बाई साब**! ( रडूं लागतो. ) वाटेंत एक लई मोठा वाघ आला.

**राजा व जमना**—( दुःखानें गांगरून ) कोण आला, वाघ? अरे देवा!

**गणोजी**---व्हय **सरकार.** आमीं समद्यांनीं त्याला ठार मारण्याचा लई बेत केला पन फसला, आ—

**सेनापती**—आणि त्या वाघानें काय केलें ?

**गणोजी**—(मोठ्यानें रडत रडत) उडी टाकली नीं त्यांना तोंडांत घेऊन प---

**राजा व जमना**— ( हें ऐकतांच धाडकन जमीनींवर पडून व फार शोक करून ) हे **प्रभो,** काय हा आमच्यावर प्रसंग ! ( असें म्हणून **ताईस** पोटाशींधरून रडूं लागतात. )

( त्याचप्रमाणें तेथें असलेली मंडळीही शोक करतात. )

## अंक ३ रा समाप्त.

---

## अंक ४ था.

### प्रवेश १ ला.

**स्थल**—रामशास्त्र्यांचा वाडा.

**पात्रें—रामशास्त्री, जानकीबाई** ( त्यांचीस्त्री ) देवडीवरील शिपाई, भिक्षेकरी बुवा इत्यादि.

**शिपाई**— ( देवडी उघडी आहे अशावेळीं एक तरुण व तेजःपुंज बैरागी, कांखेस एक झोळी व एका हातांत कुबडी व चिमटा व दुसऱ्या हातांत भिक्षा घेण्याचा लांब काळा कटोरा घेतलेला असा येऊन 'जयसीताराम' असें म्हणत दुसऱ्या दोन तीन बैराग्यांसह औंत जात आहे असें पाहून ) अरे, ए बैरागी, कुठरे आंत चाललास ? आंत जायचें न्हई ? थतच उभा ऱ्हाकी ?

**बैरागी**—स्यंव, तुंम यहां बैठनेवाला सिपाई हय क्या ? अच्छा. यहां कुच पांच मूर्ती कूं सीधा मिलेंगा?

**शिपाई**---अरे येड्या, हत मूठभरभिक न्हई मिळायची तर पांच मुरतीस्रीं सिधा कुठूनशी मिळनार?

**बैरागी**---क्या, इतने बडेबाडेमें कोई सरदार रहता होयगा, और, वो साधूकूं रोटी नहीं खिलायेंगा ? वाः, येतो बडी अजबकी बात हय !

**शिपाई**---अरे बाबा, तुमाल्लीं मूठमूठ भिक हवी असेल तर घ्या, अन जा. न्हाई तर बसा हाका मारीत?

**बैरागी**-- ( आपल्या बरोबरच्या बैराग्यांच्या कानाशीं लागून ) अंदर चलो तो सई भला?

**शिपाई**--अरे, ए, बैरागड्या, खबरदार आंत जाशील तर.

( अशी आंत जाण्याविषयीं बैराग्यांची व त्या शिपायाची बोलाचाली होत आहे तों **रामशास्त्री** जेऊन चौकांत आले व झोपाळ्यावर बसले. )

**जानकीबाई**---( शास्त्री बुवांस विडा देऊन ) देवडीवर कोण आहेरे ?

**शिपाई**---जी **बाईसाब**, मीं हय कीं ?

**जानकीबाई**---तूं आहेस तर मग देवडीवर गडबड कशाची चालली आहे?

**शिपाई**---हे चार पांच बैरागी आल्याती अन् मपाशीं शिधा मांगल्याती?

**बैरागी**---(आंत येऊन **शास्त्रीबुवांस**) **रावशाब**, दत्तअवधूत्त तेरा भला करेगा. ( नंतर **जानकीबाईस** ) माई, दत्त-अवधूत्त तेरेकूं बेटा बेटी देंगा, और तेराभी भला करेगा.

**शास्त्री**---दत्तअवधूत्त आमचें बरें करील व आह्मांस त्यांच्या कृपेनें मुलगे मुली होतील, हें आह्मांस सांगायला तुह्मी-रे कशाला पाहिजे? चाल्ले तिथ भलभलतें बोलायला? लेकांना

भिक्षा मागायची, तर भिक्षा मागावी ? असें होईल नीं तसें होईल, हें सांगायला कशास हवें ?

**बैरागी**—**महाराज**, घुस्सा मत करो. सीधा देनेका तुह्मारा दिल नहीं होय तो न देवो. तुह्मारेउपर हमारा कुच जोरा नहीं ?

**जानकीबाई**—असें काय मेलें करायचें तें? पांच असामींनां पांच शिधे दिले ह्मणून तोटा का व्हायचा आहे ? कोणरे तो ? **रामा**, यांना चांगले पांच शिधे आणून दे. समजलास ?

**रामा**—जी **बाईसाब**.

**बैरागी**— **रावसाब** आप तो सरदार हो, और येमाई तो केवल लछमी हय, और हंम तो साधू हय. भिक्षा मांगके पेट भरने वाले. एक घर न मिले, तो दस घरजायेंगे. लेकिन हंम एक बात कहते हय, सो सुनिये ?

**शास्त्री**—काय सांगतोस तें सांग ?

**बैरागी**—आपकों देखके हमारे दिलमें ऐसा ख्याल आता हय कीं ये राजदरबारमें तुह्मारा बोलबाला अच्छा हय. हमारे ध्यानमें येह बातबी आती हय कीं तुंम आजतलख बहोत बडे बडे काम किये हय. आपके रुवाबसें ऐसा मालूम होता हय के आप चाहेसो कर सक्ते हय.

**शास्त्री**—(आपली स्तुती ऐकून मोठा खूष होतो व) तूंरे हें कशावरून ह्मणतोस आणि तुला आमच्याविषयीं काय माहिती ?

**बैरागी**—हंमकूं क्या मालुम ? दत्तमहाराज सब कुच्छ जानते हय. उनूके कृपासें हंम कहते हय. क्या कहों रावसाहेब ! हंम जो कुच्छ बोलेंगे उसपर आपका भरोंसा होय तो अच्छा. नहीं तो हम लाचार हय !

**शास्त्री**—अरे तुझ्या मनांत जें काय असेल तें तूं निर्भयपणें बोल ? तुझ्या बोलण्यावर माझा विश्वास आहे.

**बैरागी—रावसाहेब**, मुझकों जो कुच्छ बोलने का हय सो येही हयकी, येहसब राज तुंम अपनें अक्कल हुषारीसें करतेहो. इहनगरी का राजा, और दूसरे सब लोग,आपके अखत्यारमें हय.

**शास्त्री**—( फारच फार खूष होऊन ) बुवाजी, तुम्हीं तर सर्व कांहीं चांगलें जाणतां? तुम्हांला आणखीं काय पाहिजे असेल तें मागा?

**बैरागी—रावसाहेब,** तुमतो राजाहो. च्याहिसो धेंगे. लेकीन हम साधूलोक. हंमकों कुच्छ नहीं चैये. हंम एक बात कहेते सो सुनूके, जैसी आपकी मर्जी होय, वैसा करो.

**शास्त्री**—काय सांगतोस तें सांग पाहूं?

**बैरागी**—इस नगरीके बाहर एक दत्तजीका मंदीर हय. वहां आप हर गुरुवारके दिन रातकों जाके भजन पूजन करो. ऐसा तुम करोंगे, तो दत्तअवधूत्त तुह्मांरी, मन कामना जो होय, सो पूरी करेंगे.

( नंतर सर्व निघून जातात. )

---

## प्रवेश २ रा.

**स्थल—जमनाबाईचा** वाडा.

**पात्रें—जमनाबाई**, तिची **दासी**, **त्र्यंकय्या**, **वि-ठूशिपाई**, **बैरागी** वगैरे.

**बैरागी**—( देवडीवरील शिपायास ) क्यंव सिपाई, इस बाडेमें कौन रहेताहय?

**शिपाई—जमनाबाई साहेब** राहतात.

**बैरागी**—हंमकों अंदर जानेकों हुकुम हय?

**शिपाई**—जराबसा, मीं ईच्यारून येतों. ( असें ह्मणून

आंत जाऊन कांही वेळानें **विठूस** घेऊन यतो. )

**विठू**—**बैरागी महाराज**, तुमास्नीं आमच्या **बाईसा**-बांची भेटहवी व्हय. ?

**बैरागी**—हां. तुह्मांरे **बाईसाब** की मुलाखत चहिये. हम कों जोकुच्छ मंगनेकाहय, वोदेना तुह्मांरे हातमें नहीं ?

**विठू**—चलायातरआंतमंदीं ?

( असें ह्मणून **जमनाबाई** तुळशीची पूजा करीत होत्या तेथें त्यांना घेऊन गेला. )

( **जमनाबाई** पूजाकरीत आहेत असें पाहून **बैरागी** फार खूषझाले वत्यांची पूजा आटपे पर्यंत तसेच उभेराहिले. नंतर **जमनाबाई** प्रदक्षणा घालूं लागल्या तेव्हां त्यांचें तिकडे लक्षगेलें व )

**जमनाबाई**– ( **बैराग्यांस** बसावयास सांग ? असें नबोलतां खुणेनें व्यंकय्यास सांगत्ये. परंतु तें त्याला समजेना ह्मणून ) हं ( असें ह्मणून हातानें बसावयाची खूणा करिते. )

**व्यंकय्या**—**बैरागी** बुवा, अमचे **बाईसाब** तुह्मांला बसावयास सांगते, तरतुह्मीं बसा.

**जमनाबाई**— ( बैरागी बसलेले पाहून प्रदक्षणा घालणें आटपल्यावर तूलसीजवळ बसून ) कां महाराज, मज हतभागी व पापिणीपाशीं आपल्यासारख्या साधूंचें काय काम आहे, तें सांगा ? माझ्या हातून होईल तर मीं तें मोठ्या आनंदानें करीन.

**बैरागी**–(जमनाबाईविषयीं मनांत अत्यंत पूज्यबुद्धी उत्पन्न होऊन ) **बाईसा**हेब, इहगांमके सबलोग आपकी बहोत तारिफ करते हय. हंम तीरथजात्रा करनेवाले. यहां कूच्छ रहनेवाले नहीं. इस्वास्ते मनमें ऐसा आया कीं आपका दर्शन लेके यहांसें जाना.

**जमनाबाई**—काय, लोक माझी तारिफ करीत होते! आणि ह्मणून तुह्मीं मला भेटण्यासाठीं आलां ! अरे देवा ! मी तर महा-पातकी, चांडाळीण व हतभागी आहें. माझें तें दर्शन तुह्मीं काय घेणार ? असो पण, तुमचे पाय माझ्या घरीं लागले हाच मजवर तुमचा मोठा अनुग्रह झाला, असें मीं समजल्यें.

**बैरागी**—( आपल्याशीं ) वाः वाः, क्या मिठी मिठी बात ये कहेते हय ! ( नंतर मोठ्यानें ) आपकूं सब लोग अच्छा कहते हय, और आप ऐसी कैसी बात करते हो! हम कुच्छ ये समजते नहीं ?

**जमनाबाई**—मी कशी पापी व हतभागी आहें हें काय तुह्मांला सांगूं ! ( मोठ्यानें सुस्कारा टाकून) **नारायणा !** हे **देवा !** मला तूं आतां या दुःखांतून लवकर सोडवशील तर बरं ! माझ्यानें कांहीं हें दुःख आतां सहन करवत नाहीं ! ( असें म्हणून रडूं लागल्ये. )

**बैरागी**—( दुःखी होऊन व आपल्याशींच) हे भगवान्! यक्या हुवा ? ( नंतर **जमनाबाईस** ) **बाईसाहेब**, आपरोते किसलिये ? ऐसा क्या हुवा ? (ती अधीकच रडूं लागली असें पाहून व गहिंवरून ) **बाईसाहेब**, तुमकिस सबब रोते हो, सो मेरेकों कहो ? तो भगवान शंकरजीकों हमभी आपके तरफसें अरज करेंगे. (हें ऐकून **जमनाबाई** फारच रडूं लागली तेव्हां )

**त्र्यंकय्या**—**बुवासाहेब** आमची बाईसाहेब फारच रडतो. याचा कारण मीं सांगतों ऐका. आमच्या या बाई-साहेब **महाराजां**ची पहिले राणीची बहिण आहेत. त्या मेल्या व त्यांचा मुलगा व मुलगी आमची बाईसाहेबापाशीं होतीं—

**बैरागी**--अच्छा, पिछे क्याहुवा ?

**विठू**--अरे पुढें काय झालें तें तुला काय सांगावं ! ( **जमनाबाई** अधिकच रडुंलागल्या ह्मणून ) **बाईसाब**, असें का बरं करतां ! रोजनीं रोज दुःख केल्यानें का धाकटे **माहाराज** परत येत्याती ? आलं आमच्या समद्यांच्या नशिबीं त्याला काय करायचें! त्याबगा **ताईसाब** कशा मिळीं मिळीं रडत्याती ! त्याह्मीं उगं करावं कीं आपणच रडावं ?

**जमनाबाई**-- (रडत रड ) बाबारे, मीं काय करूं ! मला चैन ह्मणून कसें तें अगदींच पडत नाहीं. माझ्या कीनई तो दिंवसा रात्रीं नजरे आड होतच नाहीं ! त्याला मीं तरी काय करूं ! बाबारे, मला रडण्याची हौंस कारे आहे ! ( ताईकडे वळून ) उगीबेटा उगी. तुला भूकलागली असेल? जा तूं जेव ? मीं मागूनजेवीन.

**ताई**--( रडत रडत ) **मावशी**, मला काहीं भूक लागली नाहीं. मी तुझ्या बराबरच जेवीन.

**बैरागी**--**बाईसाहेब**, आपके दुःखका कारन मेरे ध्यानमें आया. बहोत बहोत बूरा काम हुवा हय. लेकीन क्या-करना ! मेरेकों कहो के आपका लडका कितने बरसका था और उस्की ये हाल हवाल होके कितने दिन हुवे?

**जमनाबाई**--( रडत ) तें सांगून काय करायचें आहे! तो का पुन्हा यायचा आहे? असो, पण तुह्मीं विच्यारतां तर सां-गत्यें. तो सुमारें तेरा वर्षांचा होता वत्याची अशी गोष्ट होऊन आज एक महिना झाला असावा.

**बैरागी**--अच्छा **बाईसाब**. आपकूं मेरा एक अरज हय, बोले तो करूंगा?

**जमनाबाई**--**बुवाजी**, काय तें विचारा ?

**बैरागी**—दुसरा तीसरा अरज तो कुच्छ नहीं. मुझके यहां बैठके ठाकुरजीकी पूजा करनेंका हुकुम देव ?

**जमनाबाई**—फार चांगलें आहे. तुह्मीं येथें वाटेल तितके दिवस हवे तर रहा. तुमच्यासारख्या साधूंचे पाय इथ कुटचे लागायचे? (नंतर) **व्यंकय्या**, आपल्या चौसोपींतील यांना लागेल ती खोली आतांच्या आतां रिकामी करून देऊन, त्यांना पूजेचें सर्व सामान दे. ( नंतर बुवांकडे वळून ) **बुवासाहेब**, नैवेद्याचें मीं घरांत करवूं काय ? आमच्या इथ स्वयंपाकास ब्राह्मण आहे.

**बैरागी**—अच्छा बाईसाहेब.

( नंतर व्यंकय्यानें त्यांस एक खोली रिकामी करून दिली. मुख्य बुवानीं स्नान करून पुजेस आरंभ केला व त्याच्याबरोबरचे तंबाकु ओढीत बसले. **जमनाबाईनीं** सर्वांच्या भोजनाची तयारी करविली व आपण जप करीत देवघरांत बसली. व्यंकय्या हा बुवांस जें लागेल तें देत होता. इतक्यांत दुसरा बैरागी)

**दु. बै**—**व्यंकय्याजी**, तुह्मारी **बाईसाब** किधर हय ?

**व्यंकय्या**—देवघरांत बसल्या आहेत.

**दु. बै**—अच्छा, मुझकों उधर लेके चलो ?

**व्यंकय्या**—बैरागीबुआ, चलो ?

( असें ह्मणून तो त्यास घेऊन गेला. )

( मुख्य बैराग्यानें पार्थिवपूजा केली आहे व तो अगदीं ध्यानस्त बसला आहे. **जमनाबाई, व्यंकय्या** व इतर बैरागी जवळ बसले आहेत तों दुसरा बैरागी. )

**दु. बै**—( हळुच सर्वांस ) बुवाजी अभी समाधिस्त हुवे हय. हंम उन्कों पकडनेके लिये उन्के पिछे बैठता हूं. हंम कहेंगे उसबख्त तुमकूं चाहेसो बात पूच्छो. तुंमकों बराबर जवाब मि-

लेंगा. ये हमारे गुरूजी हय, और इन्केउपर भगवानकी बहोत कृपा हय.

( सर्वत्र मंडळी बुवाकडे एकसारखी टक लावून बघत बसली आहे तों बुवानीं आंग मागें टाकलें. तेव्हां त्यांना सांवरण्यासाठीं जो त्यांच्यामागें बसला होता त्यानें खुणेनें विचारण्यास सुचविलें तेव्हां )

**जमनाबाई**—( पूर्वी ठरल्याप्रमाणें समाधिस्त बुवांस व त्यांच्या पार्थिवास मोठ्या नम्रतेनें नमस्कार करून ) हे शंभो, मीं अनाथ, पापी व दुःखानें अती गांजलेली आहें. मला आतां या जगांत जगण्याचीसुद्धां इच्छा राहिली नाहीं. यासाठीं हे देवा, मला लवकर मरण दे, हें माझें तुझ्या चरणापाशीं मागणें आहे.

**मु. बै**—ऐसी बात नहीं पूछना. कुई दूसरी बात पूछो?

**त्र्यंबक्या**—बुवाजी, आह्मीं विचारतों तो सांगाल काय?

**मु. बै**—अच्छा, जो चाहेसो बात पूछो ?

**त्र्यंबक्या**.—आमचे **धाकटे माहाराज** आह्मांला कधीं भेटतील बरें ?

**मुख्य बैरागी**.— जगतमें जोजिंदाहोय तो एकबरसमें **रामभट** केसाथ आयेंगा.

**जमनाबाई**—( आपल्या **रामभटाचें** नांव याला कसें माहित झालें याचा मोठाअचंबा वाटूनव हाभूत भविष्यजाणणारा आहे अशी खात्री होऊन ) माझे बाबा आज वीसपंचवीस वर्षें कुठगेले आहेत तें समजत नाहीं. तेजिवंत असून मला कधीं भेटतील काय ?

**मु. बै**—( कांही वेळगेल्यावर ) हां. अच्छा. **संपतराव** और इनकी बेटी—बेटीकानाम क्या ?— हां, **जमना**, इन्की मुलाखत जरूर होगी. लेकीन क्याकरना ! **संपतराव** बहोत बुढे

होगये हय. तोभी कुच्छ फिकीर नहीं. बरस छमहिनेमें मुलाखत होगी.

**जमनाबाई**—( आपल्या बाबांचें ही नांव यानें घेतलें. यावरून हा कोणी मोठा सत्पुरुष असावा अशी खात्री होऊन ) हे भगवान, मीं मोठी हतभागी आहें. तरी आपली मजवर मोठी कृपा होती म्हणूनच (बुवाकडे बोटकरून) अशा सत्पुरुषाचें मला दर्शन घडलें. नको पण देवा ( आंग शहारल्यासारखें करून ) अशा भेटी झाल्यामुळें क्षणभर थोडा आनंद होतो हें खरं, पण त्याचा काय उपयोग ! मजवर जे जे म्हणून एकंदर दुःखाचे डोंगर कोसळे आहेत, ते पहा मला अगदीं दुःसह झाले आहेत ! **नारायणा!** मीं कुणाची कोण आणि माझं काय हें मातेरं झालं! बुवानीं सांगितलं कीं माझी व बाबांची भेट होईल ह्मणून. होय, होईल भेट? पण त्यांनां मीं हें आपलं कृष्ण मुख कसेंरे दाखवूं ! वत्यानीं विचारलं तर कायरे सांगूं! ताईचं सोन्याहून पिवळं झालं. पणतिच्या मुलां विषयीं विचारलं तर ( रडावयास लागून ) कायरे सांगू! देवा, आत्महत्या केली तर पातक लागतं ह्मणून. नाहीं तर मीं आपलं कांहीं तरी करून टाकलं असतं. ( असें ह्मणून अधीकच रडूंलागल्ये. )

**बैरागी**—(समाधी विसर्जन करून नीट बसतो व सावध होऊन **जमनाबाई** रडत आहे असें पाहून ) **बाईसाहेब** येक्या तुंमकरते हो! शंकरजी का नामस्मरण करने में क्या फायदा हय सोदेखोतोसई ? वोहीसबदुनियाका पालनवाला हय. उस्के नामसें तुंमपावन होजावेगे, और तुह्मांरा सबकाम फत्ते हो जायगा.

**जमनाबाई**—( रडेंबंदकरून ) बरं आहे बुवाजी— ( पुढेंती बोलणार तों )

**बैरागी**--**बाईसाहेब**, आपनें रोटी पाई ?

**जमनाबाई**—नाहीं, आतां आपण सर्व बरोबरच जेऊं.

( असें ह्मणून तीं सर्व भोजनास गेलीं. )

---

## प्रवेश ३ रा.

**स्थल**—एका मोठ्या डोंगरांतील एक विस्तीर्ण गुहा.

**पात्रें**—**धाकटे महाराज, नानासाहेब, कन्हयालाल, रामभट, करीम वगैरे.**

**नाना**—कां **कन्हयालाल**, तुमचे **करीमखा** जमादार धाकटे महाराजांचा वधकरीत असतां, तुह्मीं दहा पांच असामीं एकाएकीं कसे आलां ह्मणून ते विचारीत होतेनां ? मग त्यांना तुह्मीं सांगितलें का ?

**कन्हया**-हां साब, सब कहदिया. लेकीन आपकी सवारी उस् बख्त वहां कैसी आयी, सोकुच मालुम पडता नहीं ?

**नाना**—अहो, त्या **अंबाबाईच्या** वनांत ओढ्याच्या कांठीं आह्मीं उतरलों होतों. रात्रीं झोंप येईना ह्मणूनमीं आपल्या तंबूच्या बाहेर आलों. तों त्याझाडींत दिवा दिसला व कोणी रडत आहे असें ऐकूं आलें. ह्मणून त्या आंबराईच्याबाहेर जाऊन उभा राहिलों, व आंत पाहूं लागलों, तों तूमचे हे **करीमखा** जमादार व त्यांचे साथीदार, आपापल्या तरवारी उपसून या आमच्या प्रियकर **महाराजांस** यमसदनीं पाठविण्याच्या बेतांत होते. बरें तें असो. पण आपले **करीम**साहेब आतां खूष आहेत किंवा अजून रागांतच आहेत ?

**करीम**-**नानासाहेब**, मला माझ्या कर्माचा मोठा पश्चा-

व **रामभटजी** असे **महाराजांस** फार फार जपत जा बरें. अजून आपल्यापाशीं दोन महिने पुरेल इतकें द्रव्य आहे. इथे जितके ह्मणून लोक आहेत, त्यांच्या खाण्यापिण्याचे हाल न करितां ते सदा खूष राहून आपल्या कामास उपयोगी पडतील अशी व्यवस्था टेवा. त्यांना कोणत्याही गोष्टीविषयीं उणें ह्मणून पडूं देऊं नका.

**कन्हया**—जैसा आपका हुकुम होगा वैसे हंम चलेंगे. आपअपना काम करनेकी तजबीज रखो. यहांकी सब तजबीज हंम अच्छा तऱ्हेसें रखेंगे.

**नाना**—बरें तर, मीं आतां जातों.

( असें ह्मणून आपल्याबरोबर कांहीं लोक घेऊन ते जातात. )

---

## प्रवेश ४ था.

**स्थल**—राणीची दासी **विठाई** इचें घर-

**पात्रें—विठाई, नानासाहेब** व त्यांच्याबरोबरचीं माणसें.

**विठाई**—( एकटीच आपल्याशीं ) काय करावं ! ते पाव्हणे कुठ गेल्याती काय जणूं ! ते **नानासाब** न्हई क ? व्हय, **नानासाब**च. तो तर लई चांगला माणुस दिसतुया, आन् पैसा तर जसा पाण्यावाणीं खरचतुया ! देखणा तर जणुं राजावाणीं हय. पण त्याचं माझ्याशीं काय बरं काम हय ? ह्यो जर इथ ऱ्हाईल की न्हई, तर ( राजवाड्याकडे पाहून व डोळे मोडून ) लई छान व्हईल ? पन हे आले की ते !

**नाना**— कां **विठाबाई**, आह्मांला उशीर झाला कीं काय ? तुमचें नगर पहावयास गेलों होतों. तें पाहून मीं मोठा खूष झालों. तुमचें शहर फार उत्तम असून त्यांत व्यवस्थाही

फार चांगल्या प्रकारची ठेवलेली आहे. बरं पण, **विठाबाई**, मीं तुमच्याइथ ज्या कामासाठीं आलों तें तुह्मांला सांगूंना ?

**विठाई**—सांगा की ?

**नाना**—तें सांगण्यापूर्वीं माझें हें काम कराकीं मीं तुमच्या बहिणीचा मुलगा आहें असें ज्यालात्याला तुह्मीं सांगत जा. व माझा बाप **विश्वपूर** येथें मोठा सरदार असून तो रणांत पडला व माझी आई मृत्यु पावली. ह्मणून या राज्यांत नोकरी मिळवावी व तुमच्यापाशीं रहावें, या हेतूनें मीं आलों आहें असेंही सांगतजा.

**विठाई**—पण मला बहिण हय कुठ, आन् कवां होती ती मीं सांगूं ?

**नाना**—सख्खी बहिण नसली ह्मणून काय झालें. चुलत बहिण; मामेबहिण, आतेबहिण, यांतून तुह्मांला कोणीचका नव्हती ?

**विठाई**—बरं तशी व्हती. मग ?

**नाना**—मग काय ? एवढें तुह्मीं सांगितलें ह्मणजे माझी रहाण्याची सोय झाली. नंतर तुह्मीं मला तुमच्या राणीसाहेबांच्या हातून एखादी मोठी नोकरी मिळवून द्या, ह्मणजे माझें काम झालें.

**विठाई**—बरं असं करून मला का मिळाचं हय ?

**नाना**- राणी साहेबांच्या हातून मला नोकरी मिळवून दिलीत किंवा त्यांची माझी वळख करून दिलीत, ह्मणजे मग तुह्मांला हो काय तोटा! व (आपण कृपण नाहीं असें दाखविण्यासाठीं शंभर रुपयांची एक पिशवी तिला देऊन ) तूर्त हे थोडेसे तर घ्या ?

**विठाई**-(मनांत मोठी आनंदी होऊन ) अहो तुह्मीं आपलें

काम करून घेण्यासाठीं आज असं बोलतां, अन् काम झालं कीं कोण इठाबाई नीं कुठली मावशी ?

**नाना**— असें होईल असें तुह्मीं कशावरून ह्मणतां ? छिः. तशी वेळ तर येऊंद्या ? मग तुमचा कसा फायदा होईल तें पहाल ?

**विठाई**—बरं हय. तुह्मीं अदुगर जेवून तर घ्या. मग ह्योरली बात ह्योर.

**नाना**— जेवण बिवण सगळें मग. प्रथम आमच्या कामाचा निकाल लागला पाहिजे. तुह्मीं माझें काम करण्याचें ठरलें ना ? बघा बरं, जर माझ्यापाशीं दगाफटका कराल तर !–(असें ह्मणून आपली तरवारबाहेर काढतो)

**विठाई**—(जरा घाबरून) अगबाई. असं कशापांईं तें ?

**नाना**—तुह्मीं विश्वासानें वागाल तर तुह्मांस माझ्यापासून यत्किंचितही भीती नाहीं. (नंतर आपल्या विषयीं तिच्या मनांत अधिक भीती उत्पन्न व्हावी ह्मणून ) तुह्मांला वाटत असेल कीं आपण राणीसाहेबांच्या खानगी तैनातीपैकीं आहों तेव्हां आपल्यास कशाची भीती आहे ? परंतु हा तुमचा भ्रम मीं तेव्हांच उडवून टाकीन बरं ?

**विठाई**—( आपण राणीसाहेबांच्या तैनाती पैकीं आहों हें मनांत येऊन रागाच्या डौलानें ) कां **नानासाब**, तुम्हीं मला लईसा दम देतां ? मीं आपली मगा धरून ऐकतें म्हणून की का ? पण मीं अशी कुणाला भ्यायची नाहीं बरं ? माझ्या इथ येऊनशी मलाच धमकी? आं ! वाः, बरंचकी हय! अशी धमकीबिमकी द्यायची असेल तर चला इथून चालते व्हा अत्तांच्या अत्तांच ?

**नाना**–कां **विठाबाई** ,इतक्यांत चढून शा गेलां ? तुम्हांला

राणीसाहेबांच्या आश्रयाचा मोठा दम आहे वाटतं? पण माझ्यापाशीं अशी कांहीं जादू आहे, कीं तिच्या योगानें राजा किंवा राणी, यांच्या हातून माझें कांहींएक व्हायचें नाहीं. तुम्हांस आपली खात्री करून घेणें असेल तर हा पहा चमत्कार. ( असें म्हणून जरा छों छूं करून दोनतीन लहान लहान पक्षी उत्पन्न करून उडवून दाखविले. )

**विठाई**—( थोडी चपापून ) अगबाई, हें काय !

**नाना**—तुह्मांला याच्याहूनही अधिक चमत्कार दृष्टीस पडतील. असो, पण जर तुह्मीं माझ्याविषयीं खरा प्रकार कोणाला सांगाल तर आपल्या जीवाची आशा सोडा, आणि मग जें करणें असेल तें करा. तुह्मांला वाटेल कीं आपण राणीच्या महालांत असलों तर तेथें माझें काय चालणार आहे? पण तसें नाहीं बरें. तुमची इच्छाच असेल तर मनुष्याच्या आंगाला स्पर्शही न करितां मीं त्याची कशी दुर्दशा करूं शकेन याचा थोडासा मासला हवा तर हा पहा? ( असें ह्मणून **आपा** नावाच्या आपल्याबरोबरच्या एका मनुष्याला आपल्यापासून जरा दूर जाऊन उभें रहावयास सांगितलें. )

(तो जाऊन दूर उभा राहिला. परंतु भयानें गर्भगळित होऊन लटलटां कापूं लागला. हें पाहून, **नानासाहे**बांशिवाय सर्व घाबरले. **विठाबाई** तर भयाभीत होऊन **आपा**कडे एकसारखी पाहूं लागली. इतक्यांत **नानासाहे**बांनीं थोडा वेळ छों छूं करण्याचा डौल घालून "तुझी मीं आतां मांडी कापतों संभाळ?" असें सांगितलें. यामुळें **आपा** अधिकच घाबरला. नंतर **नानासाहे**बांनीं "ही पहा कापली" असें ह्मणतांच **आपा** ओरडत खालीं पडला व त्याच्या मांडीतून एकसारखें रक्त वाहूं लागलें. तें पहातांच **विठाबाई**ची फार त्रेधा उडाली. तिनें आ-

पले डोळे मिटले व “ अगाई, अगाई, आतां मीं काय करूं !” असें ह्मणत ती बसली होती तेथेंच मागें पडली.

**नाना**—( नंतर कांहीं वेळ गेल्यावर जवळ जाऊन तिला हालवून व उठवून ) कां **विठाबाई**, कसें काय आहे ?

**विठाई**—( **आपा**प्रमाणें आपलीही हे अशीच व्यवस्था करतील अशा भीतीनें फार घाबरून रडत रडत ) नग, नग, नग, **नानासाब**, मीं चुकल्यें. मीं तुमच्या पांयां पडल्यें. मला मारूं नका. तुह्मीं सांगाल तशी मीं वागेन व कुणापाशीं कांहींएक बोलणारबी न्हई. **नानासाब**, तुमच्या पायांची शपत. तुह्मीं जें सांगाल त्याच्याभाईर यवढीबी मीं जाणार न्हई. पण मला मारूं नगा. ( असें ह्मणून अधिक रडूं लागल्ये. )

**नाना**—**विठाबाई**, तुह्मीं माझी शपत घेऊन माझ्या सांगण्याप्रमाणें वागण्याचें कबूल केलें आहे, याची नीट आठवण ठेवा ? जरका कोणापाशीं माझ्याबद्दल किंवा इथे झालेल्या प्रकाराबद्दल बोलाल, तर तुह्मीं जेथें असाल तेथें तुह्मांस ठार करून टाकीन. ( अशी जबरतंबी देऊन **आपा** पडला होता त्याच्या जवळ जाऊन कांहीं मंत्र घातल्यासारखें करून **आपास** उठविला व त्याची कापलेली मांडी पूर्ववत केलेली सर्वांस व विशेषतः **विठाबाईस** दाखविली.

( त्यामुळें तिला मोठेंच आश्चर्य वाटलें व **नाना साहेबांच्या** विरुद्ध वागल्यें तर आपण तात्काळ ठार मरून जाऊं अशी तिची खात्री झाली. नंतर तिनें आणखीं आणा शपता वाहून त्यांच्या विचारानें वागण्याचें कबूल केलें. )

---

## प्रवेश ५ वा.

**स्थल**—राणीचामहाल

**पात्रें—राणी. विठाईदासी, नानासाहेब** व त्यांच्या हाता खालचे कारकून व शिपाई.

**राणी**—कां **विठाई**, तुझेभाचे **नानासाहेब**, यांच्या इच्छेप्रमाणं त्यांची तजवीज झाली, कीं अजून कांहीं राहिली आहे ?

**विठाई**—अगाई! अजूनतें त्याखीं का पाहिजे ? त्यांना जें हवं हुतं तें समदं मिळालं म्हणून ते मला सांगत व्हते की ?

**राणी**—बरं, कायग **विठाई, नानासाहेबां**विषयीं तुला पूर्वी कांहीं ठाऊक होतं काग ? आणि जर ठाऊक होतं, तर तूं मला पूर्वी कधीं सांगितलं नाहींसतें.?

**विठाई—आईसाब**, मला त्यांच्याइशाई म्हांईत व्हतं म्हंजे ? समदं ठाऊक व्हतं. पन ते व्हते मोठे सरदार अन् मीं पडल्यें आपली बटिक. तवां ते मला कसे इचारत्याती ? त्यांत त्यांचा हलकेपना न्हई का होत ?

**राणी**—बरं पण, त्यांना **विश्वपुरींत** जहागीर आहे म्हणून तूं सांगत होतीस, मग ग ते चाकरीसाठीं इथ कां आले ?

**विठाई—आईसाब**, त्यांचा बा मेला आन् आईबी सा महिने झाले, मेली. तवां त्यांचा जीव लईच उडाला. अन्मी आपल्या पांयांशीं हय हें त्याखीं त्यांच्या आईनें सांगितलं व्हतं, ह्मणून माझ्या इथ आले, नीं काय?

**राणी—विठाई**, तें असों. तुझ्या **नानासाहेबांचं** लग्न झालं काग?

**विठाई**—न्हाई **आईसाब.**

**राणी**——(मनांत हर्षित होऊन ) **विठाई**, आपण त्यांच्यालग्नाचा विचार पुढं करूं बरं ? पण कायग, ते अजून आले नाहींत ते ?

**विठाई**—इतुक्यांत येतील की **आईसाब**.

**राणी**—**विठाई**, ते इथ राहिल्यापासून त्यानीं माझ्या कामाची व्यवस्था फार चांगल्या प्रकारची ठेविली आहे. त्यांना ठेवण्याच्या वेळीं **महाराजानीं** थोडे का आढेवेढे घेतले! आणि आमचे **दादासाहेब** तर त्यांना ठेवण्याला अगदींच कबूल नव्हते. पण मीं आपली अडूनच बसल्यें, तेव्हां एकदांचें त्यांना माझे खासगी कारभारी नेमलं.

**विठाई**—( राणीच्या मनांतील हेतू जाणून ) पन **आईसाब**, त्यांना दिसरी तिसरीकडे कुठे ननेमतां आपल्या पांयांशींच ठेवलं, हें बरं झालं. न्हाहीं तर त्यांना दिसरीकडच कुठ नेमलें असतें तर काय करायचें होतें !

**राणी**— दुसरी तिसरीकडे केव्हांच नेमलं असतं. पन मीं हट्टच घेऊन बसल्यें म्हणून ही जागा त्यांना दिली. बरं पण तें असो. ते वारंवार रजा घेऊन कुठग बाहेर गांवीं जातात ?

**विठाई**—( जरा गर्वानें ) ते आपल्या जागिरीच्या गांवीं वसूल बाकी करन्यास जात्याती, अन् कुनीकड ?

( इतक्यांत **नानासाहेब** येतात त्यांस पाहून )

**राणी**—**नानासाहेब**, आज आम्हीं तुमची किती तरी वेळ वाट पहात आहों ! तुम्हीं गेलां होतां तरी कुठ ?

**नाना**— **महाराज**सरकारानीं मला एक कामगिरी दिली आहे, त्या कामांत मीं आज आठ दिवस सतत गुंतलों आहें.

**राणी**—असं **महाराजानीं** तुम्हांस कोणतं काम सांगितलं आहे कीं ज्याला तुम्हांला एक आठवडा लागला !

**नाना**—आपल्या हिराबागेंत आज आठदिवशीं एक मोठी मेजवानी व्हायची आहे. त्याबद्दल आपल्या प्रधानजींकडे सर्व काम संपवून दिलें असून त्यांच्या हाताखालीं मला काम करण्याचा हुकुम झाला आहे.

**राणी**—मेजवानी ! आणि ती कुणाला ?

**नाना**-शाक्त धर्माचे कोणी गुरू आले आहेत, व **रामशास्त्री**, **दादासाहेब**, आपले **प्रधानजी** व आणखीं दुसरे कांहीं मोठमोठाले लोक त्यांचे शिष्य झाले आहेत. **महाराजांच्या**ही मनांत त्यांना आपले गुरू करावे, असें आहे. म्हणून ही मेजवानी असावी असें मला वाटतें. ( असें सांगून राणीसाहेबांकडे पहात उभे राहिले ).

**राणी**—काय **नानासाहेब**, आपले **प्रधानजी**ही त्या गुरूचे चेले झाले काय ?

**नाना**—( ऐकलेल्या गोष्टीविषयीं किंचित खात्री होऊन ) असें मीं ऐकलें तर खरें.

**राणी**—( किंचित रागाऊन ) बरं **नाना साहेब**, तें असो. पण असं पहा कीं तुह्मीं दुसऱ्यांचीं कामं करावीं आणि आमचं एखादें काम करूं नये कीं काय ?

**नाना**—काय आपलें काम, आणि मीं करूं नये ! मग आपण मला व्यर्थका आपल्या पदरीं ठेविला आहे? छेः छेः असें कधीं व्हावयाचें नाहीं. मला आपल्या तैनातीस ठेविला आहे, तर आपण जें सांगाल तें काम मीं मध्यरात्रीं व कसें ही असलें, तरी करण्यास तयार आहें. कायतें सांगा, कीं मीं तें करावयास लागलोंच ह्मणा.

**राणी**—तर मग ऐका. आपल्या **महाराजांची** मुलगी **ताई** आहे कीं नई, इजवर आमच्या **दादासाहेबां**चं फार मन

गेलं आहे. **महाराज**ही त्या गोष्टीस विरुद्ध आहेत असं नाहीं. आमच्या राजघराण्यांत जीं लग्नें व्हायचीं, तीं स्वसंतोषानें झालीं पाहिजेत. त्यांत सक्ती वगैरे कांहीं उपयोगाची नाहीं. आतां **ताई** ह्मटली ह्मणजे त्या **जमनाच्या** अर्ध्या वचनांत आहे. तर तुह्मीं त्या दोघीं जवळ खटपट करून तेवढं जुळवून द्या, ह्मणजे झालं.

**नाना**—( थोडा वेळ विचार केल्यासारखें करून ) या अशा नाजुक कामावर दुसऱ्या कोणाची योजना कराल तर फार चांगलें. माझ्या हातून हें काम कसें होईल ?

**राणी**—**नानासाहेब**, हें काम तुमच्या हातून होण्यासारखें आहे ह्मणूनच त्यावर तुमची योजना करीत आहें. तर कसेंही करून तुह्मीं एकदां या कामांत यश द्याच.

**नाना**—आपला हुकुम मला शिरसा मान्य आहे. माझ्यानें होईल तें मीं करीन.

**राणी**—**नानासाहेब**, तुह्मांला मीं खरंच सांगत्यें कीं या राजदरबारीं लहान मोठीं पुष्कळ नोकर माणसं आहेत. परंतु त्या सर्वांत तुमची काम करण्याची शैली पाहून मीं फार खूष झाल्यें. पण हें काय ! माझें लक्षच गेलं नाहीं. तुह्मीं असे उभे कां ? या, असे बसा.

**नाना**—नाहीं नाहीं, मीं उभा आहें तोच बरा. आपल्या समक्ष मीं बसावें हें मला योग्य नाहीं.

**राणी**—कांहीं चिंता नाहीं, बसा तुह्मीं असे. हं, आधीं तुह्मीं इथ बसा नीं मग बोला.

**नाना**—( **राणीं**चा आग्रह पाहून तिच्यापासून दूर अंतरावर बसून ) आपल्या आज्ञे प्रमाणें मीं बसतों, पण मला तें प्रशस्त वाटत नाहीं.

**राणी**—**विठाई**, अशी इकडे येग.

**विठाई**—जी, काय हुकुम ?

**राणी**—(तिच्याकानांत ) तूं जराबाहेर जा व **महाराज** किंवा **दादासाहेब** आले, तर चटकन येऊन मला सांग.

**विठाई**—जी **आईसाब**. ( असें ह्मणून बाहेर जात्ये. )

**राणी**-**नानासाहेब**, मीं काय बोलत होत्यें ? हं, आठवलं. नोकर माणसं ह्मणजे थोडीं आहेत असं नाहीं. खंडो गणतीं आहेत. पण त्यांत तुमच्या सारखा चतुर व शहाणा एकही नाहीं, एवढंच.

**नाना**—असें आपण कां म्हणतां ? मीं हा काय कालचा. आपल्या पदरीं शहाणे, धूर्त व चतुर असे पुष्कळ लोक असतां, आपण माझीच स्तुती करतां, तेव्हां आपले मजवर मोठे उपकारच आहेत, असें समजलें पाहिजे.

**राणी**—मीं उगीच कोणाची स्तुती करायची नाहीं. आ-जपर्यंत ज्यांच्यापाशीं म्हणून मला बोलायची वेळ आली, त्यानीं आपल्या या राज्यांत कलह माजविण्याच्या गोष्टी मजपाशीं काढाव्या. **जमना** अशीच आहे. ते नवे **राजवैद्य** तसेच आहेत. **ताई** ही मोठी हट्टीच मुलगी आहे. **सेनापती** आमचा सर्वांचा द्वेषच करतात. अशा एक कीं दोन गोष्टी! हवंतसं सांगत गेले. त्यामुळं झालं काय, कीं मीं त्यांचा उगीच द्वेष करूं लागल्यें. पण तुम्हींच पहा काय केलंत तें ! त्यांचा जो मीं द्वेष करीत होत्यें तो उगीच, असें मला तुमच्याशीं त्या गोष्टी वारंवार काढल्यानें समजलं. तुह्मीं तर इथ अगदीं नवे असून यांतील कुण्णा एकालाही वळखत नाहीं. आणि तुमचं म्हणणं कीं कुण्णाचा द्वेष करूं नये. तर आतां तुमच्या व त्यांच्यामध्यें किती अंतर

आहे, हें तुम्हींच पहा? म्हणून मीं तुमची स्तुती केली ती उगीच केली कीं बरोबर केली, हें आतां तुम्हींच सांगा बरं?

**नाना**—आपण काय म्हणाल तें खरें. धन्याची नोकरी इमानें इतबारें करावी हें मला माझ्या गुरूनें शिकविलें आहे व त्याप्रमाणें मीं वागत आहें. मग त्यांत कांहीं होवो.

( इतक्यांत **महाराजांकडून नाना साहेबांस** बलावणें आल्यावरून **राणी साहेबांच्या** हुकुमानें ते तिकडे जातात.)

**राणी**—( आपल्याशींच ) **नाना साहेबांस** इथ राहून महिना दीड महिना झाला. त्यांना मीं पाहिल्यापासून माझं मन कसंसंच झालं आहे. काय तो पुरूष देखणा! तो एखाद्या मोठ्या राजघराण्यांत उत्तम शोभला जाईल. शरीराचा बांधा कसा रेखलेल्या चित्राप्रमाणं आहे! फार फार तर वीस बावीस वर्षांचा म्हणजे माझ्या एवढाच वयानं असावा. त्यांच्या भिवया कशा कमानदार, व डोळे कसे पाणीदार आहेत! आं-गलोट गोंडस असून स्थूळ नाहीं. एकंदरीनें पहातां हा पुरुष जसा असावा तसा आहे. असा चांगला पुरुष आपल्या इथ असावा म्हणून तर मीं त्यास ठेवून घेतला. परंतु आतां पुढं कसं! **विठाईच्या** हातून हें काम चांगल्या रीतीनें झालं असतं. पण ती पडली त्यांची मावशी. दुसऱ्या कुणावर अशा कामांत कसा भरंवसा ठेवावा! म्हणून हें काम आपल्यालाच केलें पाहिजे पण आज किती दिवस याविषयीं त्यांच्याशीं कोणत्या तरी रीतीनें गोष्ट काढावी, असा मी बेत करीत आहें! पण ते आले, म्हणजे ती गोष्ट त्यांच्याशीं काढण्यास मला मेला धीरच होत नाहीं. नेत्र कटाक्षानें किंवा हास्य वदनानें मीं बहुत वेळां मारा केला. परंतु तो सर्व निर्फळ गेला. मग त्यांना काय समजलं नाहीं म्हणावं? किंवा ते मद्दाम समजल्याविषयीं

दाखवीत नाहींत? हें समजत नाहीं. कांहीं असो, हें काम केलं पाहिजे खरं.

---

## प्रवेश ६ वा.

**स्थल**—**दादासाहेबांचा** दिवाणखाना.

**पात्रें**—**दादासाहेब. रामशास्त्री. हरबाराव. जिवबादादा** शिलेदार वगैरे.

**दादा**—( दरडावून ) कोणरे आहे तिथे, इकडे ये?

**रामा**—जी साव, मीं हय. काय हुकुम?

**दादा**—**रामशास्त्री, हरबा** व **जिवबा**, यांना बलवावयास कोण गेला आहे?

**रामा**—**गणुजी** गेल्याती.

**दादा**—बरें आहे. ते आले कीं मला सांग.

**रामा**—जी साव. ( असें ह्मणून दिवाणखान्याच्या बाहेर जातो. )

**दादा**—(आपल्याशींच)शाबास, **दादा साहेब**, शाबास. दोन महिने झाले असावे, नाहीं बरें? काय तो धामधुमीचा दिवस! त्यादिवसाची आठवण मला रोज होते व त्यादिवशीं घडलेल्या गोष्टीं विषयीं मीं विचारही करतों. परंतु मीं त्या दिवशीं जीं ह्मणून कामें केलीं तीं मीं कशीं केलीं! याचें माझें मलाच मोठें आश्चर्य वाटतें. त्या **करीमानें** ही आपलें काम मोठ्या शिताफीनें केलें. पण तो व त्याचे साथीदार कुठे परत आले नाहींत! मला वाटतें आपलें कृत्य उघडकीस येऊन आपल्यास शिक्षा होईल, याभीतीनेंच ते आले नाहींत. न कां येईनांत. आलेतरी वहावा आणि न आले तरी वहावा. आणि मुळींच नयेतील तर बरेंच. ह्मणजे कोणाला कांही एक कळावयाच नाहीं. बरें तें असो. पण या **बाई** बद्दल काय विचार करावा!

हजारों स्त्रिया मीं पाहिल्या. पण तिच्या सारखी सुंदर माझ्यातर पहाण्यांत कोणी आली नाहीं. अहाहा, काय तिचें तें अनुपमरूप! तिचा गोंडस व सड पातळ बांधा; तिचें सरळ नाक व हरिणा सारखे डोळे; त्यांवर अर्धधनुष्याकार तिच्याभिंवया, व त्यांच्यामध्यें तो बारिक कस्तुरी तीलक; लांब सरळ व काळे भोर अशा तिच्या केंसांची ती भुजंगाकार वेणी; केळीच्या स्तंभाप्रम णें तिच्या मांड्या; हीं सर्व पाहून मीं अगदीं वेडाऊन गेलों आहें. फार काय! तिचा प्रत्येक अवयव पाहिला तरी त्यांत दोषह्मणून मिळावयाचाच नाहीं. अशी ही सुंदरी अपल्यास कशी लाभते! माझें लक्ष तिजवर गेलें आहे, हें **महाराजांस** माहित असून त्यांना ती गोष्ट पसंतही आहे. परंतु तिच्यापाशीं ही गोष्ट काढिली कीं ती नाकावर माशीही बसूं देत नाहीं. मीं स्वतः अनेक वेळां तिच्याशीं लाडीगोडीनें बोलावयास जातों. परंतु ती ह्मणून मजपाशीं आनंदानें बोललीआहे, असें कधीं झालें नाहीं. दुसऱ्यांकडून तिच्याशीं गोष्ट काढविली. परंतु तीह्मणून स्वसंतोषानें या गोष्टीस कबूल नाहीं. याला काय युक्ती करावी! असो. आजच निराश होण्याचें कारण नाहीं. आपण एवढीं मोठालीं अचाट कामें केलीं आहेत, त्यांपेक्षां हें फार कठीण आहे, असें नाहीं.

( इतक्यांत शास्त्री वगैरे त्रिकुट आल्याचें **रामानें** येऊन सांगितलें. )

**रामशास्त्री**—कां **दादासाहेब**, आज आपण कोणत्या विचारांत निमग्न अहां?

**दादा**—**शास्त्रीबुवा**, विचारबिचार मीं कांहीं करीत नसतों. तें सर्व काम तुमच्याकडे दिलें आहे. कां **हरबा**, असेंचना?

**हरबा व जिवबा**—(दोघे एकदम ) असंच तर काय ? आपुन आपले शिपाईगडी. इचारबिचार संमदा बामनांकडे. ऐकलेंका शास्त्रीबुवा ?

**शास्त्री**—आमच्याकडे खरें. पण आम्हीं तरी तुमच्याच आश्रयानें कार्यें करणारना ? आम्हीं एकटेहो काय करणार पण एवढें खरें, कीं **दादासाहेबांच्या** कामासाठीं हा देह जरी अर्पण करण्याची वेळ आली, तरी मीं तयार आहें.

**दादा**—शास्त्रीबुवा, त्याविषयीं माझी खात्री आहे. पण कायहो, काल तुम्हीं काय सांगत होतां ?

**शास्त्री**—कांहीं नाहीं बा!

**दादा**—कांहीं नाहीं कसें ? त्या **नाना** विषयीं तुह्मीं कांहीं बोलत होतां नाहीं ?

**हरबा**—शास्त्रीबुवा, आमच्या **दादा साहेबांनीं** कशी आठवण हय, पाहिली ना ?

**शास्त्री**—होय बुवा. त्यांनीं एकवार कांहीं ऐकलें कीं तें ह्मणून ते कधीं विसरायाचेच नाहींत.

**दादा**—तें राहूंद्या हो. आधीं तुह्मीं त्या **नाना**विषयीं काय सांगत होतां, तें पुन्हां सांगा पाहूं ?

**शास्त्री**—( याचवेळीं कांहीं वाईट न सांगावें असें मनांत आणून ) नाहीं म्हणत होतों कीं ते राहणार वगैरे कोठले, व राजवाड्यांत त्यांचा एकाएकीं कसा प्रवेश झाला ?

**दादा**—अं:, हेंच का. मीं म्हटलें कांहीं दुसरें आहे ?

**शास्त्री**—नाहीं, हेंच.

**दादा**—अहो, आपल्या **राणीसाहेबांची** ती **विठाई** दासी आहेना? तिचा तो भाचा.

**शास्त्री**—काय, **विठाईचा** भाचा ! म्हणजे तिची बहीण

कुठे तरी दासी असेल, आणि तिचा हा मुलगा ! ठीक आहे. पण त्याजकडे काम मोठें चांगलें दिलें आहे!

**दादा**—चांगलें कशाचें ? तो एक हुजऱ्याच आहे, असें म्हटलं तरी चालेल. पण तुम्हीं त्याच्याविषयीं इतकी बारिकशी चौकशी चालविली आहे. ?

**शास्त्री**—नाहीं बा, आपली माहिती नव्हती, म्हणून विचारलें.

**दादा**—नाहीं कसें ? तुम्हीं उगीच विचारायचे नाहीं. यांत कांहीं तरी खुबी आहे.

**शास्त्री**—खुबी कशाची ! त्यांच्याविषयीं आपला मला संशय येतो म्हणून—

**दादा**—कां **जिवबा**, ऐकलेंना ? आमचे **शास्त्रीबुवा** एखाद्याविषयीं उगीच चौकशी करायचे नाहींत. बरें मग **शास्त्रीबुवा**, तुम्हांला त्याच्याविषयीं काय संशय येतो, तो सांगून तर ठेवा ?

**शास्त्री**—संशय म्हणून दुसरा कांहीं नाहीं. तो कोणापाशीं फारसा बोलत नाहीं. त्याच्या कपाळाला आठ्या असतात. व असे लोक मोठे लबाड असतात. म्हणून म्हटलें, त्याला आपलीं विश्वासाचीं कामें सांगू नयेत, येवढेंच.

**दादा**—अहो, तो इथे काल आला. तो आम्हांला प्रतिकूळ नाहीं तेथपर्यंतच त्याची चाकरी. आणि समजा, कीं तो आपल्याशीं लबाडी करूं लागला. तर **करीमा**सारखे दुसरे थोडेका लोक आहेत ? देऊं त्यांच्या स्वाधीन करून. नाहीं तर टाकूं तोफेच्या तोंडीं देऊन नीं काय !

**शास्त्री**—तें सर्व खरें आहे, **दादासाहेब**. पण आपण आपले पहिल्यापासूनच सावध राहिलों, तर बरें कीं नाहीं ?

**दादा**—बरें बरें, सावध राहा म्हणजे झालें.

**शास्त्री**—**दादा साहेब**, **करीमखा** व त्याच्या बरा-बर गेलेले लोक अद्याप परत आले नाहींत, हें एका अर्थी बरेंच! परंतु त्यांचीं बायका पोरें येथें राहणें बरें नाहीं. त्याच प्रमाणें त्या थेरड्याचा ( **सेनापतीचा** ) मोठा विश्वासू **कन्हयालाल**, व पलटणींतील आणखीं कांहीं लोक परागंदा झाल्याचें समजतें. त्यांचींहीं बायका पोरें, या सर्वांस आपली राजधानी सोडून जाण्यास हुकुम करावा. **सेनापती** या गोष्टीस आडवा येईल. परंतु त्यांचें ऐकूंच नये ह्मणजे झालें.

**दादा**—ठीक आहे **शास्त्रीबुवा**. आजच्या आज त्यांना घालवूनद्या.

**शास्त्री**—बरें **दादा साहेब**, त्या **मगनलाल**—

**दादा**—हो, हो, बरी आठवण केलीत. तुह्मीं आज रात्रीं बराबर एक मेणा व कांहीं हत्यारबंद चपराशी घेऊन जा, आणि तिला घेऊन या ?

**शास्त्री**—बरें **दादासाहेब**, माझ्या मनांत असें आलें आहे कीं **सेनापतीला** पेनशन द्यावें आणि—

**जिवबा**—त्या जाग्यावर **दादासाहेबांची** नेमणूक व्हावी.

**हरबा**—ही फार नामीं योजना.

**दादा**—अरे वाः, तुह्मीं तर साऱ्या नेमणुकाही करून टाकल्यात !

**शास्त्री**—मग काय गैरनेमणुक आहे कीं काय ?

**हरबा**—यांत कांहीं गैर नाहीं. **जिवबादादा**, उद्यांच्या दरबारीं ही गोष्ट काढून लागलीच बेत उडवून द्यायचा, नीं काय!

**शास्त्री**—तर मग **दादासाहेब**, चला आपण दोघे प्रथम

**राणीसाहेबां**कडे जाऊं आणि मग तेथून महाराजांकडेही जाऊं ?

( असें म्हणून सर्व निघून जातात. )

---

# अंक ५ वा.

## प्रवेश १ ला.

**स्थल—मगनलालशेट**चा वाडा-**पात्रें-मगनलाल, देवकुवरबाई** ( त्याची बायको ), **जेठाशंकर** ( त्याचामेथा, ) **मणीबाई** ( जेठाशंकरची बायको ). **रामशास्त्री** व त्यांच्या बराबरचेलोक.

**मगन**—केमरे **जेठा,** आजनीं सूं खबर ? बेलाखनीं रकम आपवानी वात **दादासाहेब** पासे तमें काढी थी ?

**जेठा**—शेटजी, **दादासाहेब**नें हमणानीं हमणा रूपयानीं जरूरच्छे. अनें एनें तरफथी हमणा **रामशास्त्री** आव्वांनूंच्छे.

**मगन**—वारू. एनें रुपये आजनें आज आपवांनू वास्ते तयारी करवी जूय्ये. हूं अंदर ओरडामांजास्तूं, अनें तमें यहां बेसो, समजा !

**जेठा**—वारूसाहेब.

( **मगनलालशेट** आपल्या भांडारखान्यांत गेले व **जेठा** पेढीवरच बसला आहे, तों शास्त्री बुवांची स्वारी आली. तें **मगनलाल** शेटजींस जाऊन सांगितल्यावर )

**मगन**—केमरे **जेठा,** सूं करवा बोम पाडेच्छ. हूं आवो च्छूं. तमें यहां सूं करवा आयवो ?

( इतक्यांत त्याची बायको **देवकूवर** बाई तेथें आली. तिला पाहून, केम **घरवाली,** तमोनें बी यहां आवानूं येच वख त च्छे ? जाव. तमें तमारा काम करो. यहां सूं काम च्छे ?

**देव**—एमसूं करो **शेटजी**? मनें यां आवानूं सूं अड-चण च्छे? हूं कई बाहरना माणसच्छूं? के मने छोकरो च्छे, ते हूं रमाडवा जावूं च्छूं? ते तो भगवतें आप्यु नथी. अनें तमें के वोच के यहां आवो नई? ये तमनें ठीक लागेच्छे?

**मगन**—पण छोकरा छोकरी नथी, एनें लाजको नुं?

**देव**—( जरा अधिक रागानें ) तमोनें. चार बायडी थई, पन तेमाथी कोयनूं बी छोकरा अगर छोकरी थया नथी. एनें कारन सूं? हूं तो पांचमीं च्छूं!

**मगन**—नथी तो नथी. कई फकर नथी. भगवान करे तो तमोनें छोकराच थसे. ( असें ह्मणून तिला जवळ घेतो. )

**देव**—( त्याचा हात हिसडून ) एम केम करोच्छो? **मेथा-जी** त्यहां छे, ते जूवो.

**मगन**—**मेथाजी** होय तो सूं थयूं? भले हशे. ( नंतर **जेठा**कडे वळून ) ए **जेठा**, यहां आव.

**जेठा**—( जवळ जाऊन ) केम **शेटसाहेब**?

**मगन**—तमें यहां सूं करोच्छ? **शेटाणी** ये ओलढीमां आयवी, ए तमोनें खबर नथी के?

**जेठा**—यहां हूं नई हतो. हंमणा आयवो. केमके **शास्त्रीबु-वा** आयवा, अनें ए बोंम पाडेच्छे. वास्ते तमारे पासे हूं आयवो.

**मगन**—केम, शास्त्रीबुवा यहां आयवो के?

**जेठा**—हां **साब**. घणों वखत थया.

**मगन**—( घाईघाईनें आटपाआटप करून ) वारूं. तमें चालो. हूं आयवोच्छ. ( असें म्हणून खोली बंद करतो आणि पेढीवर येतो. )

**शास्त्री**—जयगोपाळ, **शेटजी**, जयगोपाळ. कां, निजलां होतां कीं काय?

**मगन**—जयगोपाळ, **शास्त्रीबुवा,** जयगोपाळ. तमें क्वा आलात ? लय वखत तर झाला नहीं ? केमरे **जेठा, शास्त्रीबुवा** आले, हे खबर अम्हांला देवी की नाहीं ? ( नंतर शास्त्रीबुवांकडे वळून ) तमाला वखत लागला, आम्हांला माफ करा.

**शास्त्री**—कांहीं चिंता नाहीं **शेटजी.** वेळ लागला म्हणून काय झालें ?

**मगन**—बरं, **दादासाबची** तब्बेत तर ठीक आहे ? आणि तमची बी ?

**शास्त्री**—माझी तब्बेत ठिक असून **दादासाहेबांची**ही चांगली आहे.

**मगन**—दरबारची काय खबर हाय ?

**शास्त्री**—कांहीं विशेष सांगण्यासारखी नाहीं.

**मगन**—समदेलोक **दादासाहेबांचा** हुकुम ऐकते क नई ?

**शास्त्री—दादासाहेबांचा** हुकुम कोण ऐकणारनाहीं. ज्याला आपला जीव नकोसा झाला असेल, तो मात्र ऐकणार नाहीं. अशा बदमाश लोकांना आम्हीं रोज शिक्षा देतच आहों. आजकाल या देशचे ते प्रत्यक्ष प्रभू आहेत. राजाचा रंक व रंकाचा राजा, ते एका क्षणांत करून टाकतील.

**मग**—हां हां, तमें बोलते तो में समजला. **दादासाब** तो एक महाराज हय. पन आमचा वर तो तेची मेहेरबानी हयना ?

**शास्त्री**—हो हो, हें काय विचारावें ! सर्व पेढीवाले व व्यापारी, यांच्यामध्यें त्यांचा तुमच्यावर फार लोभ. परवां कोणीं तुमच्याविरुद्ध दरबारांत कागाळी सांगूं लागला. तेव्हां **दादासाहेबानीं** त्याला खाडकन हजार रुपये दंड केला, व

"पुन्हा बोलशील तर तुरगांत घालीन" अशी तंबी दिली. तेव्हां-पासून आतां तुमच्या विरुद्ध म्हणून कोणी ब्र ही काढीत नाहीं. कां **जिवबादादा**, असेंचना ?

**जिवबा**—असेंच नींकाय शास्त्रीबुवा. **दादासाब** या शेटजींचे लईगून गात्याती.

**मगन**—( अत्यंत खूष होऊन ) **दादासाहेबांचा** तो में ताबेदार हय. ते जशा अम्हांला हुकुम करेल, तशा आपला में डोळे मिटून वागेल. **शास्त्रीबुवा**, तुमचीसुद्धां आमच्यावर कुपा असूं द्या भले. आम्हीं आपला तमचा आहे.

**शास्त्री**—बरें, पण आपल्या **मेथाजींनीं** तुम्हांला **दादासाहेबांचा** निरोप सांगितला काय ?

**मगन**—हां, सांगितला.

**शास्त्री**—मला **दादासाहेबांनीं** त्याचकामासाठीं आतां पाठविलें आहे.

**मगन**—फार चांगला. **दादासाहेबांनीं** आज बेला-खांचे तोडे मागितले आहेत काय ? बरा आहे. माणशें आणलीं आहेत?

**शास्त्री**—माणसांस काय तोटा ! पैशाच्या ठिकाणीं दोन पैसे दिले कीं, माणसास माणसें.

( इतक्यांत **जेठा**, शेटजीजवळ येऊन कांहीं विचारतो. **शेटजी** होय म्हणून )

**मगन**—**जेठा**,तमें गाडीलई आवजो. पच्छे **घरवाली** अनें तमारी बायडी, एनें साथे तमें जाव. घणीं रात थई, तो रातनीं रात तमारे घेरच र्‍हेसो, अनें सवारे आवजो.

**शास्त्री**—कां **शेटजी**, आज आपल्या कुंटुबाला कुठे बाहेर जायाचें आहे वाटतें ? मग गाडीच्या भरीस कशास पडतां ?

आमच्या दोन पालख्या बाहेर आहेत. त्यांतून त्यांना जाऊं द्या. त्या परत आल्यावर आम्हीं जाऊं.

**जेठा**—**शेटसाहेब**, ये सारीवात च्छे.

**देव**—(**जेठाच्या** बायकोनें शिकवल्यावरून आणि परकी मंडळी पेढीवर होती म्हणून दारांतूनच ) **मेथाजी**, हूं गाडी-बिडीमां ये वखत जावानूं नथीं. तमें एम केजो, के हूं चालती जस्हूं. मनें कई हरकत नथी.

**मगन**—(गडबडून उठून घाईघाईनें) सूं करवा, सूं करवा, आं, एम सूं करवा ? पगेजाऊं नथी. समजेके, ए ?

**देव**—पगे जवानूं सूं हरकतच्छे ?

**मगन**—( जरा रागानें ) गाडीवगर जावानूं नथी.

**देव**—हूं ते गाडीमां बेसवानूं नथी.

**शास्त्री**—**शेटजी**, असें कां ? पालखीतून जाण्यास को-णती हरकत आहे ? व त्यांतून जाण्याला मीं तर मघाशींच सांगितलें. कोण आहेरे, **राम्या** ?

**राम्या**—जी **साब**.

**शास्त्री**—त्या दोन पालख्या दाराशीं आण, व त्यांतून या बाईस जिथे जायचें असेल तिथे घेऊनजा, आणि ( नेत्रसं-केतानें ) पालख्या परतपाठवूनदे. समजलास ?

**राम्या**—जी **साब**. हुकूमापरमानें याबायास्नीं नेऊनशेनीं पालख्या बेगी बेगी हत परत पाठऊन देतों.

**मगन**—(शास्त्रीबुवांस) **रावसाब** तुम्हीं तोसरदार लोक हय. तुमचीपालखी अमांला कशी चालेल ?

**शास्त्री**—आम्हीं सरदार, आणि तुम्हीं का कमीं आहां ? **दादासाहेबांस** हें समजलें, तर तुह्मांस पालखी नदिल्याबद्दल ते आह्मांस रागावतील. तर आतां विलंब लावूंनका.

( इतक्यांत पालख्या तयार असल्याचें **रामा** येऊन सांगतो. नंतर मोठ्या आग्रहानें परंतु आनंदानें **मगनशेटजींनीं, देवकुंवर** व **मणीबाई**, यांची पालख्यांतून रवानगी केली व **जेठाशंकर** व शास्त्रीबुवांचे नोकर लोक, यांस संभाळून जाण्यास सांगून आपण परत पेढीवर आला. पुढें कांहीं वेळानें पालख्या परत आल्यावर नोकर लोकांच्या डोकीवर रुपयांचे तोडे देऊन व **दादा**साहेबांपाशीं आपली वारंवार मोठी शिफारस करण्याविषयीं विनंती करून **शास्त्रीबुवांची** रवानगी केली. )

---

## प्रवेश २ रा.

स्थल—**दादासाहेबांचा** रंग महाल.

पात्रें—**दादासाहेब, शास्त्री, देवकुंवरबाई** व दोन दासी.

**दादा**—कां, ती ऐकते कीं नाहीं ?

**कुसाई**—**दादासाब**, काय करावं ! मीं त्यांना फार फार सांगितलं. पण त्या म्हणून कबूलच होत नाहींत.

**दादा**—ती म्हणते तरी काय ?

**कुसाई**—" मनें जावादे " कीं असंच कायसंसं म्हणून एकसारखी रडत आहे.

**दादा**—कायहो **शास्त्रीबुवा**, त्या लबाड **जेठानें** व त्याच्या बायकोनें तुम्हांस हेंच का सांगितलें तें ? मला वाटलें होतें कीं येथें आपल्याला कांहीं त्रास होणार नाहीं म्हणून. परंतु तो आपला आहेच. हेंच काम आमच्या **कुसाई** वगैरेनां सांगितलें असतें तर त्यांनीं तें फार उत्तम रीतीनें केलें असतें.

**शास्त्री**—त्या ठिकाणीं अन्याचा प्रवेश होणें अशक्य होतें म्हणून **जेठाश** सांगितलें. बरें असो. मीं थोडें सांगून पहातों. नाहीं तर मग आपण आहांच. होतां होईल तितकें आपणांस सोईच्या मार्गानें जायचें, म्हणून तर हा त्रास. ( असें म्हणून तो **देवकुवर** बसली होती तेथें जाऊन). **बाई**, तुम्हीं असा हट्ट कां करतां. **जेठाशंकर** व त्याची बायको यांनीं तुम्हांस सर्व सांगितलेंच असेल. परंतु मीही आणखीं सांगतों कीं हे **दादासाहेब** म्हणजे आज काल येथचे राजेच म्हणावयाचे. ते करतील ती पूर्व दिशा आहे. प्रत्यक्ष राजे साहेब ही त्यांची खुशामत करतात. मग इतरांचा काय पाड ! ते जर सुप्रसन्न झाले तर त्यांच्या-सारखा दाता नाहीं. परंतु जर त्यांस कोणीं दुःख दिलें, तर मग ते अगदीं ऐकावयाचे नाहींत. त्यांच्या मनांत जी गोष्ट आली ती करावयास इतका वेळ त्यांना सहनच व्हावयाचा नाहीं. तुम्हीं नशीबवान म्हणून त्यानीं इतका वेळ दमधरला असें समजा. तर आतां उठा, आणि **दादासाहेब** तिकडे बलावीत आहेत तर जाऊन कायतें त्यांना विचारा. तुम्हीं अगदीं भिऊं नका. **दादा साहेब** खूष झाले, तर तुम्हांस कोणत्याच गोष्टीचा तोटा नाहीं. मागाल ती वस्तु तयार.

**देव**—**नात्या**, मनें कई जुयतूं नथी. मनें मारू घेर जवानूंच्छे. मनें घेर रवाना करसो, तो पैसा, तथा गेरणा, बद्धूं मळ्चूं.

**शास्त्री**—**दादासाहेब**, मला **महाराजां**कडे फार जरुरी-च्या कामासाठीं जावयाचें आहे. तर मीं जाऊन असाच परत येतों. ( असें म्हणून एका दरवाजानें बाहेर निघून जातो. )

**दादा**—( फार अतुर होऊन **देवकुवर** बसली होती

तेथें जाऊन ) देवकुंवर, तूं अशी रुसून किती वेळ बसणार बरें! चल ऊठ, व (पलंगाकडे बोटकरून) त्यावर जाऊन बैस. तुझ्या सारख्या सुंदर स्त्रियेस वृद्धपती मिळावा हें केवळ तुझें नशीब. परंतु तें आतां असत्य करण्याची वेळ नजिक आली आहे. देवकुंवर, तुला पाहून दोन तीन महिने झाले. परंतु तूं आमच्या हातास कशी लागत्येस, या विवंचनेंत आमचा बराच वेळ गेला. पुढें तुमचा मेथा जेठा, याला आम्हीं गांठला. तेव्हां त्यानें आपल्या बायकोच्या साहाय्यानें आमचें काम करून देण्याचें कबूल केलें. व आज दोन प्रहरीं येऊन “ सर्व तयारी आहे. रात्रीं दोन पालख्या घेऊन या ” असें सांगितलें. त्या प्रमाणें तूं येथें आलीस. मग विलंब कां बरें?

देव—मेथाजी अनें एनी बायडी, एने तमनें सूंकयूं तूं ए, मनें खबर नथी. मणिबाई मनें एम कयूं के, आ गांममां एक साधू आयवाच्छे. एनें दर्शन करीनें प्रसाद लिधो के छोकरा छोकरी कई बीथाय. वास्ते साधूनां दर्शन करवानूं माटे मणीबाईना साथे बार आवेलीच्छूं. एम जो मनें खबर होत, तो हूं नई आवत. मनें मेहेरबानी करी जावा देव. हूं एकली जईस.

दादा—वाग! तुला जाऊं देण्यासाठीं का येथें एवढी खटपट करून आणिली! जाण्याची गोष्ट आतां सोडूनच दे. येथें रहावयाचें नसेल, तर मीं सांगतों त्या प्रमाणें ऐक, ह्मणजे तुला तुझ्या घरीं पाठवून देईन. देवकुंवर, तुला दुसऱ्याची कांहींका कींव येत नाहीं! तुझें हें सुंदर व अप्रतिम वदन; गौरवर्ण काया; सर्व अवयवांची जेथच्या तेथें ठेवण; तुझ्या स्वभावाचा अल्लडपणा; व तूं मूळचीच रूपवान असल्यामुळें किंवा नीटनेटके पणाकडे तुझें स्वाभाविकच औदासिन्य, या सर्वकारणामुळेंच मीं तुजसाठीं अगदीं वेडाऊन गेलों आहें. मला आ-

तां तुजवांचून एक क्षणभरही चैन पडावयाचें नाहीं. तर तूं आतां ऊठ, व परकीपणा सोडूनदेऊन मला दृढालिंगन दे. म्हणजे मजवर तुझे महत उपकार होतील. ( असें म्हणून तिच्या जवळ जातो. )

**देव**—( त्याचा हेतू जाणून मागें होत्ये व रागानें ) पासे सूं करवा आवोच्छ ? लांबे रेहेजो.

**दादा**—( फारच उतावळा होऊन) हे सुंदरी, हे चारुगात्रे, तूं माझा आतां अंत पाहूं नको. तुझ्या वांचून सर्व स्त्रिया मला यावेळीं तुच्छ वाटत आहेत. माझी इच्छा जर तूं तृप्त करशील तरच हा प्राण राहील. नाहीं पेक्षां त्याचें काय होईल, हें माझ्यानें सांगवत नाहीं. **देवकुंवर**, याच रंगमहालांत शेकडों स्त्रिया आल्या. परंतु त्यांत तुझ्यासारखी एकही नव्हती. व त्या प्राप्त होण्यास मला यत्किंचितही श्रम पडले नाहींत. ( नंतर तिला भिववावें व कार्यसिद्धी करून घ्यावी या हेतूनें ) तुला हें माहीत असेलच कीं या राज्यांत मला कोणतीच स्त्री मिळणें अशक्य नाहीं. जिच्यावर माझें मन बसलें तिला मीं आणविलीच. त्याचप्रमाणें आज तुला आणिली आहे. (नंतर ती रडत आहे असें पाहून ) आतां तूं येथें रडलीस किंवा ओरडलीस, किंवा काय पाहिजे तें जरी केलेंस, तरी तुझी सुटका माझ्या सम्मत्ती वांचून प्रत्यक्ष ब्रह्मदेवाच्यानेंही व्हावयाची नाहीं. यासाठीं मीं तुला बऱ्या बोलानें सांगतों, कीं हा आपला हट्ट सोडून दे आणि—

**देव**—( त्या दुष्टाच्या हातून सुटावें या आशेनें ) भाई, तमों मारा बापच्छो. हूं तमारे पगे लागूं च्छूं. हूं तमारी डीकरी च्छूं. एम जाणीनें मनें रजा आपजो. ( असें म्हणून मोठ्यानें रडूं लागते. )

**दादा**— ( कामवासना अनावर झाल्यामुळें ) **देव-कुवर**, एवढावेळ मीं तुझे आर्जव केले. तुला धमकी देऊनपाहिलें. तरी तूं ऐकत नाहींस. तर आतां मला तुजवर जबरी करावी लागेल, आणि मग तुला वाईट वाटेल. म्हणून मीं तुला पुनः पुन्हां सांगतों कीं तूं येथून ऊठ व त्या पलंगावर जाऊन बैस. म्हणजे जुलूम वगैरे कांहीं एक न होतां सर्व कांहीं यथास्थित होईल.

**देव**— ( अधिकच रडून ) भाई, तमें जी वात करोच्छो ये वातमां हूं राजी नथी. ये नठारूं काम मारेथी थाय नईं. भले जीव लेसो, तो कबूल.

**दादा**—( ही आतां आपलें ऐकत नाहीं अशी खात्री होऊन लाडानें ) **देवकुवर**, तूं अशी काय बरें करतेस. चल ऊठ. ( तरी ती उठत नाहीं असें पाहून व कामाग्नी भडकून गेल्यामुळें देहभान विसरून तिला ओढूं लागून ) अहाहा, प्राणप्रिये, तुझे हे हात किती तरी सकुमार आहेत म्हणून सांगू ! व्यर्थ त्या नपूंसकाच्या ( नवऱ्याच्या ) हातीं पडलीस ! बरें पण देवाची करणीं कशी आहे पहा ! तुझी त्याला करुणा आली आणि तूं माझ्या हातीं लागलीस. आतां उगी. अशी रडूंनको.

**देव**—ए भगवान ! माराउपर स्त्रं संकट लायवूंच्छे! हूं तो पतिवरताछूं. अनें आ चांडाळ माणस मारा उपर केटलो जुलूम करेच्छे ! मनें हात लगाडेच्छे, अनें खेंचीनें जुलूमकरी पलंग उपर लेवा मागेच्छे! वास्ते ए भगवान ! तमें कईं करुणा आवती नथी! ए वल्लभनाथ! मारी छुटका कर! हूं तो पामरच्छूं. ( नंतर रागानें ) ए दुष्टा, मनें जावादे, नईंतो हूं आईं प्राणत्याग करींस.

**दादा**—( पूर्वीच बेफाम झाल्यामुळें व कामवेदना अधिक वेळ सहनकरवेनात म्हणून ) अहाहा, मीं आज धन्य आहें. या राज्यांतील, किंबहुना या जगांतील, ही केवळ अप्सराच मला आज प्राप्त झाली आहे.( असें म्हणून व अत्यानंदानें, ती रडत व ओरडत असतां व त्याच्या हातांतून सुटण्यासाठीं ओढाताण करीत असतांही) हायहाय! ही केवळ विद्युल्लता आहे, तरी माझ्या देहाचें सार्थक इच्याच आलिंगनापासून होणार आहे ( असें म्हणून तो तिला दृढालिंगन देऊन मुखचुंबन करीत आहे तों इतक्यांत, )

**एकमनुष्य**— अरे दुष्टा, चांडाळा, निशाचरा, तुझ्या हातांत ही गरीब गाय सांपडली म्हणून तिचा तूं असा छल मांडला आहेस काय? नीचा, हें घे तुला बक्षीस. ( असें म्हणून देवकुवरबाईला सोडवून त्यानें त्याला जी एक गचांडी दिली त्यासरसा तो दोन तीन हात दूर जाऊन जमीनीवर धाडकन पडला. नंतर झटकन जाऊन त्यानें एकादर वाजाची कडी काढिली. त्यासरसे त्या रंगमहालांत पंचवीस तीस शिपाई हातांत नग्न तरवारी घेऊन शिरले. त्यांतील दोन तीन असामींनीं **दादासाहेबांच्या** तोंडांत एक हातरुमालाचा बोळा घालून त्यांस चतुर्भुज करून तेथीलच्च विशाल पलंगाला बांधून टाकलें. एकानें **देवकुवरबाई** भयानें गर्भगळित होऊन गेली होती, तिला अश्वासन देऊन एके बाजूला नेऊन बसविलें. आणि त्यासर्वांनीं मिळून तेथें त्याच रात्रीं जे रुपयांचे तोडे आणून ठेविले होते ते सर्व लांब केले. व जातांना त्या महालांत एक लखोटा टाकून **देवकुवरबाई** सह ते निघूनगेले. )

## प्रवेश ३ रा.

**स्थल**—**रामशास्त्र्यां**च्या वाड्यांतील दिवाणखाना.

**पात्रें**—**रामशास्त्री, प्रधानजी, मावशीबाई** ( एक ब्राह्मण विधवा कुंटण ) **वैद्यराज, निराबाई** ( वैद्यराजांची गतभर्तृका मुलगी ) व **रामा** गडी.

**रामशास्त्री**— ( लोढाला टेकून आपल्याशींच ) वाहा वारे **शास्त्री** ! शाबास तुझी. ह्याराज्यांत तूं काय या घडा मोडी चालविल्या आहेस ! **दादासाहेब** व **प्रधानजी** असें समजत आहेत कीं आपण काय ते या राज्याचे चालक ! **महाराज** सरकार काय ते आपल्याच हातांत ! पण वेड्यानों, तुह्मीं झालां, **महाराज** झाले, किंवा **राणीसाहेब** झाल्या, तुह्मीं सर्व कळसूत्री बाहुलीं असून मीरे तुह्मां सर्वांना नाचवीत आहें ! ज्याप्रमाणें मीं तुह्मांस शिकवीत आहें, त्याप्रमाणें तुह्मीं वागत आहां. ह्मणूनच तुमच्या मनाप्रमाणें तुमचीं कामें होत आहेत ! माझ्या साह्या वांचून बेट्यानों एकतरी काम करावयाचें होतेंत ! **दादासाहेब** आपले शंकराच्या पुढचे, व **प्रधानजी** हे आयत्या पिठावर रेघा ओढणारे, त्यांचे सख्खे बंधू. **महाराज** सरकारही या रत्नद्वयाचे मुकुटमणी आलीकडे शोभतात खरे. ते वृद्ध **सेनापती** व वृद्ध **न्यायाधीश** काय ते जरा प्रामाणिक, निस्सीम भक्त, व **महाराजांचे** खरे खरे हितचिंतक होते व आहेत, हें मात्र खरें. माझ्या कारस्थानांस ते आपापल्या हुद्यांवर असतांना मोठा उपसर्ग होत असे. परंतु कशा शिताफीनें मीं त्या उभयतांस उडवून दिले, हें माझें मलाच माहीत ! आतां काय तो एक कांटा राहिला आहे. तो आल्यापासून माझें ह्मणजे वस्तुतः कांहीं नुकसान झालें आहे असें नाहीं.

उलट या ज्यांत मी जो पक युक्ती प्रयुक्तीनें **राजवैद्य** बनून गेलों होतों, तो मीं सांप्रत त्याच्याही पेक्षां अधिक मोठ्या हुद्यावर नाहीं काय? परंतु त्यानें माझा अपमान केला, म्हणूनच त्याला आज शासन करावयाचें आहे. ( इतक्यांत )

**रामा**—(मुजरा करून) **रावसाब**, माझा एक अरज हय.

**रामशास्त्री**—( त्याच्या बोलण्याकडे लक्ष न देतां) ओहो, **राम्या**, शाबास. त्या **मावशी**बाईनें तुला कायरे सांगितलें, तें पुन्हा सांग पाहूं.

**रामा**— ती आत्रा व्हय, **साब** ? ती का अशी तशी हय ! ती लई झांबाज, अन् शेनी. ती म्हंगाली कीं याक झोंप न्हाई झाली तों त्या पोरीस घेऊनशी खासखास हथ येईन.

**रामशास्त्री**— आणि तिचा मुलगा काय म्हणाला ?

**रामा**— तो का झनतुया, अन् ती का त्याचें ऐकतिया ! त्यो ल्योक बगा त्या आवासंगें लई भांडला. पन ती म्हंगाली का " जा मेल्या सांग कुणालातें. म्यां आपली जायची. "

**रामशास्त्री**— अरे, तो कोणालारे सांगेन म्हणाला ?

**रामा**—आकुनाला सांगातुयातो ! अन् त्येचें कुन ऐकतुया !

**रामशास्त्री**—पण तो सांगणार होता तरी कोणाला ?

**रामा**—**दादासाबास्नीं**, नीं दिसर कुनाला !

**रामशास्त्री**—अंः बरें पण **राम्या**, तूं त्या बाईची सर्व तयारी करून दिली आहेस ना ?

**रामा**—जी **साब**, समदी केलिया. पन **रावसाब**, माझा एक—

**रामशास्त्री**--हं हं, काय म्हणतोस ?

**रामा**—माझ्या हते पाव्हणे आल्याती, नीं कारभारीन म्हंगत होती क—

**रामशास्त्री**—काय म्हणत होती तें सांग लवकर.

**रामा**—का त्याचीं कायबी ग्वाड करावें. पन काय करूं ! मा पास काय बी न्हई.

**रामशास्त्री**— बरं बरं. हे घे आणि त्यांना गोड करून घाल व तूं खा. ( असें म्हणून त्याला पांच रुपये देतो. )

**रामा**—( मोठ्या आनंदानें घेऊन ) **रावसाब**, माझ्या-वर ही लई कृपा केलीत.

**रामशास्त्री**— त्या **म्हाद्याला** पाहाऱ्यावर बसवून तूं आपल्या कामाला जा. ( इतक्यांत )

**म्हाद्या**—( मुजरा करून ) **रावसाब, प्रधानजी** आन् ते कुन **राजवैद्य**, आल्याती.

**रामशास्त्री**—( उठून जरा पुढें जाऊन. ) यावें **प्र-धानजी**, असे या उच्चस्थानीं बसा. ( प्रधानजी व वैद्य-राज बसतात. )

**प्रधान**—कां **शास्त्रीबुवा**, आजची काय खबर आहे ?

**रामशास्त्री**—आजचा काय सोळा आणे बेत आहे. आणखीं अर्धघटकेचा काय तो अवकाश, कीं मग आपलें काम फत्ते.

**प्रधान**—असें तुम्हीं मला आज साहा महिनें सांगत आहां!

**रामशास्त्री**—पण आजचें त्या पैकीं नाहीं. **प्रधानजी**, आपल्या कामाविषयीं मीं जरा तरी कसूर करीन काय ?

**प्रधान**—घोडें मैदान आतां जवळच आहे. कसूर कराल किंवा नाहीं, याची परिक्षा आतांच्या आतांच होईल.

**रामशास्त्री**—फार उत्तम.

**प्रधान**—बरें **शास्त्रीबुवा**, आज या **वैद्यराजांचें** इथे काय काम आहे ?

**रामशास्त्री**—थोड्या वेळानें काय तें सांगतों. ( असें म्हणून जवळच एक खोली होती त्यांत जातात. )

**वैद्य**—खरेंच, **प्रधानजी**, माझें या ठिकाणीं काय बरें काम असावें ?

**प्रधान**— काय तें मला माहीत नाहीं. **शास्त्रीबुवा** सांगतील.

**वैद्य**—**शास्त्रीबुवां**कडे या पूर्वी मीं कधींही आलों नव्हतों. त्यांत ते मजवर लोभ करतात, असेंही नाहीं. यामुळें माझ्याशीं त्यांचें काय काम आहे, हें समजत नाहीं !

**रामशास्त्री**—( परत येऊन ) **प्रधानजी**, या **वैद्यराजां**चें माझ्या इथे काय काम आहे म्हणून तुम्हीं मला विचारिलें ना ?

**प्रधान**—होय.

**रामशास्त्री**—ऐका तर. हे **राजवैद्य** इथे येण्यापूर्वी **महाराजसरकारच्या** पदरीं **राजवैद्य** काय तो मींच होतों. यानीं येऊन काय शिकार मारली, ती आपणांस विदितच आहे. असें असून **सरकारची** मजवर अवकृपा ! तेव्हां या गोष्टीस कोण बरें कारण ?

**वैद्य**—तुम्हांला कोण वाटतो ?

**रामशास्त्री**—तुम्हीं.

**वैद्य**—मीं !

**रामशास्त्री**—होय तुम्हीं. पण ते कसे हें मीं आतां सांगत बसत नाहीं. एवढेंच सांगतों कीं तुम्हीं माझें मोठें

नुकसान केलें आहे, व त्याबद्दल मीं तुम्हांस आतांच शासन करणार. मग महाराज सरकार काय म्हणतील तें म्हणोत, व काय शिक्षा देतील ती देवोत.

**वैद्य**—( किंचित रागानें ) मीं तुमचें नुकसान केलें व त्याबद्दल तुम्हीं मला शासन करणार ! वाः, ही मोंगलाई आहे वाटतें !

**रामशास्त्री**—मोंगलाई आहे कीं काय, तें आतांच समजेल. ( नंतर प्रधानजीकडे वळून ) तुम्हीं त्या खोलींत माझ्या बरोबर चला. ( नंतर ) कोण आहेरे तिथे ?

**म्हादु**— जी सरकार.

**रामशास्त्री**—( हळुच ) इथे उभा रहा व या वैद्यबुवांस इथून हालूं देऊं नको. ( असें म्हणून प्रधानजीसह आंतील खोलींत जातो व ) कां मावशीबाई, आलां का तुम्हीं ?

**मावशी**— ( उठून उभीराहून ) व्हय व्हय महाराज, मीं आल्येंकी.

**रामशास्त्री**— या मुलीचें नांव काय, निराबाईना ? गरीब बिचारी ! काय बिचारीवर परमेश्वराचा कोप हा ! ही फारतर पंधरासोळा वर्षांची असावी ! आणि इतक्यांतच तिला वैधव्य यावें !

**मावशी**—( खोटेंच रडें काढून ) काय करावं महाराज ही पोर मोठी गरीब आहे हो ! बिचारी पण आपल्या आई-बापांच्या कशी आज्ञेंत असल्ये म्हणून सांगूं ! इवलसंच पाणी पी म्हणालीं, तर तेवढंच पिवून राहील. पण इतकेंही करून तिला सूख का आहे ! ( नंतर निराबाईकडे वळून ) मुली, उगा तूं आपली. रडून रडून पोरीनं आपले डोळे कसे सुजवून घेतले आहेत पहा ! तूं फार दुःख काढलेंस,

म्हणून देवानेंच मला आपली बुद्धी दिली, नीं मीं तुला घेऊन इथ आल्येंहो. आतां देवाच्या दयेनं तुला अगदीं दुःख म्हणून व्हायचं नाहीं.

**रामशास्त्री**— कां **प्रधानजी**, आजतरी आपलें काम फत्ते झालें का ?

**प्रधान**— ( मोठ्या आनंदानें ) हो हो, हें काय विचारावें !

**रामशास्त्री**— ( हळुच ) ही कोणाची कोण समजलें का ?

**प्रधान**— नाहीं.

**रामशास्त्री**— बाहेर **वैद्यराज** आहेतना ? त्यांची ही मुलगी.

**प्रधान**—(मोठ्या आश्चर्यानें) असं असं असं ! कोणाची कां असेना. तिला पाहिल्यापासून आपण तर बुवा अगदीं वेडे झालों आहों. ती आपल्याला कशी प्राप्त होते, ही मला मोठी काळजी लागली होती. परंतु ती आतां तुमच्या योगानें दूर झाली.

**रामशास्त्री**— बरें **प्रधानजी**, आतां आपला पुढें काय विचार आहे ?

**प्रधान**—पण आतां या **बाईचें** इथे कांहीं काम आहे काय ? नसेल तर त्यांनां कबूल केलेंलें बक्षीस देऊन दुसऱ्या ठिकाणीं जाऊन बसावयास सांगा.

**रामशास्त्री**—**मावशीबाई**, तुम्हीं फार श्रम घेऊन आमचें काम केलेंत, त्याबद्दल हें घ्या. ( असें म्हणून तिला एक रुपयांची थैली देऊन ) आणखीं तुम्हांला जें द्यावयाचें तें

उदईक देईन. ( नंतर मुलीकडे बोट करून ) हें कसें काय प्रकरण आहे ? अनावर बिनावर तर नाहींना ?

**मावशी**—नाहीं, तशी कांहीं ह्मणण्या सारखी नाहीं. पण जरा हट्टी मात्र आहे. कां **निरूबया**, मीं आतां जाऊं ना ? पहांटेस येऊन तुला घरीं घेऊन जाईन बरं. पण हट्ट बिट्ट करूं नको हो.

**निरा**—( मावशीबाईचा हात आपल्या हातांत घट्ट धरून) तुह्मीं मला इथ कशासाठीं आणिलीत, नीं मला टाकून आतां तुह्मीं कुणीकडे चाललां ?

**मावशी**—आं, इतकं मेलं शिकवलं, पढवलं, तरी आपलं तें आहेच का ! वा ग, बरीच की आहेस ! मीं सांगितलं आहे त्या प्रमाणं ऐक बरं, नाहीं तर—

**निरा**—( रडवें तोंड करून ) पण तुह्मीं मला काय सांगितलं, नीं मला इथ टाकून तुह्मीं कुठ चाललां ? तुह्मीं जाल तर मीं कांहीं इथ एकटी रहायची नाहीं, ऐकलं का ?

**मावशी**—एकटी रहायची नाहीं ह्मणजे ! इथ वाघबीघ का आहे ? असंच करून चंद्रहार मिळतो वाटतं !

**निरा**—तें कांहीं मला समजत नाहीं. मीं आपली तुमच्या बराबर येणार.

**मावशी**—( शास्त्र्यांच्या कानांत ) मीं कांहीं तरी निमित्य करून इथून बाहेर जात्यें. मग तुमचें तुह्मीं काय तें पहा. नवीनच आहे म्हणून ही प्रथम जरा गडबड. ( नंतर मुलीकडे वळून ) **मुली**, मीं जात्यें बरं.

**निरा**—( रडावयास लागून ) **मावशीबाई**, मीं तुमच्या

बराबर येईन आं. मीं कांहीं इथ रहायची नाहीं. ( असें ह्मणून मोठ्यानें रडूं लागत्ये. )

**वैद्य**—( आपली मुलगी रडत आहे असें आवाजावरून ओळखून घाबरा होऊन ती होती त्या खोलींत एकदम घुसतो व मुलीकडे बोट करून रागानें ) **प्रधानजी**, एवढ्या रात्रीं इला येथें कोणीं व कशासाठीं आणिली ?

**प्रधान**—( घाबरून थरथरा कांपावयास लागून ) **वैद्यबुवा**, मीं नाहीं. मीं नाहीं. **शास्त्रीबुवा**—

**वैद्य**—मग तुम्हीं यावेळीं इथे कशासाठीं आलां ? (**नंतर** अधीक रागानें ) **शास्त्रीबुवा**, तुम्हीं का माझ्या मुलीस **इथे** आणलीत ?

**रामशास्त्री**—होय. मग काय म्हणतां ?

**वैद्य**—( त्या खोलींतील सर्वत्रांकडे रागानें पाहून **व** मावशीबाईच्या आंगावर धांवत जाऊन ) **थेरडे**, याच **हेतूनें** आमच्या इथे येत होतीस काय ? पोळपाट लाटणें **हातांत** आलें आहे तरी हे कुंटणपणाचे धंदे करायचेच, आं ? **चांडा**-ळणी, मीं आतां सर्व समजलों. (नंतर शास्त्र्याकडे बोट करून ) या दुष्टानें बक्षिसाचें आमीष दाखवून तुला हें निंद्य कर्म **कर**-ण्यास प्रवृत केलें. हे राक्षसी, तूं जरी बोलत नाहींस, **तरी** या **प्रधानजी**साठीं, हें मीं समजलों,

**रामशास्त्री**—**वैद्यबुवा**, तुमचा जो मीं सूड **घेणार** होतों तो हाच, समजलां ?

**वैद्य**—( रागानें दांतओंठ चावून ) अधमा, नीचा, **दुष्टा**, दुसऱ्या धंद्यांनीं तुझें पोट जळत नाहीं ह्मणून का रे हा धंदा **तूं** करीत असतोस ? या तुझ्या पातका बद्दल तुला रवरव **नरक**-वास रे भोगावा लागेल !

**रामशास्त्री**—( आनंदानें ) **वैद्यबुवा**, या वेळीं तुह्मांस जो संताप व दुःख झालें आहे तें पाहून मला मोठा आनंद होत आहे. परंतु मला अत्यानंद व्हावयाचा तो अजून पुढेंच आहे. आतां तुमच्या समक्ष तुमच्या मुलीस **प्रधानजी** बरा-बर पाठवून तुह्मांस येथें चतुर्भुज करून ठेवतों. यावेळीं मला वाटेल तें मीं तुमचें करीन. तुमचा कोण वाली असेल त्यानें यावेळीं तुह्मांस तुमच्या मुलीसह मुक्त करावयास यावें.

**वैद्य**—( मोठ्या रागानें ) दुष्टा, तुझी जिव्हा झडो रे ! माझ्यामुलीस माझ्या समक्ष कोण हात लावतो हें मीं आतां पहातोंना !

**रामशास्त्री**—( रागानें ) जारे, तुझ्याच्यानें काय व्हाय-चें आहे ! तुला आतां कोण विचारतो ! **महाराज सरकार** च्या दमावर उड्या मारीतअसशील तर फुकट पडशील मात्र. ( नंतर मावशीबाईकडे वळून ) जा तुह्मीं तिला घेऊन. ( नंतर वैद्याकडे बोट करून ) यानें कितीही शिरा ताणल्या, तरी याच्यानें तुमचें काय व्हायचें आहे !

**मावशी**—( जरा धीर येऊन ) चल ग मुली आपण घरीं जाऊं ? तुझी आई वाट पहात असेल.

**वैद्य**—खबरदार **थेरडे**, तिला घेऊन जाशील तर. तुला एथच्या एथेंच ठार करून टाकीन.

**मावशी**—माझें खेटर तुह्मांला भीतें. ( असें ह्मणून आ-पला एक पाय जमीनींवर आपटतें. )

**रामशास्त्री**—( जवळ जाऊन ) हं, **बाई**, तुह्मीं चला.

**वैद्य**—( अत्यंत रागानें धांवत जाऊन ) **थेरडे**, ऐकत नाहींस व खेंटर उडवित्येस काय ? हें घे त्याचें फळ ( असें ह्मणून खिशांतून जंबिया काढून तिच्या पोटांत खूपसतो. )

**मावशी**—आयायायायायाई ! ( असें ह्मणत धाडकन जमीनीवर पडली. )

( **निराबाईनें** हें पहातांच एक मोठी किंकाळी फोडिली व तीही बेशुद्ध जमीनीवर पडली. )

( **प्रधानजीची** बोबडीवळून तेही मटकन जागच्या जागीं बसले. )

**वैद्य**—( आंगावर खून चढल्यामुळें बेफाम होऊन शास्त्रीबुवांच्या आंगावर धांवत जाऊन ) अरे **चांडाळा**, तूं माझा छल करणारना ? कर कसा करतोस तो पाहूं ? ( असें म्हणून बर्ची काढून त्याला मारणार तों. )

( चारपांच असामीं नग्न तरवारी हातांत घेऊन त्या खोलींत धांवत आले. त्यांनी **शास्त्रीबुवांची** मुक्तता करून **वैद्यबुवांस** चर्तुभूज केलें व **निराबाई** व **मावशी** यांस घेऊन गेले.)



## प्रवेश ४ था.

*स्थल*—राजदरबार—**पात्रें**—**दौलतरावराजे**, **प्रधान**, **दादासाहेब**, **सेनापती**, **न्यायाधीश**, **रामशास्त्री**, **वैद्यराज** व इतर मंत्री वगैरे.

**राजा**—**प्रधानजी**, दरबारची सर्व मंडळी हजर आहेना ?

**प्रधान**—**महाराज**, सर्व हजर आहेत.

**राजा**—**आचार्य**, असे जवळया ?

**न्यायाधीश**—आज्ञा **महाराज**. ( असें म्हणून सेनापतीसह जवळ जाऊन बसतो. )

**राजा**—**आचार्य**, प्रकृती वगैरे कुशल ?

**न्यायाधीश**—ईशकृपेनें अजूनपर्यंत बरी आहे, **महाराज**.

**राजा**—कांहीं विशेष खबर ?

**न्यायाधीश**—सांगण्यासारखी कांहीं नाहीं.

**राजा**—**प्रधानजी**, परवां **दादासाहेबांची** जी दोन-लाखांची चोरी झाली, तिचा शोध लागला काय ?

**प्रधानजी**— आम्हीं सर्वांनीं फार शोध केला परंतु कांहींएक पत्ता लागला नाहीं. अजून तपास सुरूच आहे.

**राजा**—कां, **न्यायाधीश**, हा मोठा चमत्कार आहे कीं, नाहीं ?

**दादा**—**महाराज**, आपल्या राज्यांत जर चांगला बंदोबस्त असता तर असा दरवडा पडलाच नसता. व पडला असता, तर त्याचा शोध तरी लागल्याशिवाय राहिला नसता. शहरांत बंदोबस्त कसा असतो याविषयीं **रामशास्त्री** सांगतील, त्यावरून **महाराजांची** खात्री होईल.

**रामशास्त्री**—( विचारण्याची वाट न पहातां ) **महाराज**, त्या दिवशीं **दादासाहेबां**कडे मीं मध्यरात्रीच्या सुमारास गेलों होतों. त्यावेळीं मला सर्व कच्चें वर्तमान कळलें. तेव्हां मीं व ते नवीन आलेले **नाना**, असे घोड्यावर बसून बराबर दहावीस स्वार घेऊन तपास करण्यास गेलों. अपरात्र झालेली होती व शहरांत जिकडे तिकडे अगदीं सामसूम होतें. परंतु सांगण्यास मोठें वाईट वाटतें कीं शहरांतील पाहाऱ्यावरील शिपाई बहुतेक सर्व गांजा तमाखू पिऊन अगदीं गुंग झालेले आम्हांस आढळले.

**राजा**—**शास्त्रीबुवा**, त्या दिवशीं रात्रीं **दादासाहेबां**कडे तुम्हीं गेलां होतां ! बरें मग त्या बद्दल आपल्या **सेनापतीस** जाऊन वर्दी द्यावयाची सोडून तुम्हीं स्वतः तपास करावयास काय म्हणून गेलां ?

**सेनापती**—जी साब, **खुदावंत.** माझी लाज सरकाराला. दिसरी कुणाला ? मी का नामर्द हय ?

**न्यायाधीश—महाराज**, आपण योग्य प्रश्न केला.

**दादा**—( आपला डाव साधत नाहीं असें पाहून मुद्दाम नम्रतेनें ) **महाराज, शास्त्रीबुवांस** तपास करण्यासाठीं मीं पाठविलें होतें.

**राजा**— (राग न दर्शवितां) **प्रधानजी**, तुम्हीं तरी **सेनापतीस** या चोरीविषयीं सांगितलें होतें काय ?

**प्रधान**— ( घाबरून ) **महाराज**, मी, **दादासाहेब**, व **शास्त्रीबुवा**, असे आम्हीं तपास करीत आहों.

**राजा**—( रागानें ) **प्रधानजी**, मीं तुम्हांस काय विचारिलें आणि तुम्हीं काय उत्तर देतां हें !

**दादा—महाराज**, या चोरीविषयीं वर्तमान **सेनापतीस** समजलें आहे. मग अद्याप त्यानीं कां शोध लावला नाहीं? ते वृद्ध म्हणून त्यांच्या बद्दल आम्हीं तसदी घेतली. यामुळें, **महाराज**, आपण आम्हांवरच घुस्सा करतां, तेव्हां आमचें प्रालब्ध !

**राजा**—( शांत होऊन ) यांत तुह्मांला आह्मीं दोष देतों असें नाहीं.

**दादा**—( महाराज शांत झालेले पाहून अधीक धीर येऊन ) **महाराज**, आपल्या राज्यांत यत्किंचितही उणेपणा नसावा ह्मणून आह्मीं रात्रंदिवस झटत असतों. परंतु **महाराजांस** तें आवडत नाहीं. तर मीं आपला आज पासून घरीं बसतों.

**राजा**—( घाबरून ) हं हं, **दादासाहेब**, तुह्मीं असे रागावूं नका.

**दादा**—( दुःख झालेलें दर्शवून ) ज्यानीं त्यानीं आपापल्या हुद्या परत्वें आपापलीं कामें केलीं असतीं, तर आज असें कां झालें असतें ? हें काम **सेनापतींचें**. ते वृद्ध असोत किंवा नसोत. त्यांनीं हें काम करावेंकिंवा नाहीं व केलें आहे किंवा कां केलें नाहीं, याविषयीं **महाराजांनीं** कृपा करून तपास करावा.

**सेना**—( न्यायाधिशांच्या कानाशीं लागून नंतर ) **महाराज**, शहरचा आन् आपल्या राज्याचा बंदोबस्त करण्याचें काम पलटणीतील शिपायांकडे असूनशी त्यांच्यावर माझी देखरेख हय. म्हणुनशी याचा दोस समदा माझ्याकडे हय. आतां आपल्यास माझी यवढी इनंती हय कीं माझ्यानें आतां काम कई होत न्हई. याक पोरगं कुठ हय! तें कवाबी येईल आन् त्याच्या गळ्यांत आपलें काम देऊनशी मोकळा हुईन, असें मनांत हुतं. पन ( दुःखी होऊन ) त्योबी कुठ येत न्हई. तवा मला हा जंजाळ कशाला हुवा ? म्हणून आपलं काम सोडण्यास मला **महाराजांची** आज्ञा असावी. म्हंजे मीं आपला दुःखी कष्टी ! कुठ काशीबीशीस जाऊनशी तरी न्हाईन. मला हा खटाटोप का करायचा आहे ?

**रामशास्त्री**—( दादांच्या कानांत ) हें फार उत्तम झालें. सुंठी वांचून खोकला गेला. ( नंतर आनंदी मुद्रा करून ) आतां आजच्या आज आपल्यास सेनापतीचीं वस्त्रें मिळालीं पाहिजेत, म्हणजे त्या आनंदास पारावारच नाहीं. ( असें म्हणून तो दादासाहेबांस कांहीं सांगून निघून जातो. )

**राजा**—(सखेदाश्चर्यानें) **प्रधानजी** , काय **सेनापती** रागावलेसें दिसतें ! परंतु त्यांनां कसें जाऊं द्यावें ! आज ते म्हणजे या राज्याचे मुख्य खांब. (नंतर सेनापतीकडे वळून) **से-**

**नापती**, आंह्मांला सोडून जाण्याचा तुमचा हा बेत एकाएकीं झाला ! तुह्मांस तो पसंत असेल, परंतु आमच्यानें तुह्मांस रजा देववत नाहीं. मीं तुह्मांस खरेंच सांगतों कीं तुह्मीं आपल्या हुद्यावर आहां तोंपर्यंत आमची खंडणी बिन हरकत येत जाईल. आह्मांला परशत्रूची भिती उत्पन्न होणार नाहीं व आह्मीं सुखानें राज्याचा उपभोग घेऊं. परंतु तुह्मीं गेलां, कीं या राज्याला उतरती कळा लागलीच ह्मणून समजा.

**सेनापती—महाराज**, आपण काय ह्मणतां तें मला समजत न्हई. मीं आपला जंगली गडी, आणि ह्मातारा झालेला. माझ्यानका मागल्या वाणी काम होतय ! ह्मणून मीं हात जोडून मागतों कीं मला आज्ञा द्याच.

**न्यायाधीश—महाराज**, मलाही रजा मिळण्याची आज्ञा व्हावी. मीं झालों, **सेनापती** झाले, आह्मीं या राज्यांत आपले वडील गादीवर होते तेव्हां पासून नोकरी करीत आहों. आमच्या वयाला साठ साठ वर्षें होऊन गेलीं. आतां यापुढें आमच्या हातून आमचीं कामें उत्तम रीतीनें होत नाहींत. ह्मणून त्या कामांवर आह्मीं रहावें हें आह्मांसच प्रशस्त वाटत नाहीं. आपला आमच्यावर खरोखर फार लोभ आहे. ह्मणून आपण आह्मांस जाऊं देऊं नये, हें आपल्यास भूषणप्रद आहे खरें. परंतु आह्मींही यापुढें न रहावें हें आह्मांस ही योग्यच आहे. तर कृपाकरून आह्मां उभयतांस रजा मिळावी.

**राजा**—( अत्यंत आश्चर्यानें व दुःखानें ) काय **आचार्य**, आपलाही जाण्याचा बेत झाला ! मग आह्मीं तरी कशास रहावें ! जसा तुमचा बेत, तसाच आमचा.

**न्यायाधीश**—छे, छे, **महाराज**, असें कोठें झालें आहे. आह्मीं गेलों तर आमच्याहूनही अधिक चांगले असे शेकडों

लोक मिळतील. पण आपल्यासारखा प्रजापालनकर्ता, एकही मिळणें दुर्लभ आहे.

**दादा**—**महाराजांस** माझी एक विनंती आहे. **न्यायाधीश** व **सेनापती**, हें वृद्ध द्वय स्वखुषीनें रजा मागत आहे, तर आपण त्यांस विनहरकत रजा द्यावी. त्यांचीं कामें आह्मीं एकक्षणभरही पडूं देत नाहीं. राज्यकारभार कसा चालेल ही आपल्यास अगदींच शंका नको.

**राजा**—( विचारांत निमग्न आहे तों **शास्त्री** व **नाना** दरबारांत येतात व **नाना** संन्निध जाऊन मोठ्या अदबीनें मुजरा करून त्यांस एक पत्र देतो. तेव्हां ) **नाना**, तें काय, पत्र आहे ?

**नाना**—होय **महाराज**. कृपाकरून तें आपणच वाचावें.

**राजा**—( पत्र वाचून अधिकच विचारांत निमग्न होतो. नंतर त्रास आल्यासारखें करून ) **प्रधानजी**, **सेनापती** व **न्यायाधीश** यांच्या जागा रिकाम्या झाल्या हें फार वाईट झालें. असो. त्या उभयतांस ताहा हयात दरमहा एकेक हजार रुपये बैठा पगार देत जावें व त्यांच्या मान इतमामांत कोणत्या ही रीतीनें कमिपणा आणूं नये. **दादासाहेबांस** सेनापती करून वेद शास्त्र संपन्न **रामशास्त्री** यांस न्यायाधीश नेमिले आहेत. त्यांस रीतीप्रमाणें पोषाख द्यावे व या व्यवस्थे विषयीं आपल्या सर्व राज्यांत वर्दी द्यावी.

**प्रधान**— आज्ञा **महाराज**. ( पोषाख आणून ते राजेसाहेबांच्या आज्ञेप्रमाणें, जुने व नवे सेनापती व न्यायाधीश यांस देऊन दरबार बरखास्त करतो. )

( सर्व निघून जातात. )

## प्रवेश ५ वा.

**स्थल**—नगराबाहेरील एक वाडा.

**पात्रें**—**रामशास्त्री, दादासाहेब, नाना** व त्यांचा मित्र **गणपतराव**.

**गणपतराव**—कां **नानासाहेब, पूर्णानंदस्वामीं**चा प्रसाद समारंभ आज दोन प्रहरीं याच वाड्यांत झाला. तेव्हां तेथें तुम्हीं होतांना ?

**नाना**—होय, मीं होतों.

**गणपतराव**—या शहरांत त्यांस शिष्यमंडळ कोणकोण मिळालें ?

**नाना**—**महाराज** सरकारच त्यांचे शिष्य झाल्यावर इतर मंडळीनीं काय ! त्यांची दीक्षा भराभर घेतली. म्हणजे जेव्हढी म्हणून दरबारची मंडळी, त्या सर्वांनीं स्वामींस आपले गुरू केले.

**गणपतराव**—( आश्चर्यानें ) काय म्हणतां काय ! **आचार्य** वगैरेसुद्धां !

**नाना**—**आचार्य, सेनापती,** व **जमनाबाई**साहेब, एव्हढीं काय तीं नाहींत.

**गणपतराव**— बरें पण **नानासाहेब**, तुम्हीं इतके दिवस या समारंभाची खटपट करीत होतां, म्हणून तुम्हीं त्यांचे पट्टशिष्ये झालां असाल ?

**नाना**— छे छे. आमची मातोश्री मयत, यामूळें मीं व्रतस्थ आहें. असें कारण सांगून मीं आपली सुटका करून घेतली.

**गणपतराव**— परंतु तुम्हांस ती दीक्षा घेण्यास काय अडचण होती ?

**नाना**— या **स्वामींची** दीक्षा घेणें, म्हणजे त्यांच्याप्रमाणें सुरापान करणें. परंतु तें मला आवडत नाहीं. या शाक्त मतानुयायीलोकांची दुसरी एक अतीनिंद्य चाल आहे. ती कोणती म्हणून विचाराल तर हा वेळपर्यंत या वाड्यांत जी चालली होती ती.

**गणपतराव**— म्हणजे काय? मी समजलों नाही ?.

**नाना**— तें माझ्यानें स्पष्ट सांगवत नाहीं. **दादासाब** वगैरे मंडळी वाड्यांत काय करीत आहे तें चला आपण जाऊन पाहूं ह्मणजे सर्व लक्षांत येईल. ( असें ह्मणून ते आपल्या मित्रासह ज्या दिवाणखान्यांत **दादासाहेब** व **शास्त्रीबुवा** होते, तिकडे गेले. व कोणास न दिसेल अशा ठिकाणीं उभे राहून ऐकूं लागले. )

**दादा**—( झेंपा देत देत एका लोडाशीं टेंकून बसतात व ओढत ओढत शब्दानें) कां **शास्त्रीबुवा**, आज सर्व दिवस क, कसा आनंदांत गेला? त्या दोघां थेरड्यानीं मात्र कायती घाण केली. पण लक्षांत ठेवा, कीं त्यांचा सूड घेतल्याशिवाय मीं कधीं रहावयाचा नाहीं.

**शास्त्री**—अलबत घेतलाच पाहिजे. आपण न घ्याल तर दुसरा कोण घेईल? काय मोठे धर्मराज ! तो **स्वामींचा** प्रसाद. त्याला का मद्य ह्मणावयाचें !

**दादा**— नाहींच ( नंतर लोडाशीं टेकले होते ते आडवे होऊन ) वाः, काय ब्रह्मानंदांत मीं या वेळीं लोळत आहे हा ! आज रात्रीं स्वामीनीं काय केलें तें—घट—

**शास्त्री**—घट कंचुकी.

**दादा**—हां, घट कंचुकी. होय, घट कंचुकी. अहाहा,

काय ती मजा ! हे स्वामीं नेहमीं येथें राहतील व रोज असे प्रकार करतील तर मोठी बहार होईल !

**शास्त्री**—आपल्यासारख्यांचा त्यांना आश्रय मिळाला म्हणजे त्यांना रहावयास काय हरकत आहे ?

**दादा**—**शास्त्रीबुवा**, आज **प्रधानजींनी** बा निवडक निवडक मोठी माषुक मंडळी आणविली होती. त्यांत दोन तीन तर अप्रतिम होतीं. त्या **मगन्याची** ती **देवकुवर**, इची बटिक ही शोभणार नाहीं. !

**शास्त्री**—ओहो, इतकीं उत्तम आं ! मग कसें काय झालें. ?

**दादा**—व्हायचें काय ! त्यांच्या चोळ्या दुसऱ्यांच्याच हातांत गेल्या होत्या.

**शास्त्री**— ( आश्चर्यानें ) मग ?

**दादा**—मग काय ! घेतल्या त्या हिस्कून आणि—

**शास्त्री**— वाहवा ! शाबास! शूरतेशूर ! पण **दादासाहेब**, हें धाडस दुसऱ्या कोणाच्या आंगीं नाहीं बेरं !

**दादा**—अरे, कोण आहेरे तिथे ?

**एकनोकर**— जी साब.

**दादा**—जा तिकडे आणि तो घट व वाट्या आहेत, त्या इकडे आण.

( आणून पुढें ठेवतो. **दादा** व **शास्त्री** अधीक प्राशन करतात. )

**शास्त्री**—**दादासाहेब**, ईश्वराच्या कृपेनें आपले व माझे बहुतेक हेतू सिद्धीस गेले. आतां थोड्यावेळापूर्वी सांगितलेला मात्र सिद्धीस जावा, म्हणजे मीं कृतकृत्य झालों. परंतु त्या कामीं मला आपलें अभिवचन पाहिजे.

**दादा**—**शास्त्रीबुवा**, तुम्हीं माझे जिवस्य कंठस्य आहां.

तुम्हांस वाटेल तें करण्यास माझी परवानगी आहे. मीं जवळच आहें. अगदीं भिऊं नका. ( असें म्हणून उठून बसतात व घेरी आल्यामुळें लोडाला मस्तक टेंकतात. )

**शास्त्री**—( घाबरून ) **दादासाहेब**, आपल्याला काय होतें ?

**दादा**—ओ, ओ, ओ. ( असें करून ओकतात. )

**शास्त्री**—( त्यांचें तोंड पुसून व त्यांना दुसऱ्या ठिकाणीं निजवून आपल्याशींच ) आपण आतां जावें. ( असें म्हणून **जमनाबाई** ज्या खोलींत होती त्या खोलीजवळ जाऊन दार ठोठाऊं लागतो.

( **नाना** व **गणपतराव** त्यांच्या मागून जातात व पहात उभे रहातात. )

**जमना**—दार कोण वाजवीत आहे ?

**शास्त्री**—( लबाडीनें हळुच ) मीं तो.

**जमना**—मीं कोण ?

**शास्त्री**—मीं महाराजांचा न—

**जमना**—( महाराज आले आहेत असें समजून ) कोण, **महाराज** ! ( असें म्हणून दार उघडत्ये व **शास्त्रीबुवांस** पाहून दचकून मागें होत्ये. )

**शास्त्री**— कां **जमना**, मागेंशा होतां ? ( ती बोलेना म्हणून पुन्हां ) अहो **जमना**, तुम्हीं तीनचार वर्षांची होतां, तेव्हांपासून मीं तुम्हांस चांगलें ओळखतों. परंतु तुम्हीं कशाला बुवा गरिबास ओळखाल ! ( तरी ती बोलेना म्हणून ) तुम्हांला वाटत असेल कीं हे आपली कांहीं तरी ओळख सांगत आहेत. पण तसें नाहीं बरें ! मला तुमची पक्की ओळख आहे. ( नंतर इजला

आपली कांहींच माहिती नाहीं असें पाहून ) तुमचे वडील **संपतराव**—

**जमना**—( मध्येंच ) होय, माझे बाबा **संपतराव.** ( नंतर उत्कंठेनें ) काय, ते इथ आले आहेत ?

**शास्त्री**—ते इथे आहेत किंवा कोठें आहेत, हें मग सांगेन. परंतु मला तुम्हांस एक गोष्ट विचारावयाची आहे, ती विचारूं का ?

**जमना**—( आपल्या बापाविषयीं हा कांहीं सुवार्ता सांगणार आहे असें मनांत येऊन निष्कपटपणानें ) खुशाल विचारा.

**शास्त्री**—मीं विचारतों, पण तुह्मीं ऐकाल अशा विषयीं मला वचन द्या.

**जमना**—मीं सांगत्यें हेंच माझें वचन.

**शास्त्री**—तसें नाहीं. वचन द्याल तर बोलतों.

**जमना**—तुमचें काम माझ्यानें होण्यासारखें असेल, तर मीं खचीत करीन, हेंच माझें वचन समजा.

**शास्त्री**—**जमना**, तुह्मीं या राज्यांत बरींच वर्षें आहां. थोडक्या वर्षांपूर्वी **महाराजांची** तुमच्यावर अत्यंत प्रीती होती, परंतु तशी आलिकडे नाहीं, हें खरें कीं नाहीं ?

**जमना**—बरें मग, पुढें काय ह्मणतां ?

**शास्त्री**—**महाराजांचा** आश्रय तुह्मांस कोणी मिळवून दिला, हें कांहीं तुह्मांस माहित आहे ?

**जमना**—नाहीं.

**शास्त्री**—आतां तुह्मींच पहा कीं तुह्मीं येथें कशा आलां ! तुमचे वडील **संपतराव** यांची काय स्थिती आहे ! तुमची सापत्नआई कोठें आहे ! वगैरे तुह्मांस कांहीं एक माहित नाहीं. परंतु हें सर्व मीं सांगूं शकेन. त्याचप्रमाणें **महाराजांची**

तुमच्यावर जी गैरमर्जी झाली आहे ती जाऊन सुप्रसन्न मर्जी होईल अशीही मी तजवीज करीन. तुह्मीं सांगाल तें करीन. परंतु-

**जमना**—परंतु काय ?

**शास्त्री**—माझा काय हेतू आहे, हें तुमच्या लक्षांत आलें ही असावें. मग असे आढेवेढे कां ! माझा हेतू तुमच्या संबंधानें पाहिला असतां अयोग्य किंवा अशक्य आहे, असें नाहीं. तुह्मीं धूर्त अहां. तेव्हां अशा अपरात्रीं मीं येथें एकटा कां आलों, हें तुह्मांस समजण्यास कठीण नाहीं. माझी इच्छा तृप्त केल्यानें तुह्मीं कांहीं पापाचरण केलें, असें होत नाहीं. कारण तुमच्या मालक तुह्मींच आहां. **महाराजांची** भीती आहे असें ह्मणावें, तर सांप्रत ते तुमच्याकडे पहात सुद्धां नाहींत ! ह्मणून मीं सांगतों कीं माझा हेतू तृप्तकरून तुम्हीं अधिक आनंदी व्हावें.

**जमना**—( शास्त्रीबुवांचा हेतू समजून ) **शास्त्रीबुवा, महाराजांची** आलिकडे मजवर अवकृपा आहे, ह्मणून तुमच्या इच्छेनुरूप वागल्यें असतां मीं सुखी होईन, असें तुमचें ह्मणणें. परंतु मला सुखी होऊन तरी काय कर्तव्य आहे! माझाच जीव मला नकोसा झाला आहे. माझें एकंदर आयुष्यच दुःखांत गेलें आहे. तेव्हां यापुढें तरी मला सुख कशास पाहिजे !

**शास्त्री**—(ही स्वतःविषयीं इतकी बेपर्वा आहे असें पाहून) तुह्मांस आपले वडील कारागृहांतून मुक्त व्हावे व त्यांची भेट व्हावी, अशी इच्छा असेल तर माझ्या इच्छेनुरूप वागा. नाहींपेक्षां ते दुःखांत आहेतच व तुह्मींही अधिक दुःखांत पडाल. याचा नीट विचार करा.

**जमना**—तुमच्या बोलण्यावरून माझे बाबा जिवंत असून कारागृहांत आहेत, असें समजतें. आतां ते जिवंत आहेत हें ऐकून मला आनंद झाला; परंतु कारागृहांत आहेत हें ऐकून

फार वाईट वाटतं. हे देवा, काय माझ्या बाबांची ही अवस्था ! ( असें ह्मणून रडूं लागत्ये. )

**शास्त्री**—( तिच्या मनांत अधिक भीती उत्पन्न करावी या हेतूनें ) **जमना**, तुमच्या बाबांची व तुमची अशी अवस्था कां झाली हें तुह्मांस माहित आहे ? **संपतरावांचा** व माझा कांहीं कारणावरून द्वेष पडला, त्यामुळें मला हें सर्व करणें प्राप्त झालें. आतां हें सर्व उलट व्हावें अशी तुमची इच्छा असेल, तर त्याला मीं सांगितली हीच युक्ती.

**जमना**—( रागावून ) तर मग माझा व माझ्या बाबांचा छल करणारे तुह्मींच ? ठीक आहे. आतां तुह्मीं एकदम येथून निघून जा कसे.

**शास्त्री**—तुमच्या अशा रागाला मीं भिणार नाहीं. या राज्यांत माझ्या केंसालाही हात लावणारा कोणी नाहीं. म्हणून मीं तुह्मांस निक्षून सांगतों कीं माझा हेतू परिपूर्ण झाल्याशिवाय मीं येथून हालणार नाहीं. तुह्मीं ओरडलां, रडलां व रागावलां, तरी चिंता नाहीं. मीं येथें आहे तोंपर्यंत तिसरा मनुष्य म्हणून येथें यावयाचा नाहीं. तुह्मांस मीं ह्या वेळपर्यंत सामोपचारानें सांगत आहे तें ऐका. त्यांत तुमचें कल्याण आहे. इतकेंही करून न ऐकाल तर—

**जमना**—( ह्या निर्लज्जपणा पाहून अधिकच रागावून ) मीं तुमचें न ऐकलें तर तुह्मीं माझा प्राण घ्याल. आणखीं तर तुमच्या हातांत कांहीं नाहींना ? ठीक आहे. मीं मरण्यास तयार आहे. परंतु तुमच्या सारख्या नीच, घातकी, पापी व पाषाण-हृदयाच्या मनुष्याशीं मला नुस्तें बोलावयास ही नको. येवढेंच नाहीं, तर तुमचें तोंडही मीं पाहूं इच्छित नाहीं. चला येथून

चालते व्हा. चाळे आहेत आपले लांब जीभ काढून हवें तें बडबडायला.

**शास्त्री**— ( राग आलेला न दर्शवितां ) वावावा, वाः, **जमना**, तुम्हीं तर खूबच रागावतां ! अबबब ! डोळे काय लाल केले आहेत व रागानें मला जशा काय तुम्हीं आपल्या खायलाच उठल्या आहां म्हणावयाच्या ! पण तुम्हांस मीं आणखीं एकवार सांगतों कीं तुम्हीं कांहीं केलें तरी न भितां आपला कार्यभाग केल्याशिवाय मीं येथून जावयाचा नाहीं. ( नंतर रागानें ) तुम्हीं आपल्याला मोठी पतिव्रता ह्मणवितां काय ? बोलून चालून तुम्हीं महाराजांच्या पदरीं *** होतां आणि व्यर्थ प्रतिष्ठा मारतां !

**जमना**— ( फारच रागानें ) नीचा, तूं आपलें तोंड येथून काळें कर. आमच्या कुटुंबाचा सर्वस्वी घात करूनसवरून आणखीं मला छळावयास आलास काय ? ( नंतर तो नजिक येत आहे असें पाहून व मागें होऊन ) खबरदार पुढें आलास तर. माझ्या आंगास स्पर्श तर कर कीं ही बर्ची पाहिलीना— ही मारून घेऊन मरून जाईन. पण तुझ्या म्हणून हातीं लागावयाची नाहीं.

**शास्त्री**–( प्राशन केलेल्या मद्यानें मस्तक फिरून गेल्यामुळें, व फारच कामातूर होऊन ) **जमना**, तुझें हें अनुपमरूप पाहून मीं आज बहुत वर्षें तुला लुब्ध झालों आहें. परंतु तुला **महाराजांचा** आश्रय असल्यामुळें माझा उपाय चालेना. आज पांच सहा वर्षें तुझ्यावर त्यांची पूर्ण इतराजी व्हावी अशी मीं तजवीज करीत आलों व त्याप्रमाणें ती आतां झाली ही. तर आतां इतके दिवस तुझ्यावर हेतू ठेवून मीं बसलों आहें, म्हणून तरी माझी उपेक्षा करूं नको. माझे सर्व अपराध

क्षमा कर. तूं हूं म्हण, कीं उद्यां तुझ्या बाबांची मुक्तता झाली च. उगाच राग कां बरें ? ( तरी ती स्तब्ध ऐकत उभी आहे असें पाहून तिचा हात धरतो व ) प्रियसखे, अशी रागावूं नको. तूं माझें ऐक. म्हणजे पहा उद्यांपासून या राज्यांत तुझें पूर्वी-प्रमाणें वर्चस्व होतें कीं नाहीं तें ? ( असें म्हणून तिला आलिंगन देण्याचा यत्न करतो. )

**जमना**-(अत्यंत रागावून व त्याला हिसडून) तुझ्या जिव्हेला किडे पडोत! चांडाळा, सोड, सोड! दुष्टा, ज्या हातांनीं तूं मला धरीत आहेस ते तुझे हात जळोत एकदां ! (असें म्हणून मोठ्यानें रडून व ओरडून त्याची मिठी सोडवूं लागली. परंतु ती सुटेना असें पाहून तिनें एक मोठ्यानें किंकाळी मारिली. )

( त्यावेळीं कोणी दोन पुरुष एकदम आंत शिरले, व त्यांनीं शास्त्रीबुवांस यथेच्छ मुष्टीमोदक देऊन **जमनाबाईची** मुक्तता केली, व **शास्त्रीबुवांची** बायको जवळच होती तिला आंत बलावून **शास्त्रीबुवांस** तिच्या स्वाधीन करून आपण **जमनाबाई**सह निघून गेले. )

**अंक ५ वा समाप्त.**



# अंक ६ वा.



## प्रवेश १ ला.

स्थल— हिराबाग.

पात्रें—राणी व नानासाहेब.

नाना—( आपल्याशींच ) अहाहा ! काय हा उत्तम बाग! याचें क्षेत्रफळ तरी केवढें मोठें ! आंतील वृक्षांची काय उत्तम व्यवस्था ! जाई, जुई, मोगरा, गुलाब, बटमोगरा, मदनबाण, चाफा इत्यादि फुलझाडांचे किती तरी सुंदर हे ताटवे ! यांतील सुंदर वाटा लांबचलांब नागमोडीप्रमाणें दुरून काय शोभायमान दिसताहेत बरें ! सायंकालचा समय असल्यामुळें या ताटव्यांवरून मंद मंद व शीतल असा जो वारा येत आहे, तो किती तरी मनास आल्हाद देत आहे ! या ठिकाणीं हीं पुष्पवल्लींचीं विश्रामालयें शेंकडों राजवाड्यांपेक्षांही अधिक सुखकारक आहेत. पनस, जंबु, जंबीरादि नानाविध लिंबें व आम्रादि नानाप्रकारचे वृक्ष, एकसारखे हारीनें लाविले असल्यामुळें कसे शोभायमान दिसत आहेत ! या सर्व बागांत पाणी तरी किती मजेनें खेळविलेलें आहे ! ठिकठिकाणीं खोलगट जाग्यावर तें मोकळें सोडून दिल्यामुळें, हे जणूं तलावच आहेत असें समजून, शेंकडों ग्राम्य व वन्य पशुपक्ष्यांच्या झुंडीच्या झुंडी इकडून तिकडे व तिकडून हिकडे त्यांच्या काठीं कशा उडत व बागडत आहेत ! या विस्तीर्ण उपवनांत, ह्मणजे केवळ इंद्रभुवनांतच ह्मटलें तरी चालेल, **महाराज राणी**सह नेहमीं सहल करावयास येतात, तें यथायोग्य. मीं पुष्कळ बाग पाहिले, परंतु यासारखा एकही आजपर्यंत माझ्या अवलोकनां-

त आला नाहीं. येथें जो कोणी येईल, त्याची तहान व भूक सर्व नाहींशी होऊन तो अत्यंत दुःखी जरी असला, तरी येथें आहे तों पर्यंत त्याला कोणत्याही दुःखापासून पिडा ह्मणून व्हावयाची नाहीं. बरें तें असो. पण, **राणी** साहेबांच्या मनांत जें हें वेड शिरलें आहे त्याविषयीं थोडा विचार करूंया. मला **राणीसाहेबांच्या** तैनातीस राहून तीन चार महिने झाले. या अवकाशांत **राणी**चा मजवर फार लोभ आहेसें वाटतें, परंतु तो कां बरें ? मीं त्यांचीं मोठीं महत्वाचीं कामें केलीं ह्मणून ह्मणावें, तर तसा कांहीं प्रकार नाहीं. बरें माझ्या हातून त्यांचीं मोठीं कामें होतील, असेंही नाहीं. तर मग त्यांचा मजवर इतका लोभ कशा साठीं ! हें एक मोठें गूढ आहे. त्यांचा असा लोभ आहे ह्मणून मीं येथें टिकलों, हें खरें. नाहींपेक्षां ते **दादासाहेब** व त्यांचे मंत्री **रामशास्त्री**, यानीं मला एक दिवसही येथें टिकूं दिलें नसतें. पण **राणीसाहेब** मजवर असा लोभ करतात हें माझ्या मोठें पथ्यावर आहे. कारण येथें राहिल्यापासून **राणीसाहेबांचीं** कामें करून मला आपलींही कामें करतां आलीं, हा माझा लहानसान फायदा नाहीं. बरें, पण मी **राणीच्या** सन्निध असलों ह्मणजे त्यांची वृत्ती जरा अधिक चंचल व कावरीबावरी झालेली मला तर दिसते, याचें कारण काय! आज चार महिन्याच्या अनुभवावरून **राणी**च्या पातीव्रत्या विषयीं मला जो मोठा संशय होता, त्याची निवृत्ती या पत्रावरून आतां साफ झाली. **प्रधान** झाला ह्मणून काय झालें ! **राजा** व **राणी** यांचा तो एक मोठा नोकरच. त्यांना, आपल्या माता पिता समान मानावयाचें सोडून, तो त्यांच्यांशीं अनीतीनें वागतो हें त्याचें कृत्य अतिनिंद्य व फार वाईट आहे. हां ! आतां मीं समजलों. ज्याप्रमाणें अत्यंत सहवासानें एखाद्या मनुष्याचा,

वस्तुचा, व स्थलाचा आपल्याला कंटाळा येतो, तद्वत् **राणीचा** प्रकार झाला असावा असें मला वाटतें. व याचमुळें त्यांचा मजवर अधिकाधिक लोभ बसत चालला नाहीं ह्मणून कशावरून! पण **राणीसाहेबांस** हें कुठे माहित आहे कीं, या राज्यांत मला फार मोठालीं कामें कर्तव्य आहेत, ह्मणूनच मीं येथें राहिलों आहें. नाहीं पेक्षां अशा स्थितीमध्यें मीं येथें एक क्षणभरही राहिलों नसतों. पण या **राणीसाहेब** आल्याच.

**राणी**—**नानासाहेब**, तुह्मांस इथ येऊन किती वेळ झाला?

**नाना**—बराच वेळ झाला.

**राणी**—तुह्मांस या रम्य एकांतस्थलीं मी कां यावयास सांगितलं, याचं कारण तुह्मांस समजलं काय ?

**नाना**—नाहीं.

**राणी**—तें आतां बोलतां बोलतां तुमच्या लक्षांत येईल. **नानासाहेब**, तुह्मीं इथ राहिल्यापासून मला असं झालं आहे कीं, तुह्मीं मजपासून एक क्षणभरही दूर जाऊं नये. तुमचं लीन वर्तन, शांत स्वभाव, व काम काज करण्याची शैली, हीं अप्रतिम आहेत. तुह्मांला समजलंच असेल कीं, परवां त्या **पूर्णानंदस्वामींचा** ज्यानीं प्रसाद घेतला नाहीं, त्यांच्यावर **महाराज** व **दादासाहेब** यांची अवकृपा झाली आहे. माझ्या समक्ष ते फारसे बोलले नाहींत खरे. पण अशान्नें कांहीं तरी नुकसान करण्याचा त्यांचा हेतू दिसतो. तुमचं नुकसान मीं होऊं देणार नाहीं, इतकंच नाहीं, परंतु तुह्मांकडे हल्लीं जें काम आहे तें तुह्मांस शोभत नाहीं, ह्मणून माझ्या मनांत तुह्मांस या राज्यांत **प्रधान** करावं असं आहे. यासाठीं मीं सांगेन त्या प्रमाणं ऐका, ह्मणजे झालं. बरं असो, पण **नानासाहेब**, आज बहुत दिवस तुह्मांस एक गोष्ट विचारावी असं मनांत

आहे. विचारून उपयोग झाला तर बरं. नाही पेक्षां मनाला व्यर्थ संताप मात्र व्हायचा.

**नाना**—**राणीसाहेब**, मी आपला ताबेदार आहें. काय तें खुशाल विचारावें.

**राणी**—तें विचारण्याविषयीं मीं अनेक वेळां प्रयत्न केला, परंतु विचारण्यास मला मेला धीरच होत नाहीं. **नाना-साहेब**, तुमचे गुण पाहून जसा तुमच्यावर माझा लोभ बसला आहे, त्याच प्रमाणं तुमचं मनोहर रूप पाहून माझें मन तुम-च्यावर अगदीं तल्लीन होऊन गेलं आहे. ( नंतर किंचित लज्जा-यमान होऊन ) ह्मणून आपण माझा अंगिकार करावा. मीं निर्लज्जपणानं तुमच्याशीं हें बोलत आहें, याचं मला फार वाईट वाटतं. परंतु मीं तरी काय करूं ! आज इतके दिवस मीं तुमच्याशीं फारच प्रेमानं वागल्यें, तें अशासाठीं कीं माझा हेतू तुमच्या लक्षांत यावा, व मला स्पष्ट बोलण्याची पाळी न येतां आपलं काम व्हावं. परंतु माझा हेतू तुमच्या लक्षांत आला नाहीं व याच मुळं मला आज स्पष्ट बोलावं लागलं, या बद्दल मला फार वाईट वाटतं.

**नाना**—**राणीसाहेब**, आपण हें असें अनुचित काय बोलतां ! मीं आपल्या पदरचा नोकर, आणि आपण मला असें विचारावें! अह्मां प्रजाजनानीं **महाराज** सरकारांस पित्यासमान व **आपल्यास** मातेसमान मानावें, हा आमचा धर्म. त्याचें उल्लंघन करणें महापातक आहे. या साठीं असें पापाचरण माझ्या हातून कसें होईल ! शिव शिव ! हे प्रभो ! असें पापाचरण करण्यापेक्षां मला मृत्यु येईल तर बरा !

**राणी**—**नानासाहेब**, ही आपली साधुवृत्ती चांगली, असें कोण ह्मणेल तो ह्मणो. मला तर ती अगदीं पसंत नाहीं.

विचार करा, कीं मोठा धीरकरून बोलूं नये अशी गोष्ट मीं तुमच्याशीं बोलल्यें, आणि तुह्मी तिचा अव्हेर करतां ! मीं भलतिच गोष्ट तुमच्याशीं बोलल्यें हें खरं, व हेंही खरं कीं अशी गोष्ट बोलून मीं आपली मानखंडना करून घेतली. परंतु माझं मन मेलं माझ्या अगदीं स्वाधीन नाहीं. तें सर्व तुमच्याकडे गेलें आहे. यावेळीं मला योग्यायोग्य अथवा पापपुण्य हें कांहीच दिसत नाहीं. ह्मणून मीं तुह्मांस अजून सांगत्यें कीं तुह्मीं माझी गोष्ट कबूल करा.

**नाना**—**राणीसाहेब**, तुह्मीं सांगतां तें सर्व खरें. परंतु मीं तरी काय करूं ! असें अघोर पातक माझ्या हातून कसें होईल, व तें करूनही शेवटीं मला यमयातनाच भोगाव्या लागणार ना ! त्यापेक्षां हा जीवच आपल्या स्वाधीन आहे ! वाटेल ती शिक्षा मला करावी, परंतु हें कृत्य माझ्या हातून होणें नाहीं.

**राणी**-- ( अत्यंत रागावून ) **नानासाहेब**, तुह्मीं आपली मला यःकश्चित समजतां काय ? अनुचित गोष्ट मीं तुमच्याशीं बोलल्यें या बद्दल तुह्मीं मला शासन करतां काय ? तुह्मांला वाटत असेल कीं माझ्या मर्जीविरुद्ध वागल्याबद्दल तुह्मांला मीं फार तर घालवून देईन. व तसं केलं ह्मणजे तुह्मांस शिक्षाच झाली. पण तसं नाहीं बरं. माझी गोष्ट ऐकल्या बद्दल तुह्मांस ज्या यमयातना भोगव्या लागतील, त्या तुमच्या मरणानंतर. परंतु **माझं** नऐकल्या बद्दल तुम्हांस जें मीं शासन करवीन तें याच घटकेस, यात्र स्थलीं, व यमयातनेपेक्षांही अधिक कडक. या साटीं मीं तुम्हांस पुनः पुन्हां सांगत्यें कीं अशी वेळ आणूं देऊं नका.

**नाना**—अशा वेळीं काय करावें हें मला कांहींच सुचत नाहीं. तुम्हास वाटेल तें तुम्हीं करा.

**राणी**—( अपमान व इच्छाभंग झाल्यामुळें फार रागावून ) **नानासाहेब**, अजूनपर्यंत मीं तुमचा अपमान केला नाहीं. आर्जवच करीत आहें. परंतु स्त्रियांचा राग मोठा वाईट असतो. त्या जर का एखाद्याच्या पाठीस लागल्या—मग तो मोठा शहाणा कां असेना—तर त्याच्यानें त्यांच्याशीं टिकाव धरवणार नाहीं. तुह्मांला मीं खरंच सांगत्यें कीं तुम्हीं माझें ऐकत नाहीं, या बद्दल यावा तसा राग अजून मला आला नाहीं. परंतु जर आला, तर तुम्हांस इथच्या इथ देहांत शिक्षा करवीन. तुम्हांस आपल्या जिवाची परवा नाहीं असं कदाचित तुम्हीं म्हणाल, तर तें सर्व खोटं आहे. कारण ज्याला जिवाची परवा नाहीं, त्यानें जगांत रहावं तरी कशाला ? खुशाल अरण्यांत कंदमुळें भक्षण करून रहावं. तुमचा प्रकार तसा नाहीं. दुसरं असं कीं माझ्या म्हणण्याप्रमाणं वागल्यानं महतपातक होतें, असं तुम्हीं ह्मणतां. ठीक आहे. परंतु मींच तुमच्यावर उलटल्यें व **महाराजांस** सांगितलें कीं तुम्हीं मजकडे वांकड्याडोळ्यानं पहातां. तर **महाराज** व सर्व जग, कुणाचं खरं मानतील ? आणि असं झालं ह्मणजे जगाच्या दृष्टीनें तरी तुह्मीं पातक केलं असें होईल ना ? मग तुह्मीं किती ही पवित्र असलां तरी लोक तुह्मांस तुःच्छ मानतीलना ? असो, इतकें ही मीं सांगत असतां जर तुह्मांस माझं ऐकावयाचें नसेल तर खुशाल नका ऐकूं.

**नाना**— ( राणीची आपल्यावर इतराजी झाली असतां आपण कदाचित प्राणास मुकूं, व आपले हेतूही सिद्धीस जावयाचे नाहींत. यासाठीं कांहीं युक्ती लढवून ही वेळ मारावी असा विचार करून ) **राणीसाहेब**, आपण एकंदर जें कांही बोललां

त्याविषयीं विचारकरून पहातां मीं आपल्या इच्छे विरुद्ध वागलों असतां माझा सर्वस्वी नाश होईल, अशी माझी पक्की खात्री आहे. यासाठीं आपण सांगाल त्याप्रमाणें वागण्यास मीं कबूल आहें. परंतु—

**राणी**— ( अत्यंत आनंदी होऊन ) शाबास, **नानासाहेब**, शाबास. तुम्हीं माझ्या इच्छेनुरूप वागण्यास कबूल झालां, येणेंकरून मीं आपली फार आभारी झाल्यें. मला यावेळीं जो आनंद झाला आहे तो माझ्यानें सांगवतही नाहीं. बरं पण तुम्हीं " परंतु " म्हटलंत त्याचा अर्थ काय ? अजून परंतु आहेच का ?

**नाना**—माझी मातोश्री स्वर्गस्थ झाल्याला दोन महिन्यानीं एकवर्ष होईल. यासाठीं आणखीं दोन महिनें मीं व्रतस्थ आहें. येवढ्या दोन महिन्याची काय ती मला माफी असावी, हीच माझी आपल्यास विनंती आहे. ती जर आपण अमान्य कराल, तर आपली ही गोष्ट मला मान्य नाहीं. मग वाटेल ती मला आपण शिक्षा करावी.

**राणी**— ( नानासाहेबांचें हें निकराचें उत्तर ऐकून व थोडावेळ विचारकरून ) बरं तर, तुमची विनंती मीं मान्य केली म्हणजे तुम्हीं कबूल अहां ना ?

**नाना**—( स्पष्ट उत्तर न देतां ) तें मीं पूर्वींच सांगितलें आहे.

**राणी**—बरं आहे. चला तर आपण आतां या बागांतील शोभा पहावयास जाऊं.

( असें म्हणन तीं उभयतां बागांत फिरावयास गेलीं. )

---

## प्रवेश २ रा.

**स्थल**—राजदरबार.

**पात्रें**—**राजा, दादासाहेब, न्यायाधीश, सेनापती, नाना,** वगैरे दरबारची मंडळी.

( राजेसाहेब सिंहासनावर बसल्यावर )

**दादा**—( **महाराजां**जवळ मोठ्या अदबीनें जाऊन ) आजच्या कामास अगदीं विलंब लावतां येत नाहीं. यासाठीं आज्ञा होईल तर—

**राजा**— ( **प्रधान, रामशास्त्री, सेनापती, न्यायाधीश,** वगैरे दरबारची इतर मंडळी यांस उद्देशून ) आपल्या राज्यावर एक लहानसें संकट आलें आहे. त्याविषयीं **दादासाहेब** तुम्हांस सर्व सांगतील. तें ऐकून संकट निवारणार्थ कांहीं तरी युक्ती सांगा.

**दादा**—आपल्या **महाराज** सरकारच्या राजछत्राखालीं जीं लहान मोठीं दहा मांडलिक संस्थानें आहेत, त्यांजकडून **महाराजांस** प्रतिवर्षास करभार येत असतो. तो त्यानीं चालु वर्षाचा अद्याप दिला नाहीं व देत नाहींत. तर तो वसूलकरण्यास काय युक्ती काढावी ?

**न्यायाधीश**—( बराचवेळ कोणी बोलत नाहीं असें पाहून ) याच्यापूर्वीं खंडणीं अशी कधीं थकली होती काय ?

**प्रधान**—होय, अनेकवेळां.

**न्यायाधीश**—त्यावेळीं ती कशी वसूल करीत होतां ?

**प्रधान**—आपले हे ( बोटानें दाखवून ) **सेनापती** सैन्यासह जाऊन लढाया मारून खंडणी व मोहिमेचा खर्च घेऊन येत असत.

**न्यायाधीश**—त्याप्रमाणें यावेळीं केलें किंवा नाहीं ?

**प्रधान**—होय.

**सेनापती**—अन् मग खंडणी आली क न्हई ?

**प्रधान**—( एका रुप्याच्या तबकांत कांहीं विडे ठेवून तें **महाराजांच्या** पुढें ठेवून ) नाहीं, म्हणून तर ज्याच्या आंगांत ती खंडणी घेऊन येण्याची हिम्मत असेल त्यानें यांतील विडा उचलावा, याहेतूनें **महाराजानीं** आज हा दरबार भरविला आहे.

**राजा**—असा जो कोणी तयार असेल त्याला सैन्याची व द्रव्याची मदत सरकारांतून मिळेल.

**सेनापती**—पन **महाराज**, ही खंडणी वसूल करण्या-साठीं आपले सेनापती सवतां गेले व्हते क न्हई ?

**राजा**—हो हो, हें काय विचारावें ! आमचे **दादासाहेब** स्वतः गेले होते. परंतु त्यांचा पराजय झाला, ह्मणून तर ही काळजी !

( हें ऐकून दादा व रामशास्त्री दांत ओंठ चावतात. )

**सेनापती**—**महाराज**, आपुन राज्य कराया लागल्या-पासून आपला कधींबी पराजय झाला न्हई, आन ह्यो—

**दादा**—( राग सहन न होऊन ) अहो बुवा, तुह्मीं आतां गप्प बसा. नाहीं तर याच दरबारांत मागें एकदां आपली काय स्थिती झाली होती त्याची आठवण आहे ना ?

**सेनापती**—आठवण ह्मंजे ! ती मीं कधीं इसरेन क का ! अहो, तुह्मीं मला शिंईगाळ करून मला व आमच्या धाकट्या महाराजांस मोरकऱ्यांकडून पकडून नेलेंत. तीच न्हई का ? म्यां न्हई ईसरलों बरं.

**दादा**—बरं बरं पुरे आतां. गप्प बसा, नाहीं तर—

**सेनापती**—कराकी तुमाखीं व्हावें तें. न्हई कोन ह्मंतुया. तुमीं कई बी केलें तरी चालतया. पन बघा, त्यायेळीं जसे आमचे धाकटे महाराज नेले—( इतकेंच बोलून रडूं लागतो. )

( राजा व दरबारच्या दुसऱ्या कांहीं लोकांसही दुःख होतें. )

**दादा**—**महाराज**, हा ह्मातारा जेव्हां तेव्हां दरबारची, ह्मणजे आपलीच ह्मणायची, बेअदबी करतो, हें मला अगदीं सोसावयाचें नाहीं. मागें एकदां यानें असेंच केलें होतें. त्यावेळीं याला येथच्या येथें जें शासन केलें तें याच कारणासाठीं. पण याची खोड अजून जात नाहीं.

**राजा**—तें कांहीं असो. आज या दरबारांत पुष्कळ सरदार व मानकरी आहेत. त्यां पैकीं कोण विडा उचलतो तें पहावें! ही खंडणी न येईल तर राज्याचें अर्धें उत्पन्न गेलें ह्मणून समजावयाचें!

**न्यायाधीश**—( बराच वेळ गेला तरी कोणी उठत नाहीं असें पाहून ) **महाराज**, आज आमच्या एक दोन पिढ्या आह्मीं आपल्या पदरीं आहों. जिकडे तिकडे आपल्या नांवाचा डंका आहेच; त्याच प्रमाणें दरारा ही आहे. परंतु अलिकडे राज्य व्यवस्थेंत कांहीं तरी व्यंग उत्पन्न झालें आहे, व त्याच मुळें आपल्या शुभ्र कीर्तीस कलंक लागूं पहात आहे. या आमच्या वृद्ध व शूर **सेनापतीं**च्या कारकीर्दींत कोणी मांडलिक राजानें खंडणी दिली नाहीं, असें कधीं ही झालें नाहीं. कधीं झालें असेल, तर त्यानीं त्याचा ताबडतोब बंदोबस्त करून आपल्या पर्यंत बोभाटा तरी आणूं दिला नाहीं. **महाराज**, मीं आपला प्रामाणिक नोकर आहें. ज्यांत आपलें हित असेल तीच गोष्ट करावयास सल्ला देईन. उगाच भलत्या सलत्या किंवा

अन्यायाच्या गोष्टींस कधींच देणार नाहीं. आपल्या राज्यांत अलिकडे बऱ्याच अन्यायाच्या गोष्टी घडूं लागल्या आहेत. हें पाहून मला फार दुःख होतें. पहिल्या अन्यायाच्या गोष्टीचें आह्मांस नुस्तें स्मरण झालें, तर आंगावर कांटा उभा राहतो. मग आपण तर बाप. आपल्यास काय झालें असेल तें मीं सांगितलें पाहिजे असें नाहीं. नाहीं तर वडील मुलगा असतां धाकट्या मुलास युवराज करावयाचा; त्या समारंभाच्या दिवशीं भर दरबारांत राजपुत्र व हे सेनापती यांस मारेकऱ्यांच्या हातून नाहिसें करवावयाचें; त्याच प्रमाणें त्याच रात्रीं ते राजपुत्र **अंबाबाई-च्या** वनांत जातात काय व तेथें व्याघ्राच्या हातून त्यांचा अंत होतो काय ! या सर्व चमत्कारिक गोष्टी आहेत. तसेंच त्या **मगनशेटची** बायको एकाएकीं नाहींशी होते काय व त्याच रात्रीं आमच्या **दादासाहेबांच्या** दिवाणखान्यांत दरवडा पडतो काय! वैद्यराजांच्या मुलीस पळवून नेतात काय व त्यांस बंदीखान्यांत टाकतात काय ! **पूर्णानंदस्वामी** व त्यांचा शाक्तमार्ग व त्या रात्रीं घडलेली अनुचित गोष्ट. अशा एक कीं दोन अन्यायाच्या गोष्टी सांगाव्या ! असो, मीं स्पष्टपणें बोलत आहे या बद्दल मजवर आपला किंवा दुसऱ्या कोणाचा राग मात्र न व्हावा. व इतक्या उपर जर झाला, तर काय करावयाचें ! आपण आतांच पहा कीं खंडणी थकली तर ती कोणाच्यानें वसूल करवत नाहीं, व अजून येथें कोणी विडा ही उचलीत नाहीं! केवढी ही दुःखाची गोष्ट आहे! आपलें अन्नखातों आहे ह्मणून सांप्रत चाललेली भालेराई पाहून फार वाईट वाटतें.

**दादा**—( न्यायाधिशाच्या बोलण्याचा सर्व रोख आपल्या वर आहे असें जाणून व फार रागावून ) **महाराज**, काय हा आपला अपमान चालला आहे ! ( असें बोलत आहे तों )

**राजा**—**दादासाहेब**, बस्स. या दरबारांत कोणीच विडा उचलावयास नाहींना! ठीक आहे. ही खंडणी वसूल करावयास आतां आह्मीं जाणार.

**नाना**—**महाराज सरकार**, माझी गरीबाची एक विनंती आहे.

( हें ऐकून सर्वत्रांस मोठें आश्चर्य वाटून ते त्याजकडे एकसारखे पहात राहिले. )

**राजा**—**नाना**, तुझी काय विनंती आहे ?

**नाना**—ही खंडणी वसूल करावयास जाण्याची मला आज्ञा व्हावी. एक खंडणी तरी घेऊन येईन, किंवा युद्धांत मरून तरी जाईन, परंतु मीं आपलें अन्न खात असून अशा वेळीं सेवेस, हजर नसावें, तर मग माझा काय उपयोग !

**राजा**—शाबास, शाबास, **नाना**, शाबास. तूं आज या दरबारची लज्जा रक्षण केलीस. शाबास, शाबास.

( **न्यायाधीश** व **सेनापती** यांनींही **नाना**ची तारीफ केली. परंतु **दादासाहेबां**च्या भीतीस्तव दुसरा कोणी एक चकार शब्दही बोलला नाहीं. नंतर **दादासाहेब** अत्यंत रागाऊन दरबारांतून निघून जातात. व **महाराजां**च्या आज्ञेनें दरबार बरखास्त होतो. )

---

## प्रवेश ३ रा.

**स्थल**—**राणीसाहेबांच्या** वाड्यानजीक **ताईसाहेबांचा** वाडा.

**पात्रें**—**ताई**, **नानासाहेब** व त्यांचा विश्वासू नोकर **महादु**, **राजा**, **राणी** व **दादासाहेब**.

**नाना**—कां **ताईसाहेब**, मीं आपल्याला विचारिलें त्याचें उत्तर न देतां आपण स्वस्थच बसलां ?

**ताई**—स्वस्थ बसूं नको तर काय करूं ! **नानासाहेब**, तो दुष्ट **दादा** तर माझ्या कसा हातधुऊन पाठीस लागला आहे. मीं आपली मावशीच्या घरीं होत्यें, तिथून मेल्यानं **महाराजांस** सांगून मला इथं आणून कडेकोट बंदोबस्त करून ठेवलन. इथं तर रोज तो येतोच व त्याच्याकडून एक दोन माणसेंही त्याची शिफारस करण्यास येतात. पण मीं ह्मणून त्यांच्याशीं हूं कीं चूं, कांहीं एक बोलत नाहीं.

**नाना**—( तिच्या मनाचा निश्चय कसा आहे हें पाहण्या-साठीं मुद्दाम ) असें कां बरें तुह्मी करतां ? **दादासाहेब** ह्म-णजे आजकाल प्रती **महाराज** आहेत. त्यांच्या सारखा प्रतिराजा, तुह्मांस प्रतिराणी करूं इच्छित असतां, तुह्मीं ती गोष्ट नाकबूल करावी, हें मोठें आश्चर्य आहे !

**ताई**—जिला त्या दुष्टाची राणी किंवा प्रतीराणी होण्याची इच्छा असेल, तिनं खुशाल व्हावं ! माझी कांहीं ना नाहीं.

**नाना**—दुसरीची गोष्ट राहूं द्या. त्यांचें मन तुमच्यावर असें बसलें आहे कीं तुम्हीं जर त्यांना न प्राप्त झालां, तर ते म्हणून आपला प्राण ठेवणार नाहींत.

**ताई**— तसं होईल तर फार चांगलं होईल. असला मेला जिवंत राहून धरणीला भारचना ! तो मरेल किंवा त्याला कोणी मारील तर बरं होईल !

**नाना**—हां, हां, **ताईसाहेब**, असें काय बोलतां ! हें जर त्यानां समजलं तर—

**ताई**—तर काय माझं खेटर करणार तो मेला. **म-हाराज** कांहीं कुठं गेले नाहींत.

**नाना**—**ताईसाहेब**, **महाराजांच्या** ही मनांत **दा-दासाहेबांस** आपले जांवई करावे असें आहे. मग—

**ताई**—तें कांहीं त्यांच्या मनापासून नाहींहो ! त्यांना **राणीसाहेबांची** भीड पडल्ये, म्हणून आपले ते मला विचार-तात व कधीं रागावतात, इतकेंच.

**नाना**—मग अशा भिडेनेंच कां होईना. पण तुम्हांस त्यांना देण्याचा त्यांनीं निश्चय केला, म्हणजे मग तुम्हीं काय कराल ?

**ताई**—तुम्हीं आपले उगीच थट्टेनें हें असं म्हणतां.

**नाना**—नाहीं, नाहीं, **ताईसाहेब**, मला आतां **म-हाराजांनींच** पाठविलें आहे.

**ताई**—कशासाठीं ?

**नाना**—तुम्हांस **दादासाहेबांस** देण्याचा **महाराजांनीं** निश्चय केला आहे. आतां तुमचें नाहीं होय कांहीं चाला-वयाचें नाहीं, हेंच सांगण्यासाठीं मीं आलों आहें. तर आतां तुम्हीं थोडा विचार करा, व **महाराजांस** राग न येईल असें उत्तर द्या.

**ताई**— त्यांत विचार कसूचा करायचा आहे. मीं साफ कबूल नाहीं म्हणून जाऊन सांगा.

**नाना**—**ताईसाहेब**, मला काय ! मीं निरोपाचा धनी. जसें तुम्हीं सांगाल त्याप्रमाणें जाऊन सांगेन. परंतु मीं आपल्याला सांगावयास विसरलों. **महाराज**ही कदाचित् आतां येथें येतील असें वाटतें. कारण या गोष्टीचा त्यानां लवकर निकाल लावावयाचा आहे. म्हणून मीं तुम्हांस पुनः पुन्हां सांगतों कीं **महाराजांस** राग येईल असें करूं नका.

**ताई**—**नानासाहेब**, तुम्हीं मला किती जरी सांगितलं-

त, तरी "i ह्मणून **महाराज** जर मला भलतंच सांगतील तर कबूल करणार नाहीं.

**नाना**—**ताईसाहेब**, विचार करा, **महाराजांचा** जर आपल्यावर राग झाला तर मग तुमच्यावर माया ममता करणारें **जमनाबाई** शिवाय कोणीच नाहीं. आणि **जमनाबाई** वर तर **महाराजांची** इतराजी झालेली आहे. तेव्हां तुह्मीं जें नाहीं ह्मणणार, तें कोणाच्या आधारावर?

**ताई**—**माहाराजांनीं** जर माझं नच ऐकलं, तर मीं हा आपला जीव या इथून देईन ( असें म्हणून तीन मजल्यावरील खिडकी खालीं बोट दाखविते. ) पण मीं ह्मणून कबूल व्हायची नाहीं. तुह्मीं आपलें मीं नाहीं ह्मणत्यें ह्मणून बेलाशक सांगा.

**नाना**—बरें आहे तर **ताईसाहेब**, मीं जातों.

( इतक्यांत **राजा**, व **दादासाहेब** येतात. )

**राजा**—कां, **नाना**, काय झालें ? **ताई** काय ह्मणत्ये ?

**नाना**— **महाराज**सरकाराची स्वारी आतां समक्षच आली आहे. मीं येवढा वेळ— ( इतकेंच बोलून थांबतो. )

**राजा**—काय **ताई**, तुला आमचा निरोप **नानानें** सांगितला ना ?

**ताई**—होय, **महाराज**. पण—

**राजा**—( मध्येंच ) पण बीण कांहीं नाहीं. आह्मीं या लग्नाची सर्व तयारी केली आहे. व आह्मीं आतां कोणा एकाची या कामांत काडीभरही रदबदली ऐकावयाचे नाहीं, समजलीस.

**दादा**—( महाराज रागानें बोलत आहेत यामुळें ताई

भिऊन जाईल ह्मणून हळूच ) आपण जरा गोडीनें बोला. रागावतां यामुळें त्या भिऊन जातील.

**राजा**--( दादासाहेबांनीं सुचविल्या प्रमाणें ) **ताई**, बेटा, तुला माझ्या पेक्षां अधिक प्रियकर असें दुसरें कोणी आहे काय? तुझें हित अनहित कशांत आहे, हें तुझ्या पेक्षां मला अधिक समजतें. ह्मणून माझ्या हातून तुझें अनहित कसें बरें होईल ! आमचे **दादासाहेब** हे आज या राज्याचे केवळ खांब आहेत. आज ते सेनापती आहेत. उद्यां प्रधान होतील. व तुझा त्यांचा विवाह झाला ह्मणजे, मीं त्यांना एका संस्थानचें राज्य देणार आहें. यासाठीं तूं त्यांना वरावें हें योग्य.

**ताई**—( रडत रडत ) **महाराज**, आज माझी आई जर जिवंत असती, तर मजवर हा प्रसंग आला असता काय ! पण काय करावं ! मींच कम नशीबाची.

**राजा**—पण तुझी आई नाहीं, ह्मणून तुला कोणत्या गोष्टीची उणीव पडली आहे बरें ! दास, दासी, दागिनें असून जें ह्मणशील तें सर्व आहे. मग तूं अशी उदास कां ?

**ताई**—**महाराज**, आमची मावशी मजवर आई सारखी ममता करत्ये. असें असतां तुह्मीं मला तिच्या घरांतून आणून इथ एकटी ठेविलीत. हें मला गोड का वाटतं !

**दादा**—पण त्यांत कडू वाटण्यासारखें काय आहे ? **जमना** ह्मणजे कोणी मोठी महाराणी नाहीं. तसल्या बायकोच्या संगतीनेंच तर हें असें झालें.

**राजा**—**दादासाहेब**, तुम्हीं बोलतां तें अगदीं बराबर आहे. ( नंतर **नाना** जात आहे असें पाहून ) **नाना**, जाऊं नको.

**नाना**—नाहीं **सरकार**, मीं जात नाहीं. दरवाजा कोणी वाजविल्यासारखें वाटलें, म्हणून कोण आहे तें पहातों. ( असें

म्हणून दरवाज्या बाहेर जाऊन आपल्या विश्वासु महादूस कांहीं सांगून आंत परत येतो. )

**राजा**— ताई, मग तूं काय सांगत्येस ?

**ताई—महाराज**, मीं यांत काय सांगावं ! तुम्हीं माझे बाप अहां. जें कराल तें मला मान्य केलें पाहिजे. पण—

**राजा**—अजून तुझें पण आहेचका ?

**ताई—महाराज**, आपणांस मीं सांगावं असं नाहीं. परंतु सांगत्यें कीं ज्यांच्या जन्माच्या गांठी पडणार, तीं एकमेकांस आवडलीं तर पाहिजेतना !

**राजा**—मग, **दादासाहेबां**स तूं जिवापलिकडे आवडत आहेस.

**ताई**—पण मला—

**राजा**—( रागानें ) काय म्हणालीस ?

**दादा—नाना**, तुम्हीं जरा तिला समजून सांगा, कीं **महाराज** आतां रागावले आहेत.

( नाना त्याप्रमाणें बहुत प्रकारें तिचीसमजूत करतो, परंतु ती ऐकेना तेव्हां )

**राजा**—कारटे, माझ्यापोटीं जन्म घेऊन तूं माझी अवज्ञा करत्येस काय ?

**ताई**—नाहीं **महाराज**. पण या कामांत मीं तुमचें ऐकून आपल्या जन्माचें मातेरें करून घ्यावें ना !

**राजा**—यांत कशाचें मातेरें होतें. ( नंतर रागानें ) चालली आहे मोठी शहाणी लांब जीभ काढून " नाहीं " म्हणायला. लाज नाहीं वाटत.

**ताई**—मीं काय सांगायचं तें सांगितलं आहे. इतक्या उपर काय होणें असेल तें होईल !

**राजा**—( अत्यंत रागावून व दांत ओंठ खाऊन ) कारट्ये, तूं माझी अवाज्ञा करतेस काय ? कोणाशीं गांठ आहे माहित नाहीं वाटतें. **दादासाहेबांस** तुला पसंत केलेंच पाहिजे. नाहीं तर–( असें ह्मणून तरवार उपसून तिच्या आंगावर धांवत जातो. )

( इतक्यांत दरवाजा उघडून राणी आंत येत्ये. )

**राणी**—हं, हं, हं, **महाराज**, हें काय ! तुह्मीं कुणावर तरवार उपसलीत ही !

**राजा**—तुह्मीं जरा दूर व्हा. यावेळीं या कारटीला थोडी बहुत शिक्षाच पाहिजे, ह्मणजे ती जरा ताळ्यावर येईल.

**राणी**—होय, होय, शिक्षा पाहिजे ह्मणून अशी ! आणि आपण स्वतः करणार ! बरं, आतां मी इची समजूत करत्यें. आपण सर्वांनी इथून जावं. बायकांचीं कामं बायकांनींच करावीं. तीं पुरुषांच्या हातून कशीं होणार !

**राजा**—तें कांहीं असो. या कारटीचें दादासाहेबांशीं लग्न करण्याचा आमचा पूर्ण निश्चय झाला आहे. तो कांहीं केल्यानें आतां फिरावयाचा नाहीं. ( नंतर दादासाहेबांकडे वळून ) ही आतां सर्वस्वी तुमच्या ताब्यांत आहे. तुह्मांस वाटेल तर तुह्मीं मला सांगत होतां त्याप्रमाणें इची व्यवस्था करा. तुह्मांस राणीसाहेब साहाय्य करतीलच.

**राणी**—सरकार, आपण यावेळीं इथून जायचं. ताईची मीं समजूत करून पहात्यें. नाहीं तर आपणास वाटेल तें करावं.

**राजा**—बरें आहे, तुह्मीं प्रयत्न करून पहा. ( असें ह्मणून दादासाहेब व नाना यांसह निघून जातो. )

---

## प्रवेश ४ था.

**स्थल**—डोंगरांतील प्रचंड गुहा.

**पात्रें**—**धाकटे महाराज, नानासाहेब, कन्हयालाल, रामभट, करीमखा,** व **अहंमद** वगैरे.

**नाना**—**करीमा,** तुझ्यावर आतां आम्हां सर्वांचा विश्वास बसूं लागला आहे. आह्मांस आतां अगदीं थोडा अवधी राहिला असून कामें तर फार करावयाचीं आहेत. आपला **कन्हयालाल** जर बाहेर फिरावयास जाईल, तर तीं कामें होतील. तुझ्यानें फिरवत नाहीं, यासाठीं तूं बसूनच येथील सर्व व्यवस्था पहात जा.

**करीम**—**महाराज,** माझ्या अपराधा बद्दल मला पदोपदीं दुःख होत आहे. व ज्या सैतानानें **धाकट्या महाराजांस** मारण्याचें वेड माझ्या मनांत भरून दिलें, त्यानें माझ्या पाठी मागें माझ्या बायकापोरांचे व माझ्या आप्त मंडळीचे काय काय हाल केले हें सर्व तुम्हांस माहितच आहे. त्या दुष्टाच्या नरडीचा घोंट मीं केव्हां घेईन व ( राजपुत्राकडे बोट करून ) या माझ्या **महाराजांस** गादीवर बसलेले केव्हां पाहीन असें मला झालें आहे.

**नाना**—आम्हीं त्याच उद्योगांत आहों, व म्हणूनच तुजकडे हें काम दिलें आहे.

**करीम**—फार उत्तम आहे **महाराज.** येथील बंदोबस्त ठेवणें मजकडे लागलें. **कन्हयालाल** किंवा दुसरा कोणीं, यानीं खुशाल बाहेर जावें.

**नाना**—**कन्हयालाल, रामभटजी, अहंमद, गुणाजी** व **साबाजी,** तुम्हीं जरा जवळया. ( नंतर ते जवळ येऊन इतर मंडळी दूर गेल्यावर ) एक दोन दिवसांत मला

महाराजांची थकलेली खंडणी वसूल करावयास सैन्य घेऊन जावयाचें आहे. त्यावेळीं मला तेथें जयापजय मिळणें परमेश्वराधीन आहे. कारण आमचे नवीन सेनापती **दादासाहेब** ती खंडणी वसूल करण्यासाठीं स्वतः जाऊन आले, परंतु ती त्यांच्यानें वसूल झाली नाहीं. म्हणून त्या कामावर माझी नेमणुक कशी झाली, हा सर्व प्रकार मीं तुम्हांस सांगितलाच आहे. आतां तुम्हीं असें करा कीं **मदनपुरींत** जाऊन त्या राज्यांतील सैन्यामध्यें कसा तरी शिरकाव करा. आमची स्वारी प्रथमतः त्याच राज्यावर आहे. पुढें काय करावयाचें हें मीं तुम्हांस सांगितलें पाहिजे असें नाहीं.

**कन्हया**—हुकुम **सरकार**, तुंम बेफिकिर रहो. वहां जाके क्या करना, और कैसा करना, येह सब हंम जानते हूं.

**नाना**— बरें, तेथें तुमची व आमची भेट हवी असेल तर ती कशी होईल ?

**कन्हया**—अपना **रामभट** वो काम अच्छे तऱ्हेसें करेंगा.

**रामभट**—**नानासाहेब**, आपले **जमादार** ( कन्हया ) मोठे कुशल व शूर आहेत. आपण कांहीं काळजी करूं नये. परंतु मीं **मदनपुरींत** गेलों म्हणजे, **राधाबाईच्या** शोधार्थ कोण जाईल ?

**कन्हया-रामभटजी**, हंम **मदनपुरीमें** आगे जायेंगे. तुंम आठदिनसें पिच्छे आव. बस्स.

**रामभट**—आठ दिवसांचा अवकाश आहे ना ? पुरे. त्या मुदतींत **राधाबाईस** येथें सुरक्षित आणून मीं **मदनपुरींत** येईन.

**कन्हया**—बहोत अच्छा.

**नाना**—बरें, **कन्हयालाल**, ईश्वर कृपेनें **मदनपुरीं**तील आपलें काम फत्ते झाल्यावर तुह्मीं कोठें जायचें तें माहित आहे ना ?

**कन्हया**—हां साब, सब कुच्छ मालूम हय. **महाराज** के राजधानींमें जिसवख्त हंम आयेंगे, उसवख्त हंमकु देखके तुंम बी अजब करोंगे.

**नाना**—अहो, या तुमच्या बळावर तर आह्मीं उड्या-मारणार. नाहींतर माझ्या हो हातून काय होणार आहे !

**कन्हया**—**नानासाब**, हंम सब लोग आपके बंदे नौकर हूं. आपका जैसा हुकुम होयगा वैसे हंम चलनेवाले.

**नाना**—जारे **गुणाजी**, धाकट्या **महाराजांस** इकडे घेऊन ये.

**गुणाजी**—आज्ञा **सरकार**. ( असें ह्मणून जाऊन घेऊन येतो. )

**नाना**—धाकटे **महाराज**, आपली तब्बेत कशी काय आहे ?

**राजपुत्र**—क्यां, ! चांगली आहे.

**नाना**—तुम्हांला येथें चैन पडतें ना ?

**राजपुत्र**—हो, हे **कन्हयालाल** व आम्हीं रोज फिरावयास जातों व साधेल तर थोडी शिकार ही करतों. हे **रामभटजी** नानाप्रकारच्या गोष्टी सांगून आम्हां सर्वांस पोट धरधरून हंसवीतात.

**नाना**— तुमचे खाण्यापिण्याचे हाल होत असतील, परंतु आतां थोडे दिवस राहिले आहेत.

**राजपुत्र**— थोडे दिवस राहिले आहेत, म्हणजे काय ?

**नाना**— म्हणजे तुम्हांस गादीवर बसविण्यास किंवा

युवराजपदाचा तुमचा हिरावून घेतलेला एक **तुम्हांस** परत देण्यास. त्याचप्रमाणें आपली **आई** व **ताई** यांस भेटण्यास.

**राजपुत्र**— ( दुःखानें उसासा टाकून ) **नानासाहेब**, या गोष्टी कशाच्या होतात व **महाराज**, **आई**, व **ताई**, हीं आतां मला कशाचीं भेटतात !

**नाना**— आपण आज जवळ जवळ एकवर्ष धीर-धरिलात. तसाच आतां फार तर महिना पंधरा दिवस धीर धरा, म्हणजे पहा काय चमत्कार होईल तो.

( अशाच इकडच्या तिकडच्या कांहींवेळ गोष्टी बोलून ते निघून जातात. )

---

## प्रवेश ५ वा.

**स्थल—हिराबाग.**

**पात्रें—ताई व नाना.**

**ताई**—( आपल्याशींच ) काय मीं कम नशीबाची आहे बरं ! अल्प वयांत आमची आईच कां मरावी ! नंतर माझ्या भावाला वाघानेंच कां मारावा ! पुढं मीं आपल्या मावशीपाशीं रहात असतां त्या मेल्या **दादानं** रोजरोज तिथ येऊन माझ्याशीं व मावशीपाशीं आपल्या माझ्या लग्नाच्या गोष्टी काढून, मला नेहमीं कां बरं छळावं ! त्याचं माझं लग्न जुळवण्याकरितां किती म्हणून लहान मोठीं माणसं त्याच्यातर्फे आलीं ! कुणीं येऊन माझी समजूत करावी. कुणीं मावशीची करावी. शेवटीं **नानासाहेबांस**ही याच कामाकरितां **राणीनं** पाठविला. मीं हट्ट करूं नये, **महाराज** सांगतीलतें निमुटपणें ऐकावं, असें मावशी ही मला सांगत्ये. पण, इश्शश्रे तो मेला ! त्या मेल्या-बराबर लग्नास तयार व्हावं, त्यापेक्षां मरावं हें बरं नाहींका !

**महाराज** सांगतात त्याप्रमाणं सर्वांनीं सांगितलं, कीं **दादा** म्हणजे आज प्रती राजाच आहे. म्हणून त्याच्याशीं नाहीं, तर मीं लग्न तरी कुणाबराबर करणार ! होय, खरं. लग्न तरी कुणाबराबर करणार ! जसं काय, **दाद्या** शिवाय दुसरं कुणीच नाहीं वाटतं ! तोचका मेला मदनाचा पुतळा लागून गेला आहे ! मेला पांढऱ्या पायाचा. इथ आल्यापासून एक तरी कांहीं चांगलं व्हायचं होतं! **महाराज** तरी त्या यमाला कसे भाळ्ले तें पहा! मीं त्यांची मुलगीना, पण माझ्या हिताहिताकडे लक्ष न देतां त्याचं हित करण्यास ते झटतात ! तेव्हां हा कर्म भोग नव्हे ! पण तें सारं असो. आज मीं इथ कशासाठीं आल्यें ! **नाना-साहेबांस** मीं इथ यायला सांगितलं आहे ना? ( नंतर किंचित भिऊन व लज्जित होऊन ) पण इथ आलं आहे कोण ? मीं मला लाज व भिती काय म्हणून उत्पन्न झाली ही ! नुस्तें नांवचना कायतें मीं घेतलं ! काय असेलतें असो ! **नानासाहेबांस** मीं पहिल्यानें आमच्या घरीं पाहिलं. तेव्हांपासून मला आपलं असंच होतंबाई. पण असं कां ! त्यानींसुद्धां त्या मेल्या-विषयीं मला पुष्कळ आग्रह केला. तेव्हांपासून तर मला क्षणोक्षणीं असं वाटतं कीं, ते त्याच्या बद्दल जी येवढी रद-बदली करतात, ती आपल्याच बद्दल कां बरं करीत नाहींत ! मीं तेव्हांच हो म्हणून सांगितलं असतं. ( नंतर किंचित घाबरून कोणीं ऐकिलें किंवा काय या संशयानें इकडेतिकडे पाहून ) पण मीं फारच वाव्हल्यें. अगबाई, ते आले की ! ( नंतर नानाहेबांस ) आपणांस माझा निरोप पोहोंचला काय ?

**नाना**—म्हणून तर मीं आलों.

**ताई**—( दुःखी होऊन ) **नानासाहेब**, माझी हल्लीं कशी स्थिती झाली आहे ती तुम्हांस मी काय सांगू ! मीं अगदींचहो

पोरकी आहें ! पहा कीं आईबाप असून नसून मलासारखेच आहेत. मोकळिक म्हणाल तर मुळींच नाहीं. कुठ जाईन म्हणावं, तर माझ्यावर खडा पहारा. एखाद्या गरीबाच्या पोटीं जरी जन्म घेतला असता तरी बरं झालं असतं. परंतु राजकन्या होऊन माझा जन्म फुकट आहे !

**नाना**—**ताईसाहेब**, तुझीं अशा दुःखी कां होतां ? तुझांस कशाचा तोटा आहे !

**ताई**—तोटा कशाचा नाहीं, पण हवेंतें मिळत मात्र नाहीं, येवढंच.

**नाना**—म्हणजे काय, मीं समजलों नाहीं.

**ताई**—तुमच्या सारख्या चतुर पुरुषास मी सांगितलं पाहिजे असं नाहीं. तुम्हांस सर्व कांहीं समजतं. पण आपलं उगीच वेड घेतां. तुम्हींच पहा कीं या **दाद्या**ची पिडा मला नको, असें मीं सांगत असतां **महाराज** माझं ऐकतात काय ? दुसरं असं कीं मला मावशीजवळ राहूंद्या, असं मीं रोज ह्मणत असतां मला इथ कैदीसारखी कां बरं आणून ठेवली आहे ! हीं काय लहान सहान दुःखें आहेत असें तुझीं ह्मणतां !

**नाना**—मला खरेंच विचाराल तर तुझीं **दादासाहेबां-च्या** ह्मणण्यास रुकार द्यावा, हें चांगलें. त्यांत तुझांस सूख होईल. मला जर बहीण असती, तर ती मीं **दादासाहेबांस** मोठ्या आनंदानें दिली असती.

**ताई**—( जरा रागाऊन ) खरंच आहे, तुझीं राणीसाहेबांचीं माणसं, ह्मणून तुझांस तो देवासारखा वाटतो. करा आपली तुझीं त्या मेल्याची हवी तेव्हढी स्तुती. परंतु मीं जिवंत ह्मणून आहें तों पर्यंत त्या मेल्याचं तोंडही पहावयास कबूल नाहीं. मग **महाराज** माझं काय करतील तें करोत.

**नाना**—**ताईसाहेब**, असें कसें ! आपल्यास **महाराजांचें** ऐकलें पाहिजे.

**ताई**—काय सांगूं **नानासाहेब** ! वेळ येईल तेव्हां तुह्मांस समजेल. बरं पण, तें असो. मीं तुह्मांस इथ कशासाठीं बोलाविलं तें समजलं काय ?

**नाना**—नाहीं. सांगाल तेव्हां समजेल.

**ताई**—( मोठ्या गहिंवरानें ) काय सांगूं मीं तुह्मांस ! ( नंतर मनांतील हेतु सांगण्यास धीर होईना ह्मणून ) **नानासाहेब**, मीं अनाथ आहें. मला त्राता ह्मणून कुण्णीं नाहीं. ( असें म्हणून मोठ्यानें रडून ) माझी काय अवस्था होईल, हें माझ्यानें सांगवत नाहीं. म्हणून आतां माझं तुह्मीं रक्षण करा. ( असें ह्मणून तिनें **नानासाहेबांच्या** चरणीं मस्तक ठेविलें, व स्फुंदत स्फुंदत रडूं लागली. )

**नाना**—( फार दुःखी व सद्गदित होऊन ) हें काय **ताईसाहेब** ! उठा, उठा. ( असें ते ह्मणाले, परंतु तिला हात लावण्यास त्यांना धीर होईना. )

**ताई**—( न उठतां ) मीं आपल्या जिवास फार कंटाळून गेलें आहें. आपण मला अश्वासन देत असाल तर तसं वचन द्या. नाहींतर मग मला वाटेल तें मीं करीन. पण, मीं तुह्मांस शरण आल्यें असतां, तुह्मीं माझं रक्षण करीत नाहीं, येवढं मला सांगा, ह्मणजे झालं.

**नाना**—( तिच्या मनांतील हेतू समजून मुद्दाम ) **ताईसाहेब**, खरें ह्मटलें म्हणजे तुमचें पालन पोषण करणारे **महाराज**, व रक्षण करणारे **दादासाहेब**. मीं आपला एक यःकश्चित मनुष्य आहें. मीं आपलें रक्षण काय बरें करणार !

**ताई**—**नानासाहेब**, मला थोडं बहुत समजतं. व

कोण मनुष्य कसा आहे, हेंही समजतं. या राज्यांत मलातर तुमच्याशिवाय दुसरा कोणीं दिसत नाहीं. व म्हणून तर मीं ही गोष्ट तुमच्याशीं काढिली.

**नाना**—म्हणजे काय ! या राज्यांत शूर व दयालू लोकच नाहींत, असें का तुमचें म्हणणें ?

**ताई**— होय, तसंच. ( नंतर दुःख सहन न होऊन ) **नानासाहेब**, मीं तुम्हांस आणखीं एकवार निक्षून सांगत्यें, कीं मीं याविषयीं पुष्कळ विचार केला आहे. व माझ्या मनाचा जो निश्चय झाला, तो आपणांस सांगितला आहे. आतां हें खरं कीं मीं तुमच्याशीं ही गोष्टकाढल्यामुळं स्त्रियांच्या मर्यादेचें उल्लंघन झालं आहे. परंतु तुम्हीं माझ्या स्थितीकडे पहा. माझा अगदीं नाईलाज झाला आहे. ही गोष्ट माझ्या मनांत आज फार दिवस घोळत आहे. परंतु तुमच्याशींच काय, मीं आपल्या मावशी पाशीं ही त्या गोष्टीचा उच्चार केला नाहीं. परंतु आतां माझा नाइलाज झाला म्हणूनच बोलल्यें. तर आतां कायतें सांगा. माझी गोष्ट आपण कबूल केलीत, तर बरं. नाहींपेक्षां उद्यां यावेळेस मीं तुमच्या दृष्टीस पडणार नाहीं.

**नाना**— मीं तुमचें म्हणणें नाकबूल केलें, तर तुम्हीं काय करणार म्हणालां ?

**ताई**—हें. ( असें म्हणून अत्यंत चमकणारी एक पूड त्यांच्या हातीं देऊन ) **नानासाहेब**, मीं आतां आपल्या जिवावरही उदार झाल्यें आहें. अशा स्थितींत मला जगून तरी काय करायचं आहे !

**नाना**—( ती हिऱ्याची पूड पाहून व घाबरून ) छे छे, भलतेंच. हें तुमच्या सारख्या शहाण्या राजकन्येस शोभतें काय ? ( असें म्हणून ती पूड उडवून देतो. )

**ताई—नानासाहेब**, असं तुह्मीं कराल हें मला पूर्वींच ठाऊक होतं. परंतु तशी पूड मजपाशीं दुसरी पुष्कळ आहे. ( नंतर पुनः रडावयास लागून ) **नानासाहेब**, हीच पूड मीं आतां तुमच्या समक्ष खाल्ली असती, परंतु त्यामुळं तुह्मीं संकटांत पडाल ह्मणून—

**नाना**—( फारच गहिंवरून व इचें आपल्यावर खरोखर मन आहे याविषयीं खात्री होऊन ) **ताईसाहेब**, आपला हेतू मीं समजलों. परंतु आपण माझ्या नादीं लागूं नये. त्यापासून तुह्मांस सूख होणार नाहीं. **दादासाहेबां**विषयीं तुह्मीं ऐकत नाहीं, ह्मणून तुमच्यावर **महाराज, राणीसाहेब** व **दादासाहेब**, यांचा मोठा कोप झाला आहे. आणि त्यांत **दादासाहेबांस** नापसंत करून आपण मला पसंत करतां ही गोष्ट त्यांस समजली, तर तुमच्यावर व माझ्यावर त्या सर्वांचा मोठा गहजब होऊन काय परिणाम होईल हें सांगवत नाहीं. याचा नीट चांगला विचार करा.

**ताई**–(नानासाहेब कबूल आहेत असें पाहून आनंदित होऊन ) **नानासाहेब**, तुह्मीं होय मात्र ह्मणा, ह्मणजे झालं. मग मजवर पर्वत प्राय जरी दुःखें कोसळलीं, तरी मीं डगमगणार नाहीं.

**नाना**—माझ्या कबुलीनें आपणां उभयतांस दुःखें होणार आहेत. मग त्या पासून तुम्हांस लाभतो काय? म्हणून तुम्हीं निदान तूर्त तरी माझा नाद सोडून द्या. तूर्त मीं एवढेंच कबूल करतों कीं, सांप्रत **दादासाहेबांच्या** संबंधानें तुम्हांवर जी सक्ती होत आहे, ती होऊं देणार नाहीं. व हें अरिष्ट टळल्यावर मग पुढचा विचार पुढें करूं.

**ताई**— आपण एवढं तरी कबूल केलंत, यामुळं मीं अत्यंत आनंदी झाल्यें आहें. आतां मला कुणीं व कसेंही छळलं तरी मीं भीणार नाहीं.

**नाना— ताईसाहेब**, आपण या गोष्टीची परिस्फुटता अगदीं करूं नये बरें. नाहींपेक्षां उभयतांचा घात होईल.

**ताई**— छे छे, असं कसं होईल. मीं इतकी का मूर्ख आहें !

**नाना**—बरं तर, मीं आतां जातों. तुम्हीं आतां स्वस्थ असा. तुम्हांस आतां कोणत्याही प्रकारचें दुःख होऊं देणार नाहीं.

( नंतर मोठ्याप्रेमानें कांहीं वेळ यापुढें परस्परांनीं परस्परांशीं कसें वागावयाचें याविषयीं बोलून तीं उभयतां निघून जातात. )



## अंक ७ वा.

### प्रवेश १ ला.

**स्थल—दादासाहेबांच्या** वाड्यांतील एक दिवाणखाना.

**पात्रें—दादासाहेब, प्रधान व रामशास्त्री.**

**दादा**—कां **प्रधानजी**, आज इकडे कुणीकडे येणें झालें ?

**प्रधान—दादासाहेब**, मीं आपल्या येथें कधीं येत नाहीं वाटतें ! अहो, तुम्हीं तर आमचे खांब. तुमच्या सल्ला

मसलती शिवाय मीं कधीं तरी कांहीं केलें आहे काय ? कधीं नाहीं. मग असा प्रश्न कां ?

**रामशास्त्री**—**दादासाहेब, प्रधानजी** जे आले आहेत ते कांहीं उगीच आले नाहींत. कांहीं तरी विशेष काम असावें म्हणून आले आहेत, असें वाटतें.

**दादा**—असें तर खरें, **शास्त्रीबुवा**. पण काय बरें तें काम असावें !

**रामशास्त्री**—आपल्यास आतां प्रधानजीच सांगतील. ( नंतर प्रधानजीकडे वळून ) कसें काय **प्रधानजी** ?

**प्रधान**—**शास्त्रीबुवा**, तुम्हीं तरी मोठे पक्के खरे ! अहो, मीं ज्या हेतूनें येथें आलों तो आपणां उभयतांस सांगावयासाठींच आलों आहें. परंतु तुम्हीं तो समजलां, याचेंच मला मोठें आश्चर्य वाटतें.

**दादा**—कां **प्रधानजी**, कांहीं अधिक उणें झालें आहे कीं काय ?

**प्रधान**— अधिक उणें कांहीं नाहीं. पण आपलें माझ्या मनांत तुम्हांस भेटून सांगावें व जें करणें तें आपल्या त्रिवर्गाच्या विचारें करावें असें मनांत आल्या वरून आलों.

**रामशास्त्री**—पण असें तें काय असावें बरें ! कांहीं सामान्य गोष्टतर नसावी, हें आपलें खास.

**प्रधान**—**दादासाहेब**, तुम्हीं, मीं व ( बोटानें दाखवून ) हे **शास्त्रीबुवा**, हेच आपण राज्य करभार चालविणारे. तर मग एकाचा जो मान किंवा अपमान, तोच दुसऱ्याचा ना ?

**दादा**—( या संदिग्ध भाषणाचा अर्थ न समजल्यामुळें ) काय, **प्रधानजी**, तुमचा कोणी अपमान केला कीं काय ?

**प्रधान**—( राग आलेला दर्शवून ) माझाच अपमान झाला तर मात्र मला राग यावा, नाहीं तर येऊं नये ना ?

**दादा व रामशास्त्री**—( एकदम ) तुम्हीं असें संदिग्ध बोलतां त्यावरून आम्हांस कांहीं एक समजत नाहीं. उलट आमचीं मनें मात्र अधिक गोंधळून गेलीं आहेत. तर आतां विलंब न लावतां काय तें स्पष्ट सांगा.

**प्रधान**—**दादासाहेब**, मला जें वाटतें तें मीं सांगतो. आपणांस राग मात्र न यावा.

**दादा**—**प्रधानजी**, मला राग येईल असें तुम्हीं समजून उमजून कांहीं एक बोलणार नाहीं, ही माझी खात्री आहे. म्हणून जें काय असेल तें खुशाल सांगा.

**प्रधान**—**दादासाहेब**, आजकाल या राज्याचे तुम्हीं ह्मणजे मुख्य खांब आहां. त्याचप्रमाणें ( बोटानें दाखवून ) हे आपले **शास्त्रीबुवा** ही कमी महत्वाचे आहेत असें नाहीं. परंतु थोडक्याच दिवसांत आपण सर्व मागें पडूं अशी माझी खात्री होत चालली आहे. यासाठीं माझी आपणांस एवढीच विनंती आहे कीं अशीवेळ येऊं देण्यापेक्षां आपण येथून कोठें दूर जावें हें बरें. **शास्त्रीबुवा**, आपलें काय मत आहे ?

**रामशास्त्री**—**प्रधानजी**, आपणत्रिवर्ग मागें पडूं ! म्हणजे काय ?

**प्रधान**—आज या राज्यांत जे तुम्हीं मुख्य म्हणून आहां, तो तुमचा मुख्यपणा जाईल, म्हणजे तुम्हीं मागें नाहींका पडलां ?

**दादा**—( रागानें ) **प्रधानजी**, तुम्हीं काय म्हणतां याचा विचार केलात काय ? अहो, आम्हीं काय काय अचाट कामें केलीं आहेत हें मनांत आणून तरी कार्यंत बोला ! हा **दादासाहेब** म्हणजे आपला यःकश्चित मनुष्य आहे असें

तुम्हीं समजतां काय ! तुम्हीं मला लिचापिचा समजूं नका बरें ! **महाराज**सरकारांसही गुंडाळून ठेवीन व ठेवीलेंही आहे, असा हा पठ्या आहे. ( असें म्हणून मिशांस पीळ देत ऐटीनें सर्वांकडे पहात राहिला. )

**रामशास्त्री**—**दादासाहेब**, आपण असे रागावूं नका. **प्रधानजी** हे आपल्यास पूज्य मानून बोलत आहेत.

**प्रधान**—**शास्त्रीबुवा**, आजपर्यंत या राज्यांत मुख्य असा काय तो मींच होतों. परंतु **दादासाहेब** आल्यापासून सर्व प्रकारचें वर्चस्व आम्हीं सर्वांनीं त्यांनां दिलें आहे; व तें त्यांच्याकडेसच सदोदित रहावें असें मीं मनापासून इच्छीत आहें. पण—

**दादा**—( रागानें ) " पण " काय ?

**प्रधान**—( दादासाहेबांना पुष्कळ राग आल्याशिवाय आपला कार्यभाग व्हावयाचा नाहीं हें मनांत आणून ) " पण " कायतें सांगूंच ? रागावणार नाहींना ?

**दादा**—( फाररागानें ) हो हो, कायतें सांगा एकदां .

**प्रधान**—तर मग ऐका, कीं तें तुमचें वर्चस्व तुमच्याकडे फार दिवस राहीलसें मला वाटत नाहीं. आणि आपलें वर्चस्व गेलें म्हणजे आम्हां उभयतांचेंही गेलेंच.

**दादा**—**प्रधानजी**, तुम्हांला मीं एकवार सांगितलेंना कीं **महाराज** सरकारचेंही माझ्यापुढें कांहीं चालावयाचें नाहीं ह्मणून. मग इतरांचा काय पाड आहे !

**प्रधान**— हा प्रकार पूर्वीं होता. हल्लीं सर्व उलट झालें आहे. ( नंतर दादासाहेबांस चिडवावें म्हणून मुद्दाम ) म्हणून माझी आपल्यास विनंती आहे कीं आपण तिघांनीं हें राज्य

सोडून काशीयात्रेस जावें, म्हणजे त्यांत स्वार्थ व परमार्थ, असे दोन्हीही साध्य होतील.

**दादा**— ( अत्यंत रागावून ) **प्रधानजी**, आमचा अपमान करावा असें कोणाच्या मनांत आलें आहे तें सांगा, कीं त्याचे दोन तुकडे केलेच म्हणून समजा. मग तो कोणीही असो.

**प्रधान**—भरदरबारांत आपला सर्वांचा अपमान झालेला आपण विसरलां काय ?

**दादा**— ( अत्यंत रागावून ) **प्रधानजी**, तुम्हीं आतां आपलें तोंड आटपा व येथून चालते व्हा. बस्स. काय पाल्हाळ लावला आहे हा ! काय तें एकदम सांगावयास काय झालें !

**प्रधान**—**दादासाहेब**, " चोर सोडून संन्याशी फांशी" असा हा न्याय आपण केलात. अहो, भरदरबारांत कोणीही शूर नव्हता काय ? आणि जर होता तर तो मागें पडलानां ?

**रामशास्त्री**— **प्रधानजी**, शूरपणामध्यें आपल्या **दादासाहेबांचा** हात कोण धरणार आहे ! तुम्हीं असे घाबरतां कां ?

**प्रधान**—**शास्त्रीबुवा**, **दादासाहेबांच्या** जोरावर तर आम्हीं आपलीं कामें करीत आहों. पण त्यांनाच शत्रू उत्पन्न झाला तर !

**रामशास्त्री**—काय ! आमच्या **दादासाहेबांस** शत्रू उत्पन्न झाला ?

**प्रधान**—म्हणून तर मीं आज मुद्दाम आलों.

**दादा**—( मोठ्या रागानें तरवार उपसून ) **प्रधानजी**, माझा कोण शत्रू तो सांगा ? त्याचा शिरच्छेद केल्याशिवाय ही तरवार ठेवणारच नाहीं.

**प्रधान**—मांडलिक राजांकडून खंडणी वसूल करावयास सैन्यासह जो गेला आहे तो. त्याच्या कडून कांहीं हेर आले, त्यांच्या सांगण्यांत तो विजयी झाला असें आहे. राजवाड्यांत **महाराज** सरकार व **राणीसाहेब**, यांजकडे ही त्याचा प्रवेश आहेच. आतां तो विजयी होऊन परत आल्यावर आपणां सर्वांस मागें टाकील किंवा नाहीं ? **महाराजांचा** त्याजवर द्विगुणीत लोभ बसेल किंवा नाहीं ? या सर्व गोष्टींचा आतां आपणच विचार करावा.

**दादा**—हां हां, तो **नाना** ! अं:, त्याची एवढी भीती कशाची ! आणि तो आपल्यास रिपू होईल असें तुम्हांस वाटत असेल, तर तो परत येतांच त्याच्या हातावर वाटाण्याच्या अक्षता देऊं ह्मणजे झालें.

**प्रधान**—आपण तें सर्व कांहीं कराल. परंतु तो जी कीर्ती संपादन करील ती तुम्हीं कशी नाहिंशी कराल ?

**रामशास्त्री**—कां **दादासाहेब**, थोड्या दिवसा पूर्वीं याच राजश्री विषयीं मला संशय येऊन मीं आपल्यापाशीं गोष्ट काढिली होती ना ? तोच संशय आमच्या **प्रधानजी** सही आला. बरें, कांहीं चिंता नाहीं. याला आतां कांहीं तरी तोड काढिली पाहिजे.

**दादा**—( प्रधानजीच्या बोलण्याचा खरेपणा मनांत येऊन ) **प्रधानजी**, आपण सर्व घसरलों खरे. आतां याला कांहीं तरी लवकर तोड काढा.

**प्रधान**—**दादासाहेब** मला असें वाटतें कीं आपण सैन्य घेऊन सर्व मांडलिक राजांकडे जावें. आणि हर प्रयत्न करून व प्रसंगीं खंडणीही कमी घेऊन त्यांना आपल्या बराबर घेऊन यावें. व दरबारांत त्या **नाना**ची वाहवा होईल

त्यावेळीं त्या मांडलिक राजांकडून भरदरबारांत त्याला खोटा ठरवावा, ह्मणजे झालें.

**रामशास्त्री**—वाहवा, प्रधानजी, आपण मोठी उत्तम युक्ती काढिली. दादासाहेब, आपल्यास ही युक्ती मान्य आहे ना?

**दादा**—शास्त्रीबुवा, तुम्हांस मान्य झाली ह्मणजे मला झालीच. परंतु आमच्या बराबर तुम्हांस आलें पाहिजे.

**प्रधान**—दादासाहेब, आपल्या कानावर आणखींही एक गोष्ट घातली पाहिजे. ती ही कीं जुने सेनापती व न्यायाधीश या उभयतांचा त्या नानाला आश्रय आहे. यासाठीं आपल्यास फारच खबरदारी ठेविली पाहिजे.

**दादा**—( रागानें ) तो थेरडा ( सेनापती ) अजून आमच्या कामांत ढवळाढवळ करतोच काय? कांहीं चिंता नाहीं.

( याप्रमाणें दादासाहेबांनीं शास्त्रीबुवांसह मोहिमेवर जाण्याचें ठरून सर्व जातात. )

---

## प्रवेश २ रा.

**स्थल**—राजदरबार.

**पात्रें**—महाराज, प्रधान, दादासाहेब, रामशास्त्री, हरबाराव, जिवबा, न्यायाधीश, सेनापती, मांडलिकराजे, नाना, गणपतराव, व इतर दरबारची मंडळी.

**राजा**—प्रधानजी, दरबारची सर्व मंडळी हजर आहे काय?

**प्रधान**—महाराज, सर्व हजर आहे.

**राजा**—दादासाहेब, असे जवळ या.

**दादा**—आज्ञा **महाराज**. ( असें म्हणून **रामशास्त्री, हरबा** व **जिवबा** यांसह महाराजांच्या सिंहासनाजवळ जाऊन बसतो. )

**राजा**—( न्यायाधीश व सेनापती यांस उद्देशून ) कां आचार्य, तुम्हांस समजलेंच असेल कीं आमच्या दादासाहेबांनीं मांडलिक राजांस पादाक्रांत करून खंडणीही वसूल करून आणिली हें.

**न्यायाधीश**—हां हां, वाः ! फार उत्तम झालें.

**सेनापती**—महाराज, खंडणी वसूल करण्यास दादासाब गेले व्हते व्हय ?

**प्रधान**—होय, आणि ते खंडणीही घेऊन आले.

**सेनापती**—पन बघा, दरबारांत इडा कुनीं उचलला व्हता ?

**हरबा**—ते नवीन **नाना** न्हई का, हंग त्यानीं.

**सेनापती**—आन त्ये **नाना** कुठ हयती ?

**जिवबा**—त्येनीं पोबारा केलानीं काय !

**राजा**—**प्रधानजी, दादासाहेबानीं** जी बहाहुरी मिळविली त्याबद्दल त्यांना जहागिरीची जी सनद आज द्यावयाची, त्यांतील तात्पर्य दरबारास सांगा.

( न्यायाधीश व सेनापती इतरांपेक्षां अधिक उत्कंठेनें ऐकतात. )

**प्रधान**—( दरबारास उद्देशून ) मांडलिक राजांकडून खंडणी येईना म्हणून याच दरबारांत विडे ठेविले होते. ते अशासाठीं कीं कोणा शूरानें उठून ते उचलावे व खंडणी वसूल करून आणावी. त्यावेळीं कोणीही मोठा सरदार उठला नाहीं. **नाना** म्हणून राणी साहेबांचे एक खासगी कारभारी आहेत, ते कायते उठले. नंतर आपल्या बराबर सैन्य वगैरे सर्व सामुग्री

घेऊन ते गेले. पुढें त्यांच्यानें खंडणी वसूल होईनाअसें समजल्यावरून **दादासाहेब** सैन्यासहवर्तमान पुन्हाः मांडलिक राजांवर स्वारी करावयास गेले, आणि शत्रूचा पराभव करून खंडगी घेऊन महाराजांचा विजयध्वज गाजवून परत आले. या त्यांच्या शौर्याबद्दल आपल्या दयाळू **महाराज** सरकारानीं सुप्रसन्न होऊन **दादासाहेबांस** वंशपरंपरें दहाहजारांची जहागीर दिली आहे.

**राजा**--**प्रधानजी, दादासाहेबांनीं** पराजित केलेल्या मांडलिक राजांसही येथें धरून आणिले आहेत, हें सांगावयास विसरलां वाटतें ?

( तेव्हां मांडलिक राजांपैकीं एक )

**मांडलिकराजा**--( उठून महाराजांस मोठया नम्रतेनें मुजरा करून ) महाराज सरकारचा जयजयकार होवो. **सरकार**, कृपाकरून मला थोडें बोलण्याची आज्ञा असावी.

( दादा व शास्त्री एकमेकांकडे साशंक पहातात. )

**राजा**--तुम्हांला जें काय बोलावयाचें असेल तें खुशाल बोला. आमची आज्ञा आहे.

**मांडलिकराजा**-- **महाराजसरकारास** यावर्षी आमची खंडगी सालाबाद प्रमाणें वेळेवर व बिन तक्रार आली नाहीं हें खरें आहे. व हेंही खरें आहे कीं, **महाराजांस** त्यामुळें फार तसदी झाली असेल. ही खंडणी न द्यावी असा आमचा बिलकुल मानस नव्हता. परंतु कांहीं विशेष कारणास्तव आम्हांस तसें करावें लागलें. आतां तें विशेष कारण काय हें मात्र आमच्यानें आजच सांगवत नाहीं. प्रसंगविशेषीं तें आम्हीं **महाराज** सरकारास पुढें सांगूं. ( नंतर प्रधानजीकडे वळून ) **प्रधानजी**, ज्या **नानासाहेबांस** आमच्यावर

पाठविलें होतें ते जर या वेळीं दरबांत हजर नसतील तर त्यांस कृपाकरून त्वरित आणवावें.

**रामशास्त्री**—त्यांच्याशीं आपलें जें काम असेल तें आपण अन्य ठिकाणीं जाऊन करावें. या दरबारांत खासगी कामें करण्याची महाराजांची सक्त मनाई आहे.

**मांडलिकराजा**— **शास्त्रीबुवा**, आपण येथें आहां हें उत्तम आहे. आतां ते **नानासाहेब** मात्र इतक्यांत येथें यावे.

**राजा**—( रागानें ) खासगी कामें दरबारांत होत नसतात, असें तुम्हांस **शास्त्रीबुवानीं** आतांच सांगितलें ना ?

**मांडलिकराजा**— आज्ञा **सरकार. नानासाहेबां**पाशीं आमचें खासगी काम मुळींच नाहीं. जें कांहीं सरकारास विदित करावयाचें आहे, तें, **दादासाहेब**, **शास्त्रीबुवा** व **नानासाहेब** यांच्या समक्ष सांगावयाचें आहे म्हणून-

**रामशास्त्री**—पण ते आहेत कोठें ! ते आतां या राजधानींत येतील असें मला तर वाटत नाहीं.

**दादा**—पण त्यांच्याशीं यांचें काय काम आहे ! त्यांना आतां या दरबारांत कोण उभा करूं देईल ! त्यांनीं तर आपल्या हातानें आपल्या तोंडास काळें लावून घेतलें.

**जिवबा**—**दादासाहेब** म्हंगताती तें अक्शी बराबर हय.

**गणपतराव**—महाराजसरकारचा जयजयकार होवो. **महाराज**, मीं एक यःकश्चित मनुष्य **नानासाहेबांचा** नोकर आहें. मीं या मोहिमेवर **नानासाहेबां**बराबर गेलों होतों. त्यांचा तळ काल सायंकाळीं एथून दहा कोसांवर होता. दिवसभर चालून थकून गेल्यामुळें आह्मीं सर्व डेरे देऊन विश्रांती घेत बसलों होतों. अस्तमान होऊन थोडा काळोख

पडूं लागला होता, इतक्यांत आमच्यावर कोणी दुष्टानें येऊन हल्ला केला. आह्मीं सर्व बेसावध होतों, यामुळें **नानासाहेबांसह** आमच्या बहुतेक लोकांस शत्रूनीं कैद केलें. मीं व **नानासाहेबां**चा आणखीं एक नोकर, असे आह्मीं दोघे मोठ्या शर्तीनें शत्रूच्या तडाख्यांतून सुटून आतां इतक्यांतच येथें आलों. व **महाराजांस** वर्दी द्यावी ह्मणून दरबारांत आलों. **महाराज, नाना**साहेब जर या वेळीं येथें हजर असते तर या मोहिमे विषयीं सर्व कच्चें वर्तमान ते सांगते.

**दादा—प्रधानजी, महाराज** सरकारची आज्ञा घेऊन दरबार बरखास्त करा.

**राजा—प्रधानजी**, तुह्मीं आपलें काम लवकर आटपा.

( प्रधान त्या प्रमाणें करतो इतक्यांत नाना आल्याची वर्दी जासूद येऊन सांगतो. )

( **दादा** व **शास्त्री** यांचीं तोंडें अगदीं उतरून जातात. )

( **नाना** दरबारांत येऊन **महाराजांस** मोठ्या नम्रतेनें मुजरा करून एका बाजूस उभा रहातो. )

**राजा**— ( मोठ्या रागानें ) **नाना**, पराजय झाला असतां रणांत मरून जाण्याचा निश्चय करून या दरबारांत तूं विडा उचलला होताना ? मग हें आपलें कृष्णमुख घेऊन दरबारांत यावयास तुला लाज नाहींका वाटली ? तुझ्या अपराधाबद्दल देहांत शिक्षाच तुला योग्य आहे.

**दादा—महाराज**, जयापजय येणें प्रालब्धाधीन आहे. **नाना** मोठ्या निकरानें लढले हें मीं खात्रीपूर्वक सांगतों. ह्मणून **महाराजांस** माझी विनंती आहे कीं **नानांस** एकवार क्षमा करावी.

**प्रधान—दादासाहेबांनीं** जी विनंती केली तीच **महारा**-

जांस मला करावयाची आहे. नानांचा एवढा अपराध महा-राजानीं पोटांत घालावा, अशी माझीही विनंती आहे.

( शास्त्री, जिवबा व हरबा यांनींही अशाच प्रकारें महाराजांची विनवणी केली तेव्हां )

राजा— ( शांत होऊन ) असो, नाना, दादासाहेब वगैरे मंडळीनीं तुजबद्दल फार रदबदली केली ह्मणून तुला जीवदान दिलें आहे.

नाना—महाराज, मीं अगदीं निरअपराधी आहें.

राजा—नाना, तूं अगदीं एक शब्दही बोलूं नको. व दरबारांतून निघून जा येवढेंच नाहीं, परंतु तूं आमच्या राज्यां-तूनही निघून जा. बस्स. ( नंतर प्रधानजीकडे वळून ) प्रधानजी ?

प्रधान—आज्ञा महाराज.

राजा— आम्हीं आतां हुकुमकेलेला ऐकला ना ?

प्रधान— होय महाराज.

राजा—हा आमचा हुकुम आजच्याआज अमलांत आला पाहिजे. या नान्याचें तोंडही आम्हांस पहावयास नको. समजलां.

मांडलिकराजा—महाराज, ज्यांची आम्हीं एवढावेळ वाट पहात होतों ते आले. आतां आम्हांस चार शब्द बो-लण्याची आज्ञा असावी.

दादा—तुम्हांस महाराजानीं आज्ञा दिली त्यावेळीं तुम्हांस जें बोलावयाचें होतें तें कां बोलालां नाहीं ? आतां म हाराजांची तब्बेत खूष नाहीं. यासाठीं तुम्हांस जें कांहीं बोलावयाचें असेल तें उदईक राजवाड्यांत येऊन महाराजां-पाशीं बोला

**मांडलिकराजा**—( नाखुष होउन ) **महाराज**, जर आम्हांस या दरबारीं चार शब्दही बोलण्याची आज्ञा नाहीं, तर आमचा नाइलाज आहे !

**नाना**—**महाराज**, मीं बोलल्या प्रमाणें वागलों नाहीं, असें **सरकारच्या** मनांत येऊन मजवर **सरकारची** खफा मर्जी झाली आहे असें उघड दिसतें. परंतु **महाराज**, काय करावें ! या वेळीं मीं जर खरें बोलेन तर दरबारच्या कांहीं प्रमुख मंडळीची मजवर पूर्ण इतराजी होईल. बरें असत्य बोलेन तर आपला मजवर राग होईल. अशा मोठ्या विवंचनेंत मीं पडलों आहें. **महाराज**, आपल्यास मजविषयीं अगदीं खोटा वृत्तांत समजल्यामुळें आपला मजवर मोटा राग झाला आहे हें मीं समजलों. **महाराज**, मीं कोणी मोटा मुत्सद्दी, किंवा रणशूर, अथवा एखादा जहागीरदार नाहीं. मीं यःकश्चित आपला एक नूतन नोकर आहें. बोलल्या प्रमाणें वागण्याविषयीं मला जर आपला प्राणही द्यावा लागला तर तोही मीं अर्पण करीन. **महाराज**, ज्या मोहिमेवर जाण्याची आपण मला आज्ञा केलीत त्याविषयीं दरबारांत सर्वमांडलिक राजे हजर आहेत, त्यांस विचारिलें असतां, या दरबारांत येण्यास मीं लायख आहें किंवा नाहीं, याविषयीं **महाराजांची** खात्री होईल.

**दादा**—**नाना**, तुमच्या पराक्रमा विषयीं **महाराजांस** मीं तुमच्या समक्षच सांगितलेंना ? परंतु यावेळीं ते रागावलेले आहेत. यासाठीं याच गोष्टी आपण उदईक **महाराजांस** सांगूं. ह्मणजे ते शांत होऊन तुमच्यावर पूर्ववत लोभ करूं लागतील.

**नाना**—**दादासाहेब**, यादरबारांत व त्यामुळें **महाराजांच्या** राज्यांत, यावेळीं जो माझा दुर्लौकिक झाला आ

हे, तो सहन करण्या पेक्षां आपण **महाराजांस** सांगून माझा शिरच्छेद करवावा हें बरें. व तसें होईल तर आपले मजवर महत उपकार होतील. परंतु—

**न्यायाधीश—नानासाहेब**, तुम्हीं "परंतु" म्हणालां त्याचा अर्थ काय?

**नाना**—त्याचा अर्थ हा कीं आमच्या नवीन सेनापती विरुद्ध बोलण्याचा प्रसंग मजवर नयावा.

**राजा**—(रागानें) काय काय, **दादासाहेबांच्या** विरुद्ध?

**नाना—महाराज**, मीं पुनः पुन्हा विनंती करतों कीं मजवर हा प्रसंग नयेवो!

**न्यायाधीश—नानासाहेब**, तुम्हीं असें संदिग्ध कां बोलतां? जें काय खरें असेल तें स्पष्ट सांगा.

**नाना**— तें सांगून कलह उत्पन्न करावा हें मला आवडत नाहीं.

**सेनापती**—पण खरें सांगण्या कशापाईं भ्यावें?

**नाना-महाराज**, आपल्या पदरीं जसे मोठ मोठाले वीर आहेत त्याप्रमाणें मी नाहीं. मीं एक यःकश्चित मनुष्य सरकारच्या आश्रया खालीं नुक्ताच आलेला आहें. ज्याचें अन्न खावें त्याच्या प्रसंगाला जर उपयोगी न पडावें तर मग आश्रयानें रहावें तरी कशाला? याच हेतूनें मीं विडा उचलला होता. आतां सरकारची मजवर झालेली इतराजी दूर करण्यासाठीं मीं झटत आहें. कार्य भाग झाला तर बरें. नाहीं पेक्षां हा देह ठेऊन तरी काय उपयोग! यासाठीं सरकारचा हुकुम घेऊन येथून निघून गेल्यावर परत येई पर्यंत घडलेल्या सर्व खऱ्या गोष्टी सांगितल्यावर **महाराजांचा** किंवा अन्य कोणाचा मजवर रोष न

व्हावा हें माझें मागणें आहे. मजवर इतराजी झालेली चालेल. परंतु माझी अपकीर्ति झालेली मला सहन व्हावयाची नाहीं.

**राजा**—( रागानें ) **नाना**, तुला काय सांगावयाचें असेल तें लवकर सांग. परंतु जर खोटें सांगशील तर तुला देहांत शासन होईल, हें मात्र नीट लक्षांत ठेव.

**नाना**—आज्ञा **महाराज**. सैन्यासह वर्तमान सरकारचा हुकुम घेऊन जो मीं निघालों तो प्रथम ( बोटानें दाखवून ) **नवलपूरावर** जाऊन हल्ला केला. दोन दिवस युद्ध झाल्यावर तेथील राजानें तह करून आपली खंडणी व आमचा खर्च आह्मांस दिला. नंतर आह्मीं त्या राजाला त्याच्या सैन्यासह बराबर घेऊन **मणीपुरावर** गेलों. तेथील राजानें आमच्याबराबर एक दिवस युद्ध करून नंतर तह केला, व आपली खंडणी व युद्धास झालेला खर्च देऊन आमच्याबराबर **डोंगरपुरास** आला. तेथील राजानें मात्र आमच्याशीं चार दिवस मोठें तुंबल युद्ध केलें. परंतु **महाराज**, आपल्या चरण कृपेनें आह्मीं त्याचाही पराभव केला. पुढें त्या राजानें आम्हांस आपल्या नगरीं चार दिवस ठेऊन घेऊन आमचा मोठा गौरव केला. व खंडणी न दिलेल्या इतर मांडलिक राजांस पत्रें पाठवून त्यांच्या खंडणीसह त्यांना आपल्या राजधानींत बलावून आणिलें. त्या सर्वांनीं खंडणी न दिल्याबद्दल मोठी दिलगिरी प्रदर्शित करून आपापली खंडणी दिली. नंतर सर्व खंडणी सैन्याबराबर मोठ्या बंदोबस्तानें देऊन महाराजांकडे रवाना करून दिली. व सुमारें पन्नास स्वारांसह मीं पाठीमागून येत होतों. महाराजांच्या राजधानीपासून सुमारें तीन मजलेवर आलों, तेव्हां मला अशी खबर लागली कीं, आम्हीं खजिन्यासह पाठविलेल्या सैन्याची आणि आपल्या **दादासाहेबांची** वाटेंत गांठ पडली.

ते सेनापतीच, यामुळें त्यांनीं **रामशास्त्र्याबरोबर** तो खजिना व सैन्य देऊन आपल्या राजधानींत पाठवून देऊन आपण मांडलिक राजांकडे गेले. तेथें त्यांच्याशीं काय ठराव केले ते कळले नाहींत. परंतु ही खंडणी वसूल करण्याच्या कामांत मीं कांहींच केलें नाहीं. आपणच मोठ्या पराक्रमानें खंडणी वसूल केली, असें येथें येऊन **महाराजांस** विदित करावयाचें असें ठरवून आपल्या सांगण्याच्या पुष्टीकरणार्थ ( बोटानें दाखवून ) या मांडलिक राजांस बरोबर आणिलें आहे. मींही नंतर परत जाऊन कांहीं मांडलिक राजे बरोबर घेऊन काल सायंकाळीं येथून जवळच एके ठिकाणीं वस्तीस उतरलों होतों. तेथें कांहीं लोकांनीं एकाएकीं येऊन आमच्यावर हल्ला केला व आम्हां सर्वांस कैद केलें. मोठ्या भगिरथप्रयत्नानें हा हल्ला आमच्यावर **दादासाहेबांनीं** करविला असा आम्हांस शोध लागला. नंतर हरप्रयत्नानें आम्हीं आपली आज प्रातःकाळीं सुटका करून घेऊन आपल्या चरणापाशीं कांहीं मांडलिकराजांसह आलों. हा मीं आपला खरा वृत्तांत **महाराजांस** विदित केला आहे. आतां **महाराजांनीं** मला वाटेल ती शिक्षा करावी.

**राजा**—( मनांत आनंदित होऊन परंतु बाहेरून रागानें ) **नाना**, तुह्मीं सांगितलेला वृत्तांत सर्व खरा असें कशावरून ?

**दादा**—आणि जर तो खरा नाहीं असें ठरलें तर ?

**नाना**—तर मग मला **महाराजांनीं** वाटेल ती शिक्षा करावी, हें मीं पूर्वींच सांगितलें आहे.

**राजा—दादासाहेब**, तुमचें याबद्दल काय ह्मणणें आहे ?

**रामशास्त्री—महाराज, दादासाहेब** व काल आ-

लेले हे **नाना,** यांची बरोबरी होऊन **दादासाहेबांचा** अपमान होत आहे इकडे लक्ष असावें.

**राजा**—( जरा चपापून ) खरें आहे **शास्त्रीबुवा.** ( नंतर नानाकडे वळून ) **नाना,** तुह्मीं काय बोलतां, हें लक्षांत आहे ना ?

**नाना**—**महाराज,** हातच्या कांकणास आरसा कशास पाहिजे. ( असें ह्मणून दोन अलामींस राजे साहेबांच्या पुढें आणून उभे करतो. )

**राजा**—( त्या दोघां पैकीं एकास ) **तुकोजी,** तुला काय माहित आहे तें सांग ?

**तुकोजी**—**महाराज;** **दादासाहेबांच्या** हुकुमावरून आह्मीं पांचशें लोकांसह काल सायंकाळीं **नानासाहेबांवर** हल्ला केला. व त्यांस त्यांच्या सर्व लोकांसह कैद करून आणणार होतों, इतक्यांत ( बोटानें दाखवून ) हे **नानासाहेब** व मांडलिक राजे, यांनीं आमच्या अयोग्य कृत्या बद्दल आमची चांगली कान उघाडणी केली. ती आह्मांस योग्य वाटल्यावरून आह्मीं त्यांस सोडून दिलें.

**दादा**—( अत्यंत रागाऊन ) **महाराज,** मला रजा मिळावी.

**राजा**—( घाबरून ) **दादासाहेब!**

**न्यायाधीश**—**महाराज,** आतां अगदीं न्यायाप्रमाणें जें काय करणें असेल तें करावें अशी माझी विनंती आहे.

**सेनापती**-आन् जो गुन्हेगार ठरेल त्यास शिक्षा बी व्हावी.

**रामशास्त्री**—**आचार्य,** तुह्मीं व **सेनापतीनीं** सांगावयाचें कारण नाहीं. **महाराजांस** सर्व कांहीं समजलें आहे. ही सर्व फितुरी झालेली आहे हें आतां अगदीं उघड दिसत आहे.

**दादा**—( रागानें ) **शास्त्रीबुवा**, तुम्हीं स्वस्थ बसा. **आचार्य**, **सेनापती** व दुसरे कोणीही आमच्या विरुद्ध झाले, तरी मीं त्यांस भिगार कीं काय ?

**नाना**—( मांडलिक राजांस उद्देशून ) तुम्हांस या प्रकरणीं काय माहित आहे तें **महाराजांस** सांगा ? वास्तविक म्हटलें म्हणजे तुम्हीं कोणाचीच तरफदारी करूं नये.

**रामशास्त्री**—अहो **नानासाहेब**, तुम्हीं आतां अधिक बोलण्याची तसदी कशासाठीं घेतां ! तुम्हीं आतां स्वस्थ बसा.

**नाना**—**शास्त्रीबुवा**, आजचा सर्व प्रसंग काय तो मजवर आहे. तेव्हां मीं स्वस्थ बसून कसा राहीन! मजवर आणिलेले दोषारोप केवळ द्वेषमूलक अथवा खोटे आहेत, हें तरी मला दाखविणें अवश्य आहे किंवा नाहीं ?

( तेव्हां मांडलिक राजांपैकीं एक )

**एकमांडलिक**—**महाराज**, मला आपले वीरशिरोमणी **नानासाहेब** यानीं जिंकिलें, हें मीं स्वमुखानें कबूल करणें जरी मोठें लाजिरवाणें आहे, तरी सत्य तेंच सांगितलें पाहिजे. **नानासाहेब** हे आपल्या सैन्यांत कोणी तरी साधारण प्रतीचे असावे असें मला प्रथम वाटलें होतें. परंतु ते अल्पवयी असून युद्धकलेंत मोठे निष्णात आहेत, असा मला अनुभव आला आहे. **नानासाहेबांनीं** आम्हांस जिंकून आमच्यापासून खंडणी व लढाईचा खर्च घेऊन निघून गेल्यावर आपले सेनापती आले. त्यानीं आमच्या खंडणी प्रमाणें कोणास एक, कोणास दीड, कोणास अर्ध लाख खंडणी परत देऊन नानाप्रकारें आमची समजूत करून त्यांच्या इच्छेप्रमाणें आम्हीं बोलावें एतदर्थ आम्हांस येथें घेऊन आले. परंतु आम्हांस अनृत बोलण्याची वेळ आली नाहीं हें फार चांगलें झालें. **महाराज**, मीं

जें यावेळीं सांगितलें तें केवळ मीं आपल्या विषयीं सांगितलें असें नाहीं. आम्हां आपल्या सर्व मांडलिकराजांच्या वतीनें सांगितलें. आतां या बद्दल **दादासाहेबांचा** आमच्यावर रोष न व्हावा हेंच त्यांच्यापाशीं आमचें मागणें आहे.

( हें ऐकून दरबारची सर्व मंडळी तटस्थ बसली. **सेनापती** व **आचार्य** यांस मोठा आनंद झाला. परंतु **दादा** व **रामशास्त्री** हे अत्यंत क्रोधायमान झाले. तेव्हां )

**दादा**—( सर्व मांडलिकराजांस उद्देशून मोठ्या रागानें ) तुम्हीं सर्वांनीं आज त्या " काल मृत होऊन आज पितर झालेल्या " **नानास** फितुर होऊन हवें तसें बडबडून या दरबारांत माझी अप्रतिष्ठा केली आहे, याचा नीट चांगला विचार केला आहे ना ! कांहीं चिंता नाहीं. याबद्दल तुम्हांस देहांतप्रायश्चित जर देईन तरच मीं नावाचा **दादासाहेब** होईन. ( नंतर नानाकडे वळून ) **नाना**, आज या गोष्टी राहूं द्या, असें मीं सांगत असतां तुम्हीं तें ऐकलें नाहीं. तुम्हीं काय जय मिळविला आहे हें मला माहित आहे ! हातीं पायीं पडून या मांडलिकराजांस वशकरून भरदरबारांत माझी तुम्हीं बरोबरी केली आहे, याबद्दल तुमचा आजपासून आठच दिवसांत जर शिरच्छेद न करविला तर मग पुढची गोष्ट. तुम्हांला व या फितुरी मांडलिकराजांना असें वाटलें असेल कीं **दादासाहेबांच्या** हातून काय होणार आहे? बरें आहे, पाहून घेईन. ( असें ह्मणून रागानें दरबारांतून उठून जातो. )

( राजाही घाबरून दरबार बरखास्त करवितो. )

( नंतर सर्व जातात. )

## प्रवेश ३ रा.

**स्थल**—राणीचा महाल.

**पात्रें**—राजा, राणी, प्रधान, दादासाहेब, आणि रामशास्त्री.

**राणी**— ( एकटीच आपल्याशीं ) काय मेला चमत्कार! आमचा बायकांचा जीवच्च वेडा! दोनदिवस येऊन झाले नाहींत तों आपलं मन वेडावलं, मीं असं झालं कीं त्याला कुठ ठेऊं नीं कुठे नठेऊं! आणि त्याची माहिती सुद्धां पुरी नाहीं! आतां तो देखणा आहे खरा ! पण बाहेरून जसा गोरा तसा मेला आंतून अगदीं काळा! त्याला दोन डोळ्यांची अशी मुरवत नाहीं कीं आपण यःकश्चित असून केवळ माझ्या कृपेनें- आज केव्हढे झालों; व अशाच माझ्याकृपेनें केव्हढ्या मोठ्या योग्यतेस आपण चढूं ! काय मेला नीतीचें डंभ मला सांगतो! दोन महिन्याची मुदत सांगून मला आपलं नादीं लावून मेल्यानं आपलं मात्र काम साधून घेतलंन! आणि आतां मला लांब लांब नीतीच्या गोष्टी सांगतो काय! तरी मीं त्याला पूर्वींच सांगितलें होतं कीं मला लबाडी आढळली तर माझ्या कामाला यायची नाहीं ह्मणून! पण मेल्या, मला थापा देऊन अखेरीस मला फसविलेंस काय ? **महाराजांनीं** तुझी तारीफ केली ह्मणून चढून गेलास वाटतं! कांहीं चिंता नाहीं. आतां तुझा शिरच्छेद करवीन त्याचवेळेस मीं स्वस्थबसेन. मेल्या, एकट्या माझ्या कृपेमुळेंच तर तूं अजूनपर्यंत वांचलास! नाहीं तर माझ्या **दादानें** किंवा **प्रधानजींनीं** तुझे केव्हांच तुकडे तुकडे करून टाकले असते ! बरं, आतां या राज्यांत तूं कसा टिकतोस किंवा इथून कसा पळून जातोस हें

पाहीनना मी आतां ! (इतक्यांत प्रधान आल्याचें दासीनें येऊन सांगितल्यावरून मनोविकार बंद ठेऊन स्वस्थ बसते. )

**प्रधान**—कसें काय **राणीसाहेब**, आज आळशावर गंगाशी लोटली! आज दोनमहिने आमची कुठे आठवण झाली नाहीं ती! कसे झालों तरी आह्मीं जुने खप्पी आहों. बरें पण आज मुद्दाम आमंत्रण कां पाठविलें होतें ?

**राणी**—( किंचित लाजल्या सारखें करून ) **प्रधानजी**, झाली गोष्ट ती झाली. मनानंच मेलं वेड घेतलंन त्याला काय करायचं! असो. पण आमचा **दादा** व **रामशास्त्री** तुह्मांस भेटले होते काय ?

**प्रधान**—नाहीं. तेही यावयाचे आहेत किंवा काय ?

**राणी**—तुह्मांला व त्यांना एकदमच बलावणं पाठविलं होतं. तुह्मीं आपल्या मनांत कांहीं एक नआणितां माझं एक काम केलं पाहिजे.

**प्रधान**—**राणीसाहेब**, आपलीं कामें आतां आमच्या हातून चांगलीं व्हावयाचीं नाहींत. ( नंतर मुद्दाम ) आपले खासगी दिवाणजी, ज्यांच्या योगानें आपण अगदीं दिवाण्या होऊन आह्मांस विसरलां होतां, ते **नानासाहेब** कोठें आहेत ? त्यांची कामकरण्याची शैली आम्हांला का यायची आहे!

**राणी**—**प्रधानजी**, आतां तुह्मीं त्या मेल्याचें नांव सुद्धां माझ्याशीं काढूं नका.

**प्रधान**—हां हां हां ! हें असें काय तुह्मीं बोलतां ?

**राणी**—( किंचित गालांत हसून ) **प्रधानजी**, पुरे आतां. त्या दुष्टाला तुमच्याच हातून शिक्षा द्यायची म्हणून तर तुह्मांस बलाविलं.

**प्रधान**—पुरेतर पुरे. आपलें समाधान झालें असलें ह्मणजे झालें.

**राणी**—( मोठ्या लाडांत येऊन ) किती वेळां मेलं सांगावं, तरी आपली थट्टाचना! त्या मेल्याचा शिरच्छेद झाला पाहिजे. तर आतां याला मीं एक युक्ति काढिली आहे. तुमचं मात्र साह्य असावं.

**प्रधान**—फार उत्तम आहे. आपण सांगाल तें करण्यास आम्हीं तयार आहों.

**राणी**—थोडया वेळांत **महाराज सरकार** इथ येतील त्यावेळीं मीं काय करणार आहें हें मीं तुम्हांस सांगत्यें. ( असें म्हणून त्यांच्या कानांत कांहीं सांगत्ये.)

**प्रधान**—( हसून ) कल्पना तर फार उत्तम आहे व ती आपली हटकून सिद्धीस जायचीच.

( इतक्यांत **दादा** व **रामशास्त्री** येतात. )

**राणी**—**दादा**, तूं आज आठ दिवसांत इकडे कुठं आला नाहींस तो ?

**दादा**—येऊन काय करावयाचें !

**राणी**—असेंरे काय **दादा** बोलतोस ?

**दादा**—तर काय बोलूं ! आतां कोठें जावें या विचारांत मीं निमग्न आहें, त्यामुळें मला कांहीं एक सुचत नाहीं.

**रामशास्त्री**—परवां दरबारांत आमच्या **दादासाहेबांचा** थोडा अपमान झाला आहे. व तो त्यांस सहन होत नसल्या-मुळें त्यांचें चित्त अगदीं स्थीर नाहीं. मीं भगीरथप्रयत्न करीत आहें—

**राणी**—मग **दादा**, तूं त्याबद्दल आपल्याला अगदीं वाईट वाटूं देऊं नको. मीं तोच विचार करीत आहें. **महाराज**

**सरकार** त्याच्यावर ( नानावर ) जरासे सुप्रसन्न असल्याचं दिसत. व त्यामुळंच विचार ! नाहीं तर काय—

**रामशास्त्री**—तीच तर मोठी हरकत आहे.

**राणी**—**प्रधानजी**, मीं तुह्मांस जें सांगितलं तें यांना सांगा हो.

( प्रधानजी त्याप्रमाणें सांगतात. )

**दादा**—**राणीसाहेब**, तुमची युक्ती मोठी उत्तम आहे.

( इतक्यांत महाराज आल्याचें दासीनें येऊन सांगतांच राणी एका कोंपऱ्यांत जमीनीवर जाऊन बसत्ये व दादा, प्रधान व शास्त्री तिची समजूत करीत बसतात. )

**राजा**—( राणी जमीनीवर रुसून बसली आहे व दादा वगैरे तिची समजूत करीत आहेत असें पाहून घाबरून ) **दादा-साहेब** राणीसाहेबांस काय झालें हो ?

**दादा**—आम्हीं त्यानां तेंच विचारीत आहों, परंतु त्या आमच्याशीं बोलत नाहींत.

**राजा**— **राणीसाहेब**, तुम्हीं अशा जमीनीवर काय बस-लां ? आधीं उठून ( बोटानें दाखवून ) या आपल्या बसावयाच्या जागीं येऊन बसा. ( अशा प्रकारें आग्रह करीत असतांही राणी उठत नाहीं असें पाहून प्रधानादि मंडळीस जरा बाहेर जावयास सांगून ते बाहेर गेल्यावर ) प्राणसखे, आज तूं कां बरें अशी रुसली आहेस ? तुला रुसावयास काय कारण झालें असेल तें मला सांग. मीं त्याचा आतांच्या आतां बंदोबस्त करतों. प्रिये, तुझ्या मर्जीबाहेर मीं जरा तरी जातों काय ? जें जें तूं सांगत आलीस तें तें मीं करीत आलों. असें असतां तूं आज कां बरं रागावलीस ! काय तें कारण मला सांग तर खरें. मग मीं त्याचा बंदोबस्त न केला तर—

**राणी**—( रागानें ) **महाराज**, मला तुम्हीं कांहीं विचारूं नका व मीं कांहीं सांगणार नाहीं. ( नंतर इकडे तिकडे पाहून आपल्याशींच ) दादा व **प्रधानजी** कुणीकडे गेले ?

**राजा**—मींच त्यांनां जरा बाहेर बसावयास सांगितलें आहे. तूं प्रथम मला कां रागावलीस तें सांग. ह्मणजे त्यांनां आंत बलावून आणितों.

**राणी**—"मला कांहीं विचारूं नका, नीं मीं कांहीं सांगणार नाहीं " ह्मणून सांगितलेंना.

**राजा**—प्राणसखे, असें कायबरें करतेस ! मला सांगून तर पहा.

**राणी**—सांगून काय उपयोग. तुमच्या हातून तें व्हायचें नाहीं नीं कांहीं नाहीं.

**राजा**—कायतें सांग तर खरें.

**राणी**—**महाराज**, तें कांहीं तुमच्या हातून व्हायचें नाहीं. यासाठीं तुह्मीं **प्रधानजीस** बलावून माझी निघण्याची तयारी करवा.

**राजा**—( घाबरून ) निघण्याची तयारी ह्मणजे!

**राणी**—तयारी ह्मणजे मला इथ एक घटका सुद्धां रहायचें नाहीं.

**राजा**—( दुःखीहोऊन ) प्राणसखे, तुझ्याशीं माझा विवाह झाल्या दिवसा पासून आजपर्यंत तुझ्या मनाविरुद्ध मीं एक दिवसही वागलों नाहीं. तुला दुःख होईल ह्मणून मीं आपलीं दुःखेंही सर्व विसरून गेलों. अमक्याला कामावरून दूर करावयाचा किंवा तमक्याला त्या कामावर नेमावयाचा असें तूं ह्मटलेंस तर त्या प्रमाणें मीं निमुटपणें करीत आलों. प्राणसखे, फार काय सांगूं! तुला जें दुःख व सुख, तेंच मला. एव्हढेंच खा



किंवा एव्हढेंच पाणी पी ह्मणून जर तूं सांगितलेंस, तर त्या प्रमाणें मीं वागत असतां तूं मजवर असें रागवावेंना !

राणी—महाराज, आपण माझ्या आज्ञेंत किती वागतां तें ठाऊक आहे. पण तुम्हीं माझ्या आज्ञेंत वागावें अशी मीं कोण !

राजा—प्राणसखे, कायहें! सर्वस्वी मीं तुझ्या आज्ञेंत वागत असतां तूं मला दोष देतेस तेव्हां हा मोठा चमत्कार आहे !

राणी—महाराज, मीं सांगितल्याप्रमाणें आपण वागताना ?

राजा—होहो, प्राणसखे, हें काय विचारावें! आजपर्यंत तुझ्या मनाविरुद्ध मीं कधीं वागलों, असें मला तर स्मरत नाहीं.

राणी—खरेंच आहे, आठवण कशास असेल! बरें पण दादाच्या लग्नाविषयीं मीं आपल्यास किती वेळां सांगितलें असेल बरें! या गोष्टीची तरी आठवण आहेना ?

राजा—( खालीं पहावयास लागून ) तें मीं विसरलों नाहीं.

राणी—विसरलां नाहीं, परंतु आपल्या हातून ती गोष्ट झाली मात्र नाहीं, एव्हढेंच.

राजा—पण प्रिये, त्याविषयीं मला अडथळा तूंचना केलास ?

राणी—ह्मणून कांहीं ती गोष्ट तुह्मीं करूं नयेना ! खरेंच आहे. दादा का राजपुत्र आहे! तो बिचारा रात्रंदिवस आपल्या राज्याचा बंदोबस्त करण्यांत गुंतून गेलेला असतो. आपल्यास थोडी सुद्धां तसदी देत नाहीं, या गोष्टी कांहीं—

चं का आपल्या मनांत येऊं नयेत. त्याला पहिल्यानं होयतरी ह्मणायचं नव्हतं! ह्मणून ह्मणत्यें कीं तुमच्या हातून तें कांहीं व्हायचं नाहीं. कारण दादावर जर तुमचा लोभ असता तर तुह्मीं परवां दरबारांत त्याला खालीं पहावयास लावलाच नसता. नाना तो काय, नीं लढाया मारून जिंकून येतो काय, नीं दादाची तो बरोबरी करतो काय! याविषयीं आपल्या मनांत कांहींचका येऊं नये? ह्मणून मीं व दादा हिराबागेंत जाऊन रहाणार.

**राजा**—आतां तुह्मांस अधिक बोलून राग आणावा यांत काय अर्थ आहे? दोन तीन दिवसांत जर मुहूर्त असेल तर दादासाहेबांच्या इच्छे प्रमाणें त्यांचें लग्न करून देतों, ह्मणजे झालेंना. आतां दरबारांत घडलेल्या गोष्टीविषयीं विचाराल तर त्यामुळें त्यांचें कोणत्याही प्रकारें मीं नुकसान केलें नाहीं किंवा करणार नाहीं. पुन्हा दरबार भरेल त्यावेळीं झालेल्या गोष्टीची दुरुस्ती करून घेईन. झालें आतां मनाप्रमाणें. आतां उठून आपल्या जाग्यावर बसा पाहूं? (असें ह्मणून राणीस उठवून योग्य स्थानीं बसवितो.)

**राणी**—( आनंदी होऊन ) महाराज, आपणांस माझा राग तर नाहींना आला?

**राजा**—प्राणसखे, तुजवर मीं कधींही रागावणार नाहीं. ( नंतर दरवाजाकडे वळून ) कोण आहेरे तिकडे?

**हुजऱ्या**—( आंतयेऊन ) जी सरकार.

**राजा**—दादासाहेब, प्रधानजी व शास्त्री यांस आंत यावयास सांग.

( हुजऱ्यानें त्याप्रमाणें करून ते आंत आल्यावर )

**दादा**—महाराज, माझी एक विनंती आहे.

राणी—सरकार, दादा रागावलेला आहे व कुठं दूर देशांतरीं जाण्याचा त्याचा बेत आहे. ह्मणून आपण त्याची विनंती मान्य करूं नये.

प्रधान—महाराज, मीं व शास्त्रीबुवानीं त्यांची अतीशय समजूत केली, परंतु ते ऐकतच नाहींत. यासाठीं सरकारास आमची विनंती आहे कीं त्यांस कोठेंही जाऊं देऊं नये.

राजा—दादासाहेब, तुम्हीं रागावलां काय ?

दादा—च्छेच्छे:, मला रागावण्याचें कारण काय ? मीं तो कोण व कशासाठीं रागावेन !

राणी—सकार, ऐकलेनां ? दादा रागावल्याचें मीं सांगितलें तें खरें कीं नाहीं ?

राजा—दादासाहेब, तुम्हीं कां रागावलां तें आमच्या लक्षांत आलें. आपल्या इच्छेप्रमाणें सर्व कांहीं लवकरच घडून येईल. तुम्हीं स्वस्थ असा. फार तर आठ चार दिवसांत, ह्मणजे झालें.

( नंतर राजा, राणी, प्रधान व शास्त्री यांनीं फार आग्रह केल्यावर दादासाहेबांची एकदांची समजूत झाली. )

( नंतर सर्व निघून जातात. )

---

## प्रवेश ४ था.

स्थल—राजवाड्यांतील एक दिवाणखाना.

पात्रें—राजा, न्यायाधीश, सेनापती व नाना.

राजा—कसें काय आचार्य ? आज तुम्हीं व सेनापती इकडे कुणीकडे ?

**न्यायाधीश—महाराज,** आम्हीं उभयतां आपल्या चरणापाशीं आलों आहों खरे, परंतु—

**राजा**— कां बरें ?

**न्यायाधीश**—( सेनापतीकडे पाहून ) **सेनापती** ?

**सेनापती**—सांगा की तुम्हीं. मला काय त्या मंदी समजतया.

**राजा—आचार्य,** काय तें बोला.

**न्यायाधीश—महाराज,** मला आज्ञा असावी व जें मीं बोलेन त्याची माफी असावी.

**राजा—आचार्य,** तुम्हांस आज्ञा आहे. जें काय असेल तें खुशाल बोला. तुम्हांस माफी आहे.

**न्यायाधीश—महाराज,** मीं निस्पृह असून सत्य-वक्ता आहें, व दिवसेंदिवस **महाराजांचा** उत्कर्ष व्हावा असें मनापासून इच्छिणारा आहें, हें **महाराजांस** विदित-च आहे. थोडया दिवसांपूर्वी **महाराजांस** सुचविलें होतें कीं, सात आठ वर्षां पूर्वींची आपली राजकारकीर्द व त्या नंतरची, यांत फार अंतर पडलें आहे. त्यावेळीं ज्याप्रमाणें आपली सर्व प्रजा सदा आनंदी असे त्याप्रमाणें ती सांप्रत नसून अत्यंत दुःखांत आहे. श्रीमंतापासून तों गरीबापर्यंत सर्व अगदीं त्रासून गेली आहे. प्रजाजन **महाराजांस** कांहीं कंटाळले नाहींत, परंतु आपल्या दरबारांतील दोन तीन असामीं पासून त्यांना इतकी पीडा होत आहे कीं, आपली मुक्तता करून घेण्यासाठीं ते काय करतील याचा अगदीं नियम राहिला नाहीं. **महा-राज,** मला तरी हें समजण्याचें कारण हें कीं मोठमो-ठाले सावकार व इतर सभ्यलोक मजकडे येऊन " आपल्या-

स आतां **दादासाहेब** व **रामशास्त्री**, यांचा त्रास सोसवत नाहीं." असें अनेक वेळां सांगत गेले त्यावरून समजलें. **महाराज**, काय सांगावें! भरदरबारांत ज्याज्या गोष्टी आजपर्यंत घडत आल्या त्या त्या आपणांस कशा सहन झाल्या याचें मलाच काय,आपल्या सर्व प्रजेस मोठें आश्चर्य वाटत आहे! त्या सर्व गोष्टी आपणांस विदित असल्यामुळें त्याची येथें द्विरुक्ती करण्याचें कारण नाहीं. परंतु आपल्यास आह्मां उभयतांची करद्वय जोडून येव्हढीच प्रार्थना आहे कीं **दादासाहेब**, **प्रधानजी** व **रामशास्त्री** यांच्या जाहागिरी, नेमणुका किंवा मानपान कांहीं एक कमी न करितां त्यांजकडे जे अधिकार आहेत ते मात्र, कायमचे नाहीं तरी; कांहीं दिवस काढून घ्यावे. व आपण राज्य कारभारांत पूर्वीं सारखें लक्षद्यावें. ह्मणजे राज्यांतील असंतोष व दुःखें नाहींशीं होऊन प्रजा आपल्यास दुवा देईल. आणि असें न झालें तर लोक हवालदिल होऊन दुःखानें अगदीं बेहोष व जिवावर उदार झाल्यामुळें काय परिणाम होईल हें मात्र माझ्यानें कांहीं सांगवत नाहीं.

**राजा**—( दुःखीहोऊन ) **आचार्य**, तुह्मीं येऊन आमच्या राज्यांत उत्पन्न झालेल्या असंतोषा विषयीं आह्मांस सांगितलें, हें फार चांगलें केलें. याबद्दल तुह्मांवर आमचा यत्किंचित्‌ही राग नाहीं. परंतु **आचार्य**, काय करावें! राज्यांत होत असणारा अन्याय आह्मीं पहातों; तो नव्हावा असें आमच्या मनांत येतें; परंतु काय उपयोग ! आमच्यानें त्याचा बंदोबस्त होत नाहीं, ही मोठी दुःखाची गोष्ट आहे! **आचार्य**, खरेंच विचाराल तर, आह्मीं द्वितीय विवाह करून सर्वस्वी फसलों! ( नंतर अधिक दुःखी होऊन ) आमचा सोन्या सारखा राजपुत्र गमावला, व आमची दरबारांत व

अन्यस्थळीं मानहानी होऊं लागली. फार काय ! तुह्मांला थोडक्यांत इतकेंच सांगतों कीं आह्मीं सांप्रत बुद्धीबळांतील राजे बनलों आहों. **दादासाहेबांस** प्रतिबंध करीन तर **राणीसाहेबांचा** राग होतो. **शास्त्रीबुवांस** दूर करीन किंवा **प्रधानजींस** थोडे ताळ्यावर आणीन तर **दादासाहेबांची** मर्जी जाते. सारांश आह्मीं असून नसून सारखे झालों आहों. अशा स्थितींतून परमेश्वर आमची केव्हां मुक्तता करील ती करो!

**न्यायाधीश—महाराज,** आपण सर्व जाणत असून असें ह्मणतां, तेव्हां आह्मीं पुढें काय बोलावें, हें आह्मांस सुचत नाहीं !

( इतक्यांत नानासाहेब येतात. )

**राजा—नानासाहेब,** शहरचा बंदोबस्त कसा काय आहे ?

**नाना—महाराज,** आपल्या आज्ञेप्रमाणें मीं अहोरात्र सर्व शहरभर स्वतः फिरत असतों. दंगा धोपा व चोऱ्या माऱ्या न व्हाव्या ह्मणून एकसारखा झटत आहें, परंतु—

**राजा—**“ परंतु ” काय ?

**नाना—महाराज,** राज्यांत जिकडे तिकडे असंतोष उत्पन्न झाल्या कारणानें मोठा दंगा अथवा बंड उत्पन्न होण्याचा रंग दिसत आहे. यासाठीं बंदोबस्ता करितां मला अधिक लोक हाता खालीं घेण्याचा हुकुम असावा.

**राजा—**( घाबरून ) हो हो, **नाना,** तुम्हांस हवे तितके लोक घेण्याची परवानगी आहे. परंतु बंड वगैरे न होण्याची मात्र नीट तजवीज ठेवा.

**नाना—**आज्ञा **महाराज.** ( असें ह्मणून निघून जातो. )

**राजा**—आचार्य, तुम्हीं सांगितलेली गोष्ट खरी आहे. यासाठीं तुमच्या हातून होईल ती तजवीज करून प्रजेंतील असंतोष नाहिंसा करा. आम्हींही तुम्हीं सुचविल्याप्रमाणें तजवीज ठेविनों. इतक्या उपर परमेश्वराची मर्जी !

( अशा प्रकारें कांहीं वेळ बोलणें झाल्या नंतर सर्व निघून जातात. )

---

## प्रवेश ५ वा.

**स्थल**—रस्ता.

**पात्रें**—नानासाहेब व फत्तेसिंग.

**नाना**—( मध्यरात्र झाली आहे, अशा वेळीं घोड्यावर बसून शहर रक्षणार्थ फिरत असतां आपल्याशींच ) आतां मात्र सोक्ष मोक्ष होण्याची वेळ नजिक आली खरी. परवां न्यायाधीश व सेनापती हे महाराजांकडे कशासाठीं गेले होते, हें मलाच समजलें असतें तर बरें झालें असतें. परंतु तें दादासाहेबादि मंडळीसही समजलें आहे. महाराज कोठें आहेत, काय करीत आहेत, कोणाशीं व काय बोलत आहेत, याविषयीं सर्व इथंभूत वर्तमान ती मंडळी काढूं लागली आहे.; व यामुळेंच बिचारे सेनापती व न्यायाधीश यांच्यावर त्यांचा मुख्यत्वें करून डोळा आहे. गरीब व अगदीं निरपराधी असें तें वृद्धद्वय आहे ! परंतु दादासाहेबांचा त्यांच्यावर पूर्वींपासून डोळा आहेच, त्यांत परवां पासून तर त्यांच्यावर अत्यंतच राग झालेला आहे. कांहीं तरी खुसपट काढून दादासाहेब हे वड्याचें तेल वांग्यावर खास काढतील. पण त्यांच्याचवरसें काय! मलाही साफ

उडवून देण्याचा त्यांचा कुठें इरादा नाहीं! आजपर्यंत **राणी-साहेबांचा** आश्रय होता, तोही आतां नाहीं! परंतु **राणीच्या** आपल्यावर केव्हां तरी राग होईल असें मला वाटतच होतें. कारण आत्मकार्या साठींच अनीतीनें वागण्याचें केवळ ढोंग करून इतके दिवस मीं येथें राहिलों. शेवटीं तिच्या मना विरुद्ध वागण्याची वेळ आलीच! परंतु एक प्रकारें तें बरेंच झालें, असें मीं समजतों. मला माझीं पूर्वींचीं कामें तर कर्तव्य आहेतच. आणि आतां या वृद्धद्वयाचेंही रक्षण केलेंच पाहिजे. परंतु माझी तरी येथें शाश्वती कोठें आहे! मींतर त्यांचा पहिल्या प्रतिचा शत्रु बनलों आहें. **राणी**नें तर माझा शिरच्छेद करण्याचा निश्चय केला आहे व तिला त्या दुष्टत्रयाचें पूर्ण साहाय्य आहे. असो, मीं तर सत्याचरणानें वागत आहें. त्यांत मला यशअपयश येणें परमेश्वराधीन आहे! ( असे विचार करीत चालले आहेत तों त्यांच्या पुढून दुसरा एक स्वार त्यांच्या नजिक आला. तेव्हां मोठ्यानें दरडावून ) कोण आहे ?

**स्वार**—तुह्मीं कोन आहे?

**नाना**—( रागानें ) मला विचारणार तूं कोण ?

**स्वार**—अमीं **दादासाहेबांचे** स्वार हय.

**नाना** —( बोलण्या वरून संशय येऊन ) **दादासाहेबांचे** स्वार ?

**स्वार**—होय.

**नाना**—तूं कोण आहेस तें लवकर सांग नाहीं तर बघ तुला ठार केलाच. ( असें म्हणून आपली तरवार बाहेर काढतात.)

**स्वार**—( आपली तरवार उपसून ) काय मला ठार करते ! हां ! ( असें म्हणून घोडयावरून खालीं उतरून ) **नानासाहेबांस** राम राम करतो. )

**नाना**—( आश्चर्यानें ) कोण तुम्हीं ? मीं ओळखलें नाहीं.

**स्वार**—मीं आपला **कन्हयालाल**.

**नाना**—( घोडयावरून खालीं उतरून अत्यंत आश्चर्यानें व आनंदानें त्यास प्रेमालिंगन देऊन ) **कन्हयालाल**, तुम्हीं **दादासाहेबांचे** स्वार !

**स्वार**—**नानासाहेब**, आपण घोडयावर बसावें. थोडा दूर जाऊन समदा सांगते.

**नाना**—( हंसून ) वाः, **कन्हयालाल**, तुम्हीं आमची भाषा केव्हां शिकलां ? (असें ह्मणून आपल्या घोडयावर बसले.)

( **कन्हयालाल** ही आपल्या घोडयावर बसून **नाना-साहेबांबरोबर** जातात. )

---

## प्रवेश ६ वा.

**स्थल**—राजवाडा.

**पात्रें**—**राजा**, **दादासाहेब**, **शास्त्री**, **नाना** व **फत्तेसिंग**.

**राजा**—( एकटा आपल्याशींच ) हे **प्रभो**, तूं माझी अशी उपेक्षा कां करीत आहेस! **देवाधिदेवा**, पूर्वजन्मीं मीं असा काय तुझा अपराध केला होता कीं सांप्रत मला एक पळही सुखाचें जाऊं नये! ( नंतर राणीला उद्देशून ) त्या **कैकयेनें** तर माझा जो छल मांडला आहे, व तिच्या योगानें माझा जो फजित वाडा झाला आहे, तो नुसता मनांत आला ह्मणजे असें वाटतें कीं कांहीं तरी युक्तीनें देहत्याग करावा! **आचार्य** सांगत होते तें सर्व खरें आहे. मीं नीतीपासून अगदींच परांगमुख झालों, यांत संशय नाहीं. **प्रभो**, या **दौलतरावानें** सर्वस्वी त्या दुष्टराणीच्या केवळ मुठींत रहावें काय! माझ्या सर्व राज्य-

भर व अन्य राजानांहीं माझा केव्हढा दरारा होता! अनिती तर या राज्यांत बिलकुलच नव्हती. परंतु सांप्रत मीं व माझें राज्य ह्मणजे अनीती, अन्याय, व झोटिंग पाच्छाई, यांचें माहेर घर झालें आहे! राणीला तर मीं दिवसें दिवस इतका भीऊं लागलों आहें कीं त्या प्रमाणें प्रत्यक्ष **यमाला**ही मीं तितका भिणार नाहीं. तिच्या मध्यें अशी काय विलक्षण शक्ती असेल ती असो ! पण मीं तिला पाहिलें कीं माझी सर्व शक्ती आपली गेलीच. व तिच्या मळेंच **दादासाहेबांचें** एव्हढें मोठें प्रस्त माजलें आहे! **दादा** हा अत्यंत अनीतीनें वागत आहे, हें मला समजत का नाहीं ? सर्व समजतें, परंतु मीं उमजत नाहीं. या मुळेंच राज्यांत ही बंडाळी चालली आहे. मीं ह्मणजे कोणीं नाहीं, असें **दादा** समजतो. व तें खरें आहे. मींच चांगला दृढ निश्चयाचा असतों, व बाईल बुद्धीनें वागलों नसतों, ह्मणजे असें कां झालें असतें! हे **नारायणा**, अशा प्रकारचा जो माझा दुर्लौकिक होत आहे त्या पेक्षां मला मरण येईल तर बरें! **प्रभो,** तुझी मजवर अवकृपाच झाली आहे हें खरें. नाहिंपेक्षां माझ्या राज्यांत असे अनन्वीत प्रकार घडलेच नसते. आज दोन दिवस माझ्या राज्यांत व या राजधानींत जे दंगे उत्पन्न झाले आहेत, तेच पहा! ते मोडण्यासाठीं सक्त प्रयत्न चालविले आहेत, परंतु ते मोडताहेत काय ? नाहीं. या साठीं हे **सच्चिदानंदा**, हे **जगन्नियंत्या**, हे **विश्वपालका**, मीं तुला अनन्य भावें करून शरण आलों आहें, मला या दुःखांतून सोडव

( इतक्यांत **दादा** व **फत्तेसिंग** मोठ्या लगबगीनें येतात. )

**दादा**—( मोठ्या घाईनें ) **महाराज**, आपल्या हुकुमा प्रमाणें सर्व दंगे मोडून त्याबद्दलची वर्दी द्यावयास मीं आलों आहें.

**राजा**—( आनंदानें ) **दादासाहेब**, शाबास, शाबास. परंतु आतां शहरांत कुठे दंगा धोपा मोडावयाचा राहिला नाहीं ना ?

**दादा**— नाहीं **महाराज**. आज दोनदिवस अहोरात्र एकसारखा झटत होतों ह्मणून तर जिकडे तिकडे इतकी लवकर स्वस्थता झाली. **महाराज** ( हातानें दाखवून ) हा **फत्तेसिंग** अत्यंत विश्वासू असून त्यानें मला फार सहाय्य केलें.

**राजा**—( फत्तेसिंग मुजरा करीत होता तो मोठ्या आनंदानें घेऊन. ) हां हां ! ( नंतर दादाकडे वळून ) बरें **दादा साहेब**, तुम्हीं फार थकले असाल, यासाठीं आतां स्वस्थ विश्रांती घ्या.

**दादा**— आज्ञा **सरकार**. ( असें म्हणून **फत्तेसिंगा**-सह निघून जातो. )

(इतक्यांत रामशास्त्री येतात. )

**राजा**—( उतावळेपणानें ) **शास्त्रीबुवा**, आमचे **दादासाहेब** विजयी होऊन आले, हें आनंदाचें वर्तमान तुम्हांस समजलें काय ?

**शास्त्री**—( मोठ्या आनंदानें ) फारच आनंदाची ही गोष्ट झाली. **दादासाहेब** म्हणजे लहान सहान योद्धा नव्हे !

**राजा**— खरें आहे, **शास्त्रीबुवा**. असो, पण जिकडे तिकडे शांतता झाली हें बरें झालें. आतां बंडखोरांस सावकाश शिक्षा करतां येईल.

( इतक्यांत राणी आल्याचें हुजऱ्या येऊन सांगतो. )

**शास्त्री**—( उठून उभा राहून व राणीस उद्देशून **आईसाहेबांची** स्वारी याच वेळीं येथें आली हें बरें झालें.

**राणी**—**कां शास्त्रीबुवा**, आज विशेष आनंद होण्यास काय कारण झालें ?

**राजा**—( आनंदानें ) आज **दादा साहेबांनीं** शहरांत उद्भवलेलें बंड मोडून जिकडे तिकडे शांतता केली, यामुळें आम्हांस मोठा आनंद झाला आहे.

**राणी**—**सरकार**, हें बंड त्या **नाना साहेबांनीं** मोडलें असेल! **दादाच्या** हातून तें काय व्हायचें आहे!

**राजा**—तुम्हीं असें मुद्दाम कां म्हणतां तें आम्हीं समजलों. परंतु खरेंच **दादासाहेबांनीं** तें मोडलें.

**राणी**—(मुद्दाम) असें होणार नाहीं. **दादा** का पराक्रमी आहे !

( इतक्यांत नाना साहेब मोठ्या घाईनें आल्याचें हुजऱ्या येऊन सांगतो. )

**राजा**—( किंचित रागानें) **नाना**, तुमचें आपलें वराती मागून घोडें असायचेंचना ? अहो, बंडाचा मोड करून स्वस्थता झाल्याचें **दादासाहेबांनीं** आम्हांस केव्हांच येऊन सांगितलें. आणि आतां पाठीमागून तुह्मी येतां काय ?

**नाना**—बंडाचा मोड झाल्या विषयीं **दादासाहेबांनीं** येऊन सांगितलें ! मोठें आश्चर्य आहे. या घटकेस तर सर्व शहरभर दंगे उत्पन्न झाले आहेत. आज प्रातःकाळ पासून हा वेळ पर्यंत मीं व माझ्या बराबरचे हत्यारबंद लोक बंदोबस्त करतां करतां अगदीं थकून गेलों आहों. हा वेळ पर्यंत आह्मीं कोणीं तोंडांत पाणी सुद्धां घातलें नाहीं. तें असो, पण मीं **महाराजांस** अशी वर्दी द्यावयास आलों आहे कीं, **श्रीविश्वेश्वराच्या** देवालयांत सुमारें दोन तीन हजार लोक जमले आहेत. त्यांचा बेत प्रथम राजवाड्यावर हल्ला करावयाचा आहे. ते सर्व

शस्त्रास्त्रासह तयार आहेत. त्यांच्यांतील एका दोघांस मार हाण केली, तेव्हां त्यांनीं सांगितलें कीं राजवाड्यावर हल्ला करून सर्वांस कैद करावयाचें असें आहे. परंतु त्यांच्या म्हणण्या प्रमाणें, महाराज, आपण कबूल केलेंत तर बरें, नाहीं तर —

राजा— (फार घाबरून ) नाना, शेवटीं या पंथाला गोष्ट आलीना! ठीक आहे. हे आम्ही तयार आहों.

नाना— महाराज, बंडखोरांस अशा प्रकारें हार जावयाचें नाहीं. महाराज, थोड्या सैन्यासह आपण जर स्वतः याल तर हें बंड तावडतोब मोडेल, अशी माझी खात्री आहे.

राजा—( फार भिऊन ) चला, तुम्ही सैन्याची तयारी करा. आम्ही स्वतः येतों. काय चमत्कार! दादा बंड मोडल्याचें सांगतात. नाना सांगतात तें दुणावत चाललें आहे म्हणून!

राणी—( मोठ्या लाडानें ) सरकार, आपण युद्धास स्वतः जायचें तर हाता खालीं स्वार, पायदळ, सेनापती, प्रधान वगैरे मग कशास पाहिजेत ! आपण कांहीं जायचं नाहीं.

राजा—आमच्या हाताखालीं छपन्न कोटी यादव आहेत, परंतु एक तरी उपयोगाचा आहे काय ?

राणी—तें कांहीं असो, मी कांहीं आपल्यास जाऊं द्यायची नाहीं. मला भय वाटतें. ( असें म्हणून राजाच्या झग्याचें टोंक हातांत धरते. )

राजा—राणीसाहेब, हें सर्व, बंड मोडल्या नंतर.

राणी—पण शहरांत जिकडे तिकडे बंड उत्पन्न झालें आहे. बंडवाले राजवाड्यावर येणार आहेत, आपण बंडवाल्यांवर जातों म्हणतां, तर मी एकटी कशी बरें राहूं ?

राजा—आम्हीं गेल्यावर बंडवाल्याना इकडे येऊं देणार

नाहीं. शिवाय येथें चांगला बंदोबस्त ठेवतां येईल. ( **असें** म्हणून शास्त्रीबुवांकडे वळून ) **शास्त्रीबुवा**, तुम्हीं व **दादासाहेब** येथें राहून राजवाड्याचें, **राणीसाहेबांचें** व **राजपुत्रांचें** वगैरे उत्तम प्रकारें संरक्षण करा. एक दोन पलटणें येथें बंदोबस्ता करितां आणून दोन **हिराबागेंत ताईसाहेबांच्या** संरक्षणार्थ पाठवा.

**राणी**—( फार लाडानें व भिऊन गेल्यासारखें दर्शवून ) **महाराज**, मीं कांहीं आपल्यास जाऊं देणार नाहीं.

**राजा**—( रागानें ) या तुमच्या बुद्धीला लागून तर ही आमची स्थिती झाली. नाहीं पेक्षां या **दौलतरावाच्या** राज्यांत असे अन्याय व बंडे उत्पन्न व्हावीं काय ! **राणीसाहेब**, आपण आतां आमच्या कारभारांत अगदीं हात घालूं नये. या तुमच्या व **दादासाहेबांच्या**, त्याच प्रमाणें ( बोटानें दाखवून ) या **शास्त्रीबुवांच्या** ढवळाढवळीनें तर आमचा एवढा दुर्लौकिक झाला आहे. असो, आम्हीं आतां जातों.

**राणी**—( अत्यंत रागानें ) **महाराज**, असें काय ! ( असें ह्मणून पाय आपटीत निघून जाते. )

**राजा**—**नाना**, चला. ( नंतर शास्त्रीबुवांकडे वळून ) **शास्त्रीबुवा**, आम्हीं सांगितल्या प्रमाणें येथें व **हिराबागेंत** बंदोबस्त ठेवा, नाहीं तर—

**नाना**—**महाराज**, आपल्या वृद्ध **सेनापतीस** बरोबर घ्यावें हें बरें असें मला वाटतें.

**राजा**—ठीक आहे.

( असें ह्मणून सर्व जातात. )

---

## अंक ८ वा.

### प्रवेश १ ला.

**स्थल**—राजवाडा.

**पात्रं**-राणी, दादा, प्रधान, रामशास्त्री व हुजऱ्या

**रामशास्त्री**—कां **दादासाहेब**, आतां पुढें कसें करा यचें ?

**दादा**—शास्त्रीबुवा, तुह्मीं ह्मणतां या प्रमाणें स्थिती झाली आहे खरी ! **महाराज** आज दोन दिवस थोडेसे वेडावल्या सारखे दिसतात व हें खरें कीं दोन दिवसांत, **राणी साहेबांशीं**, किंवा मजपाशीं, ते एक शब्दही बोलले नाहींत. आह्मीं उभयतांनीं त्यांना खुष करण्या विषयीं बहुत प्रयत्न केले. परंतु ते धड खुषींत आहेत असेंही दिसत नाहीं, किंवा रागावलेले आहेत असेंही दिसत नाहीं. आमच्याच लोकांकडून आम्हीं लहानसें बंड उत्पन्न करविलें. तें अशासाठीं कीं तें आपणच मोडून टाकावें व महाराजांची आपल्यावर झालेली अवकृपा दूरकरून घ्यावी. परंतु त्या कामांत आपण फसलों. कारण आपण बंड उत्पन्न केलें या मुळें शहरांत आमच्यावर धुमसत असलेला कोपाग्नीं भडकून जाउन तो आतां इतक्या पंथास आला आहे कीं स्वतः **महाराज** सैन्यासह तो शांत करीत आहेत तरी त्यांच्यानें तो शांत होत नाहीं. त्या **नाना**ची तर अशी त्रेधा उडून गेली आहे कीं त्याला एकपळभर ही विश्रांती नाहीं. शिवाय या धामधुमींत तो खचीत प्राणास मुकेल अशी आमची पक्की खात्री आहे. कारण आपला फत्तेसिंग त्याच्या पाठीवर आहेच. आतां आपले हेतु लवकरच सिद्धीस जातील तर बरें. कारण तसें करण्यास ही संधी फार उत्तम आहे. या साठीं तुह्मीं आतां त्वरा करा.

**रामशास्त्री**—**दादासाहेब**, आतां अशी कांहीं युक्ती काढली पाहिजे कीं आपले कार्यभाग तर व्हावे परंतु आपल्यावर तोहमत येऊं नये. एक युक्ती मला सुचली आहे, परंतु ती कशी बोलावी! मला आपले तुह्मींच **महाराज.** तुमचा जयजयकार करण्यासाठीं पाहिजे तें करावें—फार काय, वेळ आल्यास एखाद्याचा खूनही करावा, असें आपलें माझ्या मनांत येतें. माझे आपले पूर्वजन्मार्जित काय लागे बांधे असतील ते असो त! सर्वस्वी तुमच्याच कार्यार्थ प्रसंगीं प्राणही अर्पण करण्याची वेळ आली तरीही मी आपला तयार आहें.

**दादा**—( मोठा आनंदी होऊन ) **शास्त्रीबुवा**, तुह्मांस काय युक्ती सुचली आहे ती सांगा पाहूं? परंतु कशास सांगतां? तिची आपली योजनाच करा ह्मणजे झालें. तुम्हीं आमचें कधींही अनहित करणार नाहीं, ही आमची खात्री आहे.

**रामशास्त्री**—**दादासाहेब**, आपला जर मजवर विश्वास असेल तर ती युक्ती लढवून मी पहातों. आपला **फत्ते सिंग** मात्र मजला द्यावा. ती युक्ती कोणती ह्मणाल तर—( असें ह्मणून त्यांच्या कानांत सांगतो. )

**दादा**—( आंगावर रोमांच उभे राहून कांहीं वेळ स्वस्थ बसून व मोठ्यानें उसासा टाकून ) पहा बोवा तुमचें तुम्हीं ! आमची कांहीं ना नाहीं, परंतु—

( इतक्यांत प्रधानजी येतात. )

**रामशास्त्री**—कसें काय **प्रधानजी** ?

**प्रधान**— कसें काय, काय? आम्हीं बुवा आतां आपल्या हातांत बांगड्या भरल्या आहेत. जें काय होईल तें पहावें, ह्मणजे झालें !

**दादा**—प्रधानजी, तुम्हीं सुद्धां हात पाय गाळलेत ना !

**प्रधान**—तर आम्हीं काय करावें **दादासाहेब** ! महाराजांची वृत्ती कशी झाली आहे, हें आपण जाणतच आहां.

**दादा**—प्रधानजी, आमच्या **शास्त्रीबुवानीं** एक मोठी नामीं युक्ती काढिली आहे. त्या कामीं आम्हांस तुमचें मात्र पूर्ण साहाय्य असावें.

**प्रधान**—कांहीं करा, परंतु आम्हां सर्वांस सांप्रतच्या शोचनीय स्थितींतून लवकर मुक्त करा, म्हणजे झालें.

( इतक्यांत राणीसाहेब येतात. )

**दादा**—**शास्त्रीबुवा**, आतां **राणीसाहेब** आल्या आहेत. यासाठीं आह्मीं आतां काय करावें हें त्याच सांगतील.

**राणी**—**दादा**, तुम्हीं काय विचार करीत बसलां आहां ? तुम्हां सर्वांचीं मुखकमलें अगदीं म्लान कां बरें झालीं आहेत ?

**प्रधान**—आम्हीं सांप्रत कोणत्या स्थितींत आहों हें आपणांस सांगावयास पाहिजे असें नाहीं. आह्मीं असून नसल्या सारखे आहों.

**राणी**—**प्रधानजी**, तुह्मीं, **दादा**, व **शास्त्रीबुवा** असे घाबरतां कां ? तुह्मांतून कोणा एकाच्याही केसाला इजा झाली तर मला विचारा.

**दादा**—**राणीसाहेब** तें खरें. परंतु आह्मांस आमच्या सांप्रतच्या स्थिती विषयीं मोठें दुःख होत आहे. यांतून आपली लवकर मुक्तता व्हावी म्हणून आह्मीं विचार करीत आहों. आपली जर मान्यता असेल तर एखादी तोड काढून या दुःख दायक स्थितींतून आह्मीं लवकर मुक्त होऊं. नाहीं तर —

**राणी**—**दादा**, मलारे त्यांत काय समजतें. तूं का परकी

आहेस ? तुला जें योग्य दिसेल तें तूं कर. ( इतक्यांत राजवाड्यावर दगड येऊं लागलेले पाहून व घाबरून ) दादा, हे दगड रे कोठून येत आहेत ?

दादा—( अत्यंत रागानें ) कोण आहेरे तिकडे ?

कुजऱ्या—जी, सरकार.

( इतक्यांत अधिकच दगड येऊं लागले व राजवाड्यापुढें बंडवाले आलेले पाहून दादा व शास्त्री बंदोबस्त करण्यास लगबगीनें निघून जातात. )

---

## प्रवेश २ रा.

स्थल—कालिकादेवीचें देवालय.

पात्रें—राणी, ताई, जमनाबाई, रामशास्त्री, फत्तेसिंग, व कृष्णंभट पुजारी वगैरे.

रामशास्त्री—कां भटजी, सांगितलेलें सर्व लक्षांत आहेना? येथें जें काय घडेल त्या विषयीं एक शब्द जर बाहेर फुटला तर संभाळा बरें.

भटजी—नाहीं महाराज, मीं एक शब्दही कोणापाशीं बोलणार नाहीं. परंतु—( असें ह्मणून आपला उजवा हात पुढें करतो )

फत्तेसिंग—वाः, भटजी, वाः, तुमचा आपला हात पुढें, आं!

रामशास्त्री—( फत्तेसिंगास उद्देशून ) अहो, तुह्मांस माहित नाहींना कीं " नवरा मरो नवरी मरो, भटाची आपली दक्षणा ताजी " ?

भटजी—खरें आहे, महाराज. आह्मांस काय! कोणीं

कांहींका करीना, आमची आपली चांगली संभावना झाली ह्मणजे झालें. ( असें ह्मणून आनंदानें तपकीर ओढतो. )

**रामशास्त्री**—फत्तेसिंग, आंत सर्व तयारी आहेना ?

**फत्तेसिंग**—होय.

( इतक्यांत मोठ्या थाटानें व लव्याजम्यासह राणी, ताई, व जमनाबाई मेण्यांतून येतात. )

**भटजी**—( मोठ्या लगबगीनें तोंडानें कांहीं ह्मणत ) **राणीसाहेबांचा** जयजयकार असो. **आईसाहेब**, देवी पुढील गाभाऱ्यांत पूजेची सर्व तयारी करून ठेविली आहे. जशी आज्ञा होईल त्या प्रमाणें.

**राणी**—बरें आहे **भटजी**, चला. ( नंतर शास्त्रीबुवांकडे वळून ) **शास्त्रीबुवा**, तुह्मीं इकडे कुणीकडे ?

**रामशास्त्री**— **आईसाहेब**, आपली स्वारी आज दर्शनास येणार ह्मणून बंदोबस्त ठेवण्यासाठीं **दादासाहेबांनीं** मला इकडे पाठविलें.

( नंतर राणीनें आंत जाऊन देवीची यथासांग पूजा करून दर्शन घेऊन बाहेर आल्यावर )

**भटजी**—**ताईसाहेब**, आतां पूजा करावयास आपण चलावें ?

( ताईसाहेबांनींही यथासांग पूजा करून दर्शन घेऊन परत आल्यावर )

**राणी**—( जमनाबाईकडे बोटकरून ) **भटजी**—आतां यांना घेऊन जा.

**भटजी**—आज्ञा **आईसाहेब**. ( असें ह्मणून शास्त्रीबुवांकडे एकसारखा पाहूं लागला. )

**रामशास्त्री** — ( रुपयांनीं भरलेली एक थैली भटजीस देऊन ) भटजी, आतां लवकर आटपा.

**भटजी**— ( थैली हातांत चांगली घट्ट धरून ) आज्ञा **महाराज**. ( असें ह्मणून **फत्तेसिंगा**कडे पाहूं लागला. )

**फत्तेसिंग**—**भटजी**, असा पहात काय उभा राहिला ? पूजेचा सामान सरला काय ?

**भटजी**— ( किंचित घाबरल्या सारखें करून ) हां हां, होय.

**फत्तेसिंग**—( रागानें ) तर मग उभा राहून असा काय करते. लवकर जाऊन घेऊन या. ( असें ह्मणून नेत्रानें कांहीं खूण करतो. )

**भटजी**--( शास्त्रीबुवांस उद्देशून ) **महाराज**, हा मीं आलोंच. ( असें ह्मणून धांवत जातो. )

**राणी**—**शास्त्रीबुवा**, **भटजीबुवा** असे धांवत कुठे गेले ? ( जमनाबाईकडे बोट करून ) यांना दर्शन घ्यायचें आहे ना ?

**रामशास्त्री**—**भटजी** कांहीं विसरले आहेत तें आणावयास गेले आहेतसें वाटतें. आतां येतील.

( इतक्यांत धांवत धांवत परत येऊन )

**भटजी**—( जमनाबाईस उद्देशून ) **बाईसाहेब**, दर्शनास चलावें.

**जमनाबाई**—चलावं, **भटजीमहाराज**.

**भटजी**—( आंतगेल्यावर ) हां बाइसाहेब, हात जोडा.

**जमनाबाई**— ( देवी पुढें मोठ्या लीनतेनें हस्त जोडून व मोठ्याभक्तीनें उभ्या आहेत व **भटजी** तोंडानें कांहीं

मंत्रोच्चार करीत आहेत तों एकाएकीं मोठ्यानें ) अगाई ! असें ह्मणत एकाएकीं खालीं गेल्या. )

## प्रवेश ३ रा.

**स्थल**—नगरा बाहेरील तलाव.

**पात्रें**—**रामशास्त्री** व त्यांचा नोकर.

**रामशास्त्री**—( तलावाच्या एका पायरीवर गालीचा टाकून हवा खात बसले असतां एकटेच आपल्याशीं ) काय करावं, माझ्या सारखींच जर सर्व असतीं तर मीं आज **ब्रह्म-देवा** प्रमाणें प्रतिसृष्टीही उत्पन्न केली असती, व मग कालचा बेत असा उडाला असता काय ! पण काय करावें ! मीं पडलों एकटा. असो पण **दादासाहेबांचा** कार्यभाग झाला, हें बरें झालें ! आतां माझा डाव साधला नाहीं हें वाईट झालें ! असो, पण माझी पिशवी तर भरलीना ! मग कांहींका होईना ! आतां एक फारच महत्वाची गोष्ट उदईक करावयाची आहे. ती मात्र जरका फसली तर आपलें ( आप-ल्या मस्तकाकडे बोटकरून ) हें उडालेंच. आतां असें नाहीं करावयाचें. जीं ह्मणून आपल्या जिवास जीव देणारीं मनुष्यें असतील त्यांसच बराबर घ्यायचीं. **दादासाहेब** तर आपले हवेतच, कारण उद्यांचा प्रसंगच तसा आहे. आणखीं कोण बरें घ्यावें ! ( आठवण केल्यासारखें करून ) हो, आठवलें. **फत्ते-सिंग** व आपला **राम्या**, हेही पाहिजेतच. आणखीं कोणीं नको. हे आपण सर्व व ते दोघे, इतके बस्स. ठरल्या प्रमाणें राणी साहे-बांकडून पहिला भाग उत्तम प्रकारें उठला कीं पुढील काम फत्ते झालेंच. अरे पण मी वेडा तर नाहींना! त्यावेळीं तेथें **प्रधानजो**

पाहिजेत. असो, त्यानां घेतां येईल. परंतु असें समजा कीं बेत फसला. तर काय करावयाचें? अं:, तो फसो किंवा सिद्धीस जावो! आपली तुंबडी भरली पाहिजे. मग याला युक्ती काय बरें करावी? (नंतर आपल्याला तुच्छ मानून) हा वेडया! एव्हढें तुला समजत नाहींना! (नंतर आपल्याला उद्देशून) अरे शहाण्या, उदईक प्रातःकाळीं कांहीं तरी बाहाणा करून पांच दहा लाख **दादासाहेबांच्या** हुकमानें खजिन्यांतून घे. नीं काय! लोक "पाछी बूध बामनिया." असें ह्मणतातना! पण लेको ह्या आतां "पहिली बूध बामनीया." उघडच आहे. "**राजा** मेला किंवा **राणी** मेली" ह्मणून मला का सुतक यायचें आहे! (नंतर मोठया फुशारकीनें) शाबास, **शास्त्री**बुवा, शाबास. तूं आतां आपला पांच पंचवीस लाखांचा धनी झालासना! शाबास. अरे तूं उद्यां एव्हढें दाबावयास अगदीं भिऊं नको. अरे, मी एव्हढा जो आनंदांत पोहतों आहें, तो उद्यांचा बेत फसला ह्मणजे माझें काय होईल! याचा कांहीं विचार केलास काय? (पनः फुशारकीनें) हो हो, विचार केला ह्मणजे काय! आपण कुठे फसणार कीं काय! आलीच तशी वेळ तर सांगून देऊं कीं "आपण आपले भटभाई. श्राद्धपक्ष झोडणें किंवा "जे आहे ते कालाच्या ठायीं सूत शौनकादिकांप्रत सांगते झाले," असें सांगण्यांत मोठे हुशार. आपल्याला या भानगडींत काय समजतें! "सर्व कांहीं त्या **राजश्रींनीं** केलें" असें सांगून, देऊं **दादासाहेबांना** तोंडघशीं, नीं काय? (नंतर हुजऱ्याकडे वळून) कायरे **गम्या,** तुला सांगितल्या प्रमाणें उद्यांचा बेत उडवायचाना? बघ गुलामा फसवशील तर! आणि काम झाल्यावर मग तुला कबूल केल्या

प्रमाणें दरमाहा पांच रुपये- ऐकलेंस का-पांच रुपये बरें ! आणि शिवाय घरांत जेवण मिळेल.

**राम्या**—( किंचित गालांत हंसून ) जी **साब**, तुम्हीं अक्शी भीऊं नगा. उद्यांची येळ कवा येईल, आन ही ( बर्ची दाखवून ) कवा हुरांत खुपशीन, असें मला झालेया. पन त्ये दोघे हयती क न्हई ?

**रामशास्त्री**—होहो, ते आहेत तर. ( असें ह्मणून आंगरखा पागोटें काढून व हात पाय धुवून ) **राम्या**, मीं आतां **श्रीदत्तमहाराजांचें** दर्शन घेऊन येतों. तूं इथून हलूं नको बरें. आमचा आंगरखा, पागोटें व तो गालीचा, इथ आहेत.

**राम्या**—जी, **सरकार**.

**रामशास्त्री**—बरें तर मीं जातों. ( असें ह्मणून देवदर्शनास जात आहे तों पांच सहा शिपाई नग्न तरवारी हातांत घेऊन त्याच्या आंगावर येऊन पडले. तेव्हां अत्यंत भीऊन व लटलटा कांपावयास लागून बोबडी वळून गेल्या मुळें रे, रे, मीं, मीं, मीं नाहीं. मीं नाहीं—

( तव्हां त्या शिपायां पैकीं एक )

**शिपाई**--( आपल्या नाकावर बोट ठेवून ) खबरदार, हूं कीं चूं केलेंस तर. ( असें ह्मणून शास्त्रीबुवांच्या मुसक्या बांधून त्यास घेऊन गेले. )

---

## प्रवेश ४ था.

**स्थल**—राजमहाल.

**पात्रें— राजा, राणी, ग्यान्या व सरवामारेकरी, दादासाहेब, शास्त्रीबुवा, फत्तेसिंग व राम्या.**

**ग्यान्या**—( राजवाड्याच्या चोर दरवाज्याजवळ येऊन

हळुच ) आर ए सटठ्या, आपून तर हंथं कबूल केल्यापरमाणें आलों. पन पुढ र काय करायचें ?

**सटवा**— (चोर दरवाज्याकडे बोट करून) आर ल्येका, ह्योच का चोर दरवाजा ?

**ग्यान्या**—( नीट न्याहाळून पाहून ) ह्योच र ह्योच. पन ल्येका आंत र कसें जायचें ?

( इतक्यांत **रामा** दरवाजा उघडतो व त्यांस वरील मजल्यावर घेऊन जातो. )

**राम्या**— ( त्या काळ्या लठ्ठ व क्रूर मारेकऱ्यां बराबर जात असतां त्यांच्या आरक्त नेत्रांकडे पाहून व त्यांचा हेतू मनांत आणून किंचित् घाबरून ) कां रे, तुह्मीं हात हालवीत आलां जणूं ?

**ग्यान्या**—**रामबापाटील**, हात हालवीत कां ह्मणून येऊं ! हें पाहिलें काय ? ( असें ह्मणून आपली हत्यारें दाखवितो. )

**सटवा**— हीं बघाकी राव ? ( असें म्हणून हत्यारें दाखवितो. )

**राम्या**—तुह्मांस्नीं अदुगर **दादासाहेबांकडे** न्हेऊंकी— ( असें ह्मणून नेत्रानें व मानेनें कांहीं खूण करितो, )

**ग्यान्या**— ( तो खुणासमजून ) अगुदर **दादासाबा-** स्नीं राम राम करूंन मग त्ये काम.

**सटवा**— (हळूच कानाशीं लागून ) दादा अदुगर मागून घीय्या बरका ? हें काम झाल्यावर देणार काय !

**ग्यान्या**—खरंच र ल्येका खरंच. अदुगरच मागून घेऊं. न्हाईतर सांगूं ' ह्ये आपुन चाल्लों बगा' !

**राम्या**—( ज्या दिवाणखान्यांत **दादासाहेब** वगैरे

होते त्याच्या बाहेर येऊन ) **दादासाब** हते बसल्याती. ( **असें** सांगून त्यांस आंत जाण्याची खुणा करितो. )

(ते आंत जाऊन **दादासाहेब** व **शास्त्री** यांस राम राम करून दूर उभे रहातात. )

**दादा**—( त्या प्रत्यक्ष यमदूतांस पाहून घाबरून ) **शास्त्री बुवा**, हं ?

**शास्त्री**—( मारेकऱ्यांस ) आतां किती बरें रात्र झाली असावी ?

**ग्यान्या**—मध्यान उलटली की, रावसाब.

**शास्त्री**—बरें तुह्मीं आतां, तें कुणी पाहिलें तर नाहींना ?

**सटवा**—आमाह्मीं व्हय ? न्हाईंकी कुणी पाहिलें.

**शास्त्री**—बरें आहे. तुह्मांला सांगितलेलें लक्षांत आहेना ? नीट संभाळा. आणि तुह्मांला कोणीं केव्हांही विचारिलें तरी **साफ** नाहीं ह्मणून सांगा. आह्मीं आहोंच.

**ग्यान्या**—सरकार, आपुन आहां, तर मग **आमाह्मीं** काय भय आहे ?

**शास्त्री**—**फत्तेसिंग**, तुह्मीं व **राम्या** यांच्याबरोबर **जा.** परंतु ( **राम्यास** उद्देशून ) अरे, तूं आधीं सर्व वाडयांत फिरून जिकडे तिकडे सामसूम आहे किंवा नाहीं, तें पाहून ये? त्याच प्रमाणें **राणासाहेब** व **महाराज** यांस आपापल्या महालांत झोंप लागली आहे किंवा नाहीं तें पाहून ये.

**दादा**—**फत्तेसिंग** तुह्मीं बराबर जा व काम होतांच **त्या** दुसऱ्या कामास एकदम जा बरें ? नाहीं तर सर्व बेत फसून जाईल व उलट आपल्या मानेला मात्र फांस लागेल.

**फत्तेसिंग**-- आज्ञा महाराज. तुम्हीं अगदीं बेफि—कीर रहा. आजचें आपलें काम झालें ह्मणून समजा, **व**

ठरल्या प्रमाणें उद्यां सकाळीं शिरच्छेदाचेंहो करून टाका म्हणजे झालें.

**राम्या**—( परत येऊन शास्त्रीबुवास उद्देशून ) **राव साहेब, महाराज सरकार** अन् **राणीसाब** अशी गाढ निजल्याती. वाडयांतबी समदीकडे सामसूम हाय.

**दादा**—शास्त्रीबुवा, मग यांनां आतां जाऊंद्या. उगाच वेळ होतो.

**शास्त्रीबुवा**—( मारेकऱ्यांस उद्देशून ) तुम्हीं शपथ घेतलेली नीट लक्षांत असूंद्या. वावरूं नका. **आमचे फत्तेसिंग** व **राम्या** हे तुम्हांस राजमहालांत नेतील. व पाहिजे ती मदत करतील. आतां जा लवकर. आह्मीं तुमच्या रक्षणार्थ काम होतें आहे तों पाठोपाठ आलोंच.

**ग्यान्या**—जी **सरकार**—( असें ह्मणून सटव्याकडे पहात रहातो. )

**सटव्या**—तुह्मीं इचारा की दादा.

**शास्त्रीबुवा**—कायरे, काय ?

**ग्यान्या**—न्हाईं ह्मटलं आपलं आमचँ इनाम.

**शास्त्रीबुवा**— हां हां, समजलों. हीं घ्या. ( असें ह्मणून दोन मोठीं सोन्याचीं कडीं व मोठाल्या दोन कंठया त्यांना देऊन ) कामकरून आल्यावर ( बोटान दाखऊन) या जवाहिराच्या थैल्या तुह्मांस देईन.

( मारेकऱ्यांनीं कडीं व कंठया घेऊन तेथेंच आपल्या हातांत व गळयांत घालून **फत्तेसिंग** व **राम्या** यांसह ते बाहेर आले. नंतर त्यांनीं ( मारेकऱ्यांनीं ) चार पांच गांज्याच्या चिलमी ओढून **महाराज सरकार** ज्या महालांत निद्रिस्थ होते तेथें ते पाऊल न वाजवितां आले. तव्हां. )

**फत्तेसिंग**—( अगदीं हळूच ) आतां आह्मीं ( बोटानें दाखवून ) त्या दरवाज्या बाहेर जरा जातों. तुमचें काम झालें किं आह्मांस हांक मारा, नाहीं तर आम्हींच येऊं.

( असें म्हणून ते बाहेर जातात. )

**ग्यान्या**—( **महारज** गाढ निद्रिस्त पाहून व जरा घाबरून अगदीं हळू ) **सटव्या**, हे **महाराज सरकार** आपले मा बाप आन इष्णूचा अवतार, आन यास्नीं कसें मारावें र ?

**सटवा**—जा र मर्दा, शास्तर उंद्या ( नंतर. ) दादासाब तुमीं भ्यालां जणूं ?

**ग्यान्या**—( भीती न दाखवावी झणून मोठ्या ऐटीनें ) अरल्येका, मी मी, मी कार भितों? जा रे. पन ( राजाकडे बोट-करून ) ल्येका, याह्मीं मारायचं? भाकरी बी न्हई र मिळणार !

**सटवा**—( रागावून ) जा र नामर्दा ! कशाला मांग झालास ! भित्रा बामन बिमन झाला असतास तर बरं र झालं असतं. चल उतर तें कडें नीं कंठी, नीं हो चालता इथून ?

**ग्यान्या**—( रागानें व दागिनें जातील या भीतीनें ) बरंबरं. काय ल्येकाचा शूर तो म्हाईत आहे ?

**सटवा**—मग कशापाई आण खावी ?

**ग्यान्या**—चलचल चल; लई बोलास. चला आतां उरकू-न टाकूया ?

( असें झणून दोघे पलंगा नजिक गेले. **ग्यान्या**नें हळूच **महाराजां**चें तोंड उघडून त्यांत एक पांढरा रुमाल घातला व पलंगावर चढून **महाराजांच्या** उशाशीं बसून एक हात त्यां-च्या तोंडावर व दुसऱ्या हातांत **महाराजां**चा हात घट्ट धरून **सटव्यास** खूण केली. )

( **सटव्यानें** आपल्या डाव्या हातांत **महाराजांचा** एक हात घट्ट धरून उजव्या हातांत बर्ची घेऊन **ग्यान्यास** सावध राहण्या विषयीं सांगून बर्ची **महाराजांच्या** उरांत भोंसकण्यासाठीं आपला हात मोठ्या जोरानें वर केला. )

( इतक्यांत )

**एकमनुष्य**—( पलंगाजवळचा दरवाजा एकदम उघडून एकाएकीं आंत येउन मोठ्यानें ओरडून ) **महाराज, महाराज**, उठा, उठा, खून, खून, **महाराज**, उठा. ( असें ह्मणून **सटव्यानें** जो हात वर केला होता तो धरून त्यास खालीं पाडला व त्याचीच बर्ची घेऊन त्याच्या उरांत मोठ्या जोरानें खुपसली. )

( तो तर तात्काळ ठार झालाच. परंतु ओरडा आरडी मुळें **महाराज** घाबरून उठले व आपल्या तोंडातील बोळा काढून नोकरांस हांका मारूं लागले. )

( **ग्यान्या, फत्तेसिंग** व **राम्या** यांनीं पलायन केलें. )

( इतक्यांत सर्व वाड्यांत गडबड उडून तेथें सर्व जमा झाले. **दादा** व **शास्त्री, फत्तेसिंग, फत्तेसिंग, राम्या, राम्या**, अशा हाका मारीत धांवत धांवत आले. )

**दादा**—( सर्वांचें **महाराजांकडे** लक्ष आहे असें पाहून **सटव्याच्या** प्रेतावर बसून ) **गुलामा, चांडाळा, महाराजांचा** खून करावयास आला होतास काय ? हें घे. (असें ह्मणून त्याच्या उरांत शिरलेल्या बर्चीची मूठ हातांत धरली व इकडे तिकडे विरभीनें पाहूं लागला, तों **नाना** त्याच्या दृष्टीस पडला. तेव्हां ) **महाराज**, हे दोघे ( नाना व सटवा ) आपणांस मारावयास आले होते. परंतु एकास मीं ठार केला आहे.

**महाराज**—( अत्यंत रागानें नोकर लोकांस उद्देशून ) अरे **गुलामानों**, बघतां काय ? त्या दुष्टाच्या मुसक्या बांधा.

( **दादा**, शास्त्री व कांहीं चाकर माणसें यांनीं **नानास** लाथा बुक्यांचा यथेच्छ मार देऊन त्याच्या मुसक्या **बांधून** त्यास चतुर्भूज केलें. )

## प्रवेश ९ वा.

**स्थल**—नगराबाहेरील एक विस्तीर्ण मैदान.

**पात्रें**—**महाराज, प्रधान, नाना, दादासाहेब, रामशास्त्री, हरबाराव, जिवबा, फत्तेसिंग उर्फ कन्हयालाल, संपतराव, राधाबाई, जमनाबाई, धाकटे-महाराज, रामभट, करीमखा, कृष्णंभट, नागरीक लोक** वगैरे.

( त्याच वेळे करितां मुद्दाम तयार केलेल्या सिंहासनावर **महाराज** छत्रचामरांसह विराजमान झालेले आहेत. **दादा-साहेबादि** मंत्री, महाराजां संनीध बसले आहेत. त्यांच्या सभोंवती नग्न तरवारी हातांत घेतलेले संत्री उभे आहेत. मैदाना सभोंवती नागरीक लोकांचे थवेच्याथवे जमले आहेत. एका बाजूस शस्त्रास्त्रांसह सैन्य उभें असून महाराजांच्या पाठी मागें हत्तीच्या अंबारींत **राणीसाहेब** चिकाचे पडदे लावून बसल्या आहेत. )

**प्रधान**—( मोठ्या नम्रतेनें महाराजांस मुजराकरून ) **महाराज, नानाला** आपल्या समोर आणण्याची आज्ञा होईल तर त्यास आणवितों.

**राजा**—हो हो, **प्रधानजी,** आणवा त्या दुष्टाला आमच्या समोर.

( प्रधानजीनीं त्या प्रमाणें हुकुम करतांच शिपाई लोकांनीं नानाला पुढें आणिला. )

( त्या वेळचा नानाचा पोषाख ह्मटला ह्मणजे त्याला एक लहान तुमान घालावयास दिली होती. त्या शिवाय त्याच्या आंगावर दूसरें वस्त्र नव्हतें. त्याच्या आंगावर व मस्तकावर अतीशय गुलाल अथवा तांबडारंग घातलेला असून त्याचे दोन्ही हस्त पाठीकडे बांधून टाकले होते. त्याच प्रमाणें त्याचा वध करण्यासाठीं दोन मारेकरी चकचकीत नग्न तरवारी घेऊन त्याच्या दोहों बाजूस उभे होते. )

**प्रधान**—( महाराजांकडे पहात उभाराहून ) **महाराज**, आतां सर्व तयारी आहे.

**राजा**—**प्रधानजी**, ( नानाकडे बोटकरून ) या दुष्ट **नान्यानें** जो अपराध केला आहे, व त्याबद्दल त्याजला आतां जी शिक्षा आह्मीं करीत आहों, त्या विषयीं नागरीक लोकांना जरी एकवार दवंडी पिटवून कळविलें आहे, तरी या वेळीं पुन्हां सांगा.

( प्रधान त्याप्रमाणें करतो. )

**नाना**—**प्रधानजी**, महाराजांच्या प्राणाचा नाश करण्याचा मीं कलरात्रीं प्रयत्न केला! काय ह्मणतां तरी काय हें !

**दादा**—अरे दुष्टा, अपराध करून सवरून पुन्हां कानावर हात ठेवतोस ! परंतु आतां तुला प्राणदान मिळावयाचें नाहीं. समजलास काय ?

**प्रधान**—**नाना**, तुह्मीं जो भयंकर अपराध केला आहे त्याबद्दल तुह्मांस आतांच शिक्षा होईल. यासाठीं तुह्मांस देवाचें नामस्मरण वगैरे थोडा वेळ करावयाचें असेल तर करा.

**नाना**—**प्रधानजी**, या राज्यांत काय हा अन्याय होत

आहे ! तो अपराध केला कोणी, व शिक्षा कोणास करीत आहां !

**राजा**—( रागानें ) दुष्टा, गप्प बैस. आह्मांस सर्व कांहीं माहीत आहे.

**नाना**—( इकडे तिकडे व सर्वत्र ठिकाणीं पाहून निराश होऊन ) **महाराज**, दुष्टानीं शेवटीं आपला डाव साधला ना ! वाः, काय हा न्याय आहे !

**दादा**—(मोठ्या रागाच्या आवेशानें ) चांडाळा, या नीतिमान् व न्यायी राज्यांत तुलाच तेव्हढे कोणेरे शत्रू उत्पन्न झाले ? गुलामा, नीचा, तुझें मरण अगदीं पाव घटकेवर आलें आहे तरि तूं बडबड करतोस काय ? ( असें ह्मणून आपल्या जाग्यावरून उठून व एक हात तरवारीस घालून ) दुष्टा, पुन्हां असें बोलशील तर तुझ्या जिव्हेचे तुकडे करून टाकीन.

**शास्त्री**—**दादासाहेब**, मरण काळ समीप आला ह्मणजे अशीच बडबड चालते. त्या नीचाच्या तोंडाला आपण काय लागतां !

**प्रधान**—**दादासाहेब**, **शास्त्रीबुवा** ह्मणतात असेंच माझें मत आहे. त्याच्यापाशीं बोलून आपली जिव्हा कशास विटाळवितां ?

**नाना**—( मोठ्या रागानें ) **प्रधानजी**, तुम्हीं, **दादासाहेब** व **शास्त्रीबुवा**, मला काय काय बोलत आहां तें मीं समजतों. ( नंतर दांत ओंठ खाऊन ) मी दुष्ट, चांडाळ व नीच आहें, किंवा कोण आहे, याविषयीं **महाराज** सरकारानीं जर चौकशी केली असती, तर काय तें ( सर्व नागरीक लोकांकडे बोट करून ) या सर्वांस समजलें असतें. परंतु काय करावें !

**नागरीकलोक**—खरें आहे, **नानासाहेब**.

**शास्त्री**—( आश्चर्यानें ) **प्रधानजी, महाराज** सरकारांस उशीर होत आहे !

**राजा**—( जरा रागानें ) **प्रधानजी !**

**प्रधान—आज्ञा सरकार.** ( नंतर नानाकडे वळून) **नाना**, तुम्हांस ईश्वराची प्रार्थना करावयास अर्ध घटका पेक्षां अधीक अवकाश मिळावयाचा नाहीं. ( नंतर मारेकऱ्यांकडे वळून ) **ग्यान्या**, अर्ध घटका होतांच ( नानाकडे बोटकरून) याचें शीर उडवून टाका.

**नाना**—( आंगावर कांटा येऊन ) बरें आहे **बाबा !** ( नंतर खालीं पाहून) हे **सच्चिदानंदा, प्रभो, विश्वपालका,** तुझी लीला अगाध आहे खरी ! **नारायणा**, काल सायंकाळीं **महाराज** सरकारचा मजवर केव्हढा लोभ होता! किती विश्वासानें ते मजपाशीं बोलत होते ! कोणी कसा व कितीही जरी माझा द्वेष करीत असला तरी महाराजांचा आपल्यावर लोभ आहे, तर त्यांच्यानें माझ्या बालाग्रालाही धक्का लागावयाचा नाहीं, असें मला वाटत होतेंनां ! परंतु एका रात्रींत काय हा चमत्कार घडला! **देवाधिदेवा**, मला आजपर्यंत थोडें तरी सूख व्हावयाचें होतें ! मातोश्री अल्प वयांतच निवर्तली. माझे वडील मला कांहीं लागून बोलले. तें मला न सहन होऊन मीं घरांतून निघून गेलों, तो आजपर्यंत त्यांना आपलें मूख ही दाखविलें नाहीं. ते आतां फार वृद्ध झाले आहेत, व माझ्या हातून महाराज सरकारची सेवा होत होती अशीच आणखीं कांहीं दिवस झाली असती म्हणजे मीं त्यांस भेटलों असतों. परंतु आतां "मीं तुमचा मुलगा", असें त्यांस सांगण्यास मला तोंड तरी आहे काय! हे **दयासागरा,** यांच्या या वयांत मीं त्यांच्या संनिध असून त्यांची सेवा

चाकरी करावी हा माझा धर्म, परंतु माझा कसा कर्म भोग आला आहे पहा! ( असें ह्मणून एक सारखा धाय धाय रडूं लागतो.)

**नागरीकलोक**—अरेरे, गरीब बिचारे बापलेक !

**नाना**— ( रडावयाचा थांबून ) नागरीक लोक हो, मी मोठा पातकी, घातकी, व खून करणारा आहें, असें तुह्मांस सहज वाटणार आहे. कारण जे आपणां सर्वांस आईबापा प्रमाणें व प्रत्यक्ष ईश्वराच्या ठिकाणीं, ज्यांची सुकीर्ती जिकडे तिकडे पसरली आहे, जे मोठे तरवार बहाद्दूर, पापभीरू, जगंनियंत्यास भिऊन वागणारे, ज्यांच्या पराक्रमा विषयीं अशी आख्या आहे कीं, ते आल्याचें समजतांच शत्रूनें पळ काढावा. ज्यांचें दातृत्व केवळ कर्णा प्रमाणें, ज्यांच्या हातून कोणाचा चुकून ही घात पात झाला तर आपली चूक कबूल करून हरतऱ्हेनें जे त्याचें शांतवन करणारे, ज्यांनीं थोडयाच दिवसा पूर्वीं पर्यंत आपल्या प्रजेचें पुत्र वत् पालन पोषण करून आपलें तन, मन, धन, त्या प्रीत्यर्थ अर्पण केलें होतें, ज्यांच्या पदरीं विचारी, शूर, न्यायी, निस्प्रह व सत्यानें वागणारे असे लोक होते, अशा आपल्या **महाराज सरकारच्या** राज्यांत मीं एकनिराश्रित, (नंतर मोठय आवेशानें) गरीब व महाराजांची नोकरी प्रामाणिकपणानें करणारा असतां अन्यायानें माझा असा वध होत आहेना ! सज्जन हो,माझा शिरच्छेद होत आहे, या विषयीं मला तिळप्राय ही दुख होत नाहीं. जें अनन्वित कृत्य मीं कधीं केलें नाहीं येव्हढेंच नव्हे, परंतु जें कर ण्याचें माझ्या स्वप्नींही नाहीं, असें कृत्य मीं केल्याचा आरोप मजवर आणून मला शिक्षा होत आहे, याचेंच मला मोठें दुःख होत आहे! त्यांतून माझी चौकशी करून मजवर गुन्ह्याची शाबिती झाली असती तर एक गोष्ट निराळी. परंतु तसें कांहीं एक

न करितां मजवर हा प्रसंग आला, तेव्हां याला काय ह्मणावें!

**नागरीकलोक**—( मोठ्यानें ) मग याची चौकशी करून काय तें करावें. न्यायाप्रमाणें आपलें काय तें व्हावें असें तो ह्मणत असतां, महाराज सरकार त्याचें कां बरें ऐकत नाहींत!

**प्रधान**--( दादा व शास्त्री यांच्या संमत्तानें ) सर्व लोकांस जाहीर व्हावें कीं ( नानाकडे बोट करून ) या **नानानें** एक दोन मारेकऱ्यांच्या साहाय्यानें महाराजांचा प्राणनाश करण्याचा केलेला प्रयत्न प्रत्यक्ष सरकारानीं पाहिल्यावर याची चौकशी ती काय होणें राहिली आहे !

**नाना**--**प्रधानजी**, तुम्हीं हें काय बोलतां ! महाराजांवर मीं शस्त्र उगारलें असें महाराजानीं पाहिलें काय ?

**प्रधान**--अलबत. व ह्मणून तर तुला ही शिक्षा होत आहे. ( नंतर रागानें ) खबरदार अधिक बोलशील तर.

**नाना**—( आपला अन्यायानें वध होत आहे असें मनांत येऊन ) **महाराज**, मीं आपल्यास पुनः पुन्हां खात्री पूर्वक सांगत असतां माझी दाद लागत नाहीं, हा मजवर ईश्वरी क्षोभ झाला आहे असें मीं समजतों. असो **महाराज**, मला आतां एका परमेश्वराशिवाय अन्य कोणाचा आश्रय नाहीं. ( असें ह्मणून इकडे तिकडे पुन्हां फार बारकाईनें न्याहाळून पाहून ) **शंकरा**, **कर्पुरगौरा**, **त्रिपुरारि**, हे **पार्वतीपते**, आजपर्यंत मीं तुझी एक निष्ठेनें पूजा केली, ती माझ्या हातून यथा सांग झाली नसेल, किंवा मला माहीत नाहीं अशीं माझ्याहातून कोटिशः पातकें घडलीं असतील, तर त्याची मला क्षमा करा. मीं आपल्यास अनन्यभावें करून शरण आलों आहें. ( असें ह्मणून रडूं लागतो. ) नंतर आणखीं एकवार सर्वत्र ठिकाणीं न्याहाळून पाहून ) हे **जगंनियंत्याप्रभो**, मीं तर

आतां जातों. परंतु माझे वडील—त्यांचें नाव कशास घेऊं ? कारण ते जरी मीं ओळखिले आहेत, तरी मी कोण हें त्यांस अद्याप माहीत नाहीं—असो, **नारायणा,** ( दुःखाचा मोठा हुंदका येऊन व मोठ्यानें रडावयास लागून ) माझ्या बाबांचा वृद्धाप काळीं चांगल्या प्रकारें प्रतिपाळ कर. मजबद्दल त्यांस दुःख न होवो व तुझ्या भजनीं त्यांचें चित्त सदा सर्वदा लागो, ही माझी आपणांस करद्वय जोडून प्रार्थना आहे. ( असें ह्मणून आणखीं रडूं लागतो. नंतर ) **प्रधानजी,** आतां हुकुम होऊंद्या. ( असें ह्मणून आपली मान खालीं घालून मरण्यास सिद्ध होतो, व मुखानें फार मोठ्यानें रामनामाचा जयघोष चालवितो. )

**प्रधान**—( मारेकऱ्यांस ) **घ्यान्या,** हं.

**मारेकरी**—( दोघेही नानाला मागें पुढें ओढून ) अर ए, गप्प बसकी ? ( नंतर त्याला मधोमध उभा करून त्याची मान जोरानें खालीं करून ते दोघे उंच जाग्यावर चढले व आपल्या तरवारी वर करून ) हं, संभाळ, संभाळ, संभाळ.

( असें ह्मणून ते शिरच्छेद करणार तों त्या विस्तीर्ण पटांगणांत चोंहोंकडून सुमारें दोन तीनशें लोक हातांत नग्न तरवारी घेऊन " थांबा, थांबा, थांबा. खबरदार माराल तर. तुम्हांस ठार करूं. " असें ओरडत आंत घुसले. त्यांत जे कांहीं घोडेस्वार होते त्यांतील दोन घोडेस्वार वधस्थानीं येऊन महाराजांस मोठ्या लीनतेनें मुजरे करून आपापल्या तरवारी बाहेर काढून सर्वत्रांकडे मोठ्या रागानें पहात परत आपल्या लोकांजवळ गेले. व त्या सर्वांस परत महाराज सरकारच्या समोर व वधस्थाना नजिक उभे करून त्यांतील एक घोड्यावरून खालीं उतरला व )

**एकस्वार**—( मोठ्या रागानें तमाम लोकांस उद्देशून )

**महाराज**, तुम्हां सर्व सज्जनांच्या समोर ( नानासाहेबांकडे बोट करून ) हा काय अन्याय चालला आहे! **नानासाहेब** म्हणजे कोण व त्यांची केव्हढी मोठी योग्यता आहे, हें जर तुम्हांस समजेल तर त्यांजवर आलेल्या या प्रसंगा विषयीं तुम्हांस वाईट वाटल्या शिवाय राहणार नाहीं. त्याच प्रमाणें आमच्या नानासाहेबानीं या तुमच्या महाराजांसाठीं जेजें म्हणून केलें आहे, तें जर तुम्हीं ऐकाल तर तुम्हांस अचंबा वाटेल. असो. ( असें म्हणून नानासाहेबांचे हातपाय सोडून त्यांस मोठ्या लीनतेनें व गहींवर येऊन नमन करिता झाला.)

**नाना**—(अत्यंत गहिंवर येऊन व त्यास कडकडून भेटून ) **कन्हयालाल**, शाबास, शाबास. तुम्हीं अगदीं वेळेवर येऊन पोंहोंचलां. शाबास, शाबास.

**कन्हया**—**नानासाहेब**, आपला मीं बंदा नोकर. त्यांत अशा वेळीं मीं न यावें !!

**नाना**—( हलुच ) **कन्हयालाल**, सर्व तयारी आहेना ?

**कन्हया**—होय **महाराज**. ( असें म्हणून रामभट व करीमखा यांची भेट करून देतो. )

**नाना**—( त्यांस मोठ्या प्रेमानें भेटून ) **रामभटजी**, शाबास. तुम्हीं सर्व प्रामाणिक खरे.

**कन्हया**—( मारेकऱ्यांस गचांडी देऊन) गुलामानों, आपल्या तरवारी खालीं ठेवा, नाहीं तर तुमचा शिरच्छेद केलाच म्हणून समजा.

**नाना**—( त्यावेळचा सर्व प्रसंग मनांत येऊन दुःखी होऊन ) ईश्वरा, तुझी लीला अगाध आहे खरी.

**राजा**—( अत्यंत आश्चर्यानें व बिस्मयानें इतर मंत्री मंडळा प्रमाणें तटस्थ बसला होता तो पूर्ण जागृत होऊन

रागानें ) **प्रधानजी**, आमच्या समक्ष ही काय दांडगाई चालली आहे ! सैन्यास हुकुम देऊन या सर्व बंडखोरांची एकदम कत्तल उडवून द्या. ( असें ह्मणून उठून आपल्या तरवारीस हात घालतो. )

**नाना**—( रडावयाचें बंद करून मोठ्या आवेशानें ) **महाराज**, मीं निरपराधी आहें, मला मुक्त करावें, अशी हा वेळ पर्यंत मीं आपली विनवणी केली. परंतु आपल्यास माझी दया आली नाहीं. असो, ईश्वराची मर्जी.

**राजा**—( अत्यंत रागानें व मोठ्यानें ) **प्रधानजी**, तुम्हीं ऐकत काय उभे राहिलां ? ( नंतर दादासाहेबांकडे वळून ) **दादासाहेब**, हा काय पुंडावा चालला आहे ! उठा व त्या सर्व बंडखोरांची खोड मोडा.

( प्रधान, दादासाहेब, शास्त्रीबुवा, हरबा, जिवबादी मंडळी आपापल्या तरवारी बाहेर काढून भीतभीत परंतु शौर्याच्या मोठ्या डौलानें ओरडत व सैन्यास हुकुम करीत पुढें येतात. तेव्हां )

**नाना—महाराज**, आपण असा हुकुम कृपा करून करूं नये. कारण तो कदाचित अमान्य होण्याचा संभव आहे.

**राजा**—( अत्यंत क्रोधायमान होऊन ) काय काय ! ( नंतर मंत्री मंडळाकडे वळून ) काय अमर्यादा ही ! तुमच्यानें यांचा बंदोबस्त होतो किंवा नाहीं ?

**नाना**—( जरा आवेशानें ) **महाराज**, मीं आपल्यास पुनः पुन्हां हात जोडून प्रार्थना करून सांगतों कीं या भरीस आपण पडूं नये. इतक्या उपर सरकारची मर्जी.

**राजा**—( सर्व मंत्र्यासह पुनः उठून व क्रोधाग्नीनें अगदीं लाल होऊन ) **नाना**, आम्हीं कोण हें तुम्हीं विसरलां काय ?

( असें ह्मणून प्रधान, दादासाहेब, सेनापती, शास्त्रीबुवा, हरबा व जिवबा वगैरे सरदारांस सैन्यासह बंडखोरांवर तुटून पडण्याचा हुकुम करतो. )

**कन्हयालाल**—महाराज, नानासाहेब हे मोठ्या नम्रतेनें आपली विनवणी करीत असतां तिकडे दुर्लक्ष करितां ह्मणून आपल्यास मला सांगणें भाग आहे कीं, आपलें सैन्य सुमारें चार घटका नानासाहेबांच्या किंवा आम्हां ( त्यांच्या हाताखालच्या ) कोणा एकाच्या बालाग्राला ही दुःख देणार नाहीं. तें सर्व, या मुदतींत तरी, नानासाहेबांचाच हुकुम मान्य करील. ( असें ह्मणून राज सैन्याकडे वळतो. तेव्हां सैन्यातील पुढारी )

**पुढारी**—कन्हयालाल महाराज, आम्हीं सर्व नानासाहेब जो हुकुम करतील तोच मान्य करूं. अन्य कोणाचा मान्य करणार नाहीं.

**प्रधान**—( पुढाऱ्यां पैकीं एकास ) **हंबीरराव**, तुम्हांस तुमच्या जिवाची आशा आहे किंवा नाहीं ?

**कन्हयालाल**—प्रधानजी, मीं वारंवार सांगत असतां तुह्मीं ऐकत नाहीं काय ? आतां काय चमत्कार होतो तो पहा. ( असें ह्मणून आपल्या बरोबर दहा बारा शिपाई घेऊन राजमंत्री मंडळावर जाऊन पडतो. व प्रधान, दादा व शास्त्री यांस चतुर्भुज करून महाराजांच्या पुढें उभेकरून महाराज सरकारांस मुजराकरून ) **महाराज**, ( चतुर्भुज केलेल्या मंत्र्यांकडे बोट करून ) ज्या वीराच्या आंगीं यांस सोडविण्याची शक्ती असेल त्यानें पुढें यावें.

( हें धाडसाचें कृत्य पाहून सर्व लोक अगदीं चपापून गेले. हत्तीच्या अंबारींतून एक मोठ्यानें आरोळी ऐकूं आली. महाराज अगदीं निराश व लज्जायमान होऊन आपल्या सिंहा-

सनावर धाडकन बसले. आपली आज्ञा आपल्या समक्ष उल्लंघन होऊन या बंडखोरांस प्रतिबंध करण्यास कोणीच पुढें सरसावत नाहीं असें पाहून त्यास मोठें दुःख झालें. तेव्हां )

**नाना**—( मोठ्यालीनतेनें महाराजांस व तमाम नागरीक लोकांस मुजरा करून ) **महाराज**, मीं आपल्यास पूर्वींच विनंती केली होती, परंतु आपल्यास ती नापसंत झाली. त्यास माझा काय उपाय! असो. आतां मीं आपलें सर्व वृत्त कथन करून एकंदरीनें मी कसा निष्कलंक आहें हें दाखवितों. महाराजांची खात्री झाली तर बरें. नाहीं पेक्षां ( मारेकऱ्यांकडे व आपल्या मानेकडे बोटकरून ) हे मारेकरी येथें तयार आहेतच. असो. **महाराज**, माझे वडील—त्यांचें नांव आतांच कशास सांगितलें पाहिजे—मला कांहीं टाकून बोलले, ह्मणून मीं जो अल्प वयांत वरांतून गेलों तो आजपर्यंत एका राज्यांत लहानशा शिपाया पासून तों आपल्या आशीर्वादानें बऱ्याच मोठया हुद्या पर्यंत वाढलों.

( इतक्यांत लोक समुदाया पैकीं एक )

**एकमनुष्य—महाराज**, नानासाहेब हे **श्वेतपुरींत** मोठे लोकप्रिय प्रधान आहेत. सांप्रत ते त्या राज्यांत नाहींत ह्मणून तेथें लोक फार हळहळत आहेत.

**लोकसमुदाय**— ( आनंदाश्चर्यानें ) होहो!! शाबास **नानासाहेब** ?

**नाना—महाराज**, माझे वडील वृद्ध झाले आहेत, हें मनांत येऊन सुमारें एक वर्षा पूर्वीं मीं घरीं परत यावयास निघालों. आपल्या या राजधानी पासून जवळच **अंबाबाईचें** वन आहे, त्यांत एका ओढ्यावर अस्तमानीं चाकरमाणसांसह आम्हीं वस्तीस उतरलों. घरीं केव्हां येईन व आपल्या वडीलसां

केव्हां भेटेन असें मला झालें होतें. यामुळें फल आहार झाल्यावर झोंप येईना ह्मणून मीं आपल्या डेऱ्याच्या बाहेर फिरत होतों. रात्र अंधारी असून तें अटव्यरान, यामुळें डेऱ्यापासून दूर जाण्यास मला धीर होईना. नंतर थोडावेळ तसाच फिरत होतों तों एकाएकीं तेथून जवळच एका निबीड झाडींतून एका मुलाची गतप्राणसमयाच्या वेळेसारखी किंकाळी ऐकूं आली. त्याच प्रमाणें त्या झाडींत उजेडही दिसूं लागला. तेव्हां कोणी मुलगा महत्संकटांत आहे असें मनांत
१ येऊन मीं त्या झाडी जवळ गेलों; व आंत पाहूं लागलों तों मशाली पेटविल्या आहेत, दहाबारा मारेकरी हातांत नग्न तरवारी घेऊन सभोंवार उभे असून त्यांच्या मध्यें एक मोठा तेजःपुंज, मनोहर, रूपानें केवळ मदनाचा पुतळा, व अल्पवयाचा होता तरी तेव्हढ्यावरूनच परिक्षा केली असतां मोठा शूर, असा एक राजपुत्र असून ते मारेकरी त्यास ठार मारीत आहेत, असा मोठा हृदयद्रावक देखावा माझ्या दृष्टीस पडला. **महाराज**, थोडी कल्पना करा! तो रात्रीचा समय. रात्र अंधारी. दहा बारा निशाचर आपल्यास मारावयास सिद्ध. अशावेळीं त्या राजबालकाची काय बरें स्थिती झाली असावी! त्या मारेकऱ्यां पैकींच ( करीमाकडे बोट करून ) हा एक प्रमुख होय. **महाराज**, ज्या दुष्टांनीं त्या गरीब व निरपराधी राजपुत्रास त्या यमस्वरूपी मारेकऱ्यांच्याहातून मारविण्याचा प्रयत्न करविला त्या चांडाळांस काय ह्मणावें! हे **प्रभो**, तुझ्या समक्ष अशीं अघोर कृत्यें व्हावीं आणि तूं त्या पातक्यांस कांहीं शासन करूं नये, हें तुला योग्यना! हाय हाय! **महाराज**, काय सांगावें! त्या वेळीं मजपाशीं

दहा बारा जवान नव्हते असें नाहीं; परंतु ते दूर असून त्यांस आणावयास अवकाश अगदींच नव्हता. **महाराज**, त्या वेळीं त्या मारेकऱ्यांच्या बोलण्यावरून त्या राजपुत्राचें नाव **धाकटे महाराज** होतें असें मला समजलें. ( हें ऐकतांच सर्व लोकांच्या, व विशेषें करून महाराजांच्या नेत्रांतून अश्रुधारा चालल्या. ) पुढें ते आपले पुत्र असें मला समजलें. ( नंतर सर्व लोकांस उद्देशून ) नागरीक लोक हो, त्या धाकट्यामहाराजांस ( बोटानें दाखवून ) या **करीमखा** जमादारानें त्या वेळीं लाथ मारली होती; ह्मणून एका वारानें ( बोटानें दाखवून ) हा त्याचा पाय त्यांनीं तोडला. अहाहा !! केव्हढें त्यांचें शौर्याचें तें कृत्य !!

( इतक्यांत )

**दादा व शास्त्री**—( एकदम ) **महाराज**, असा दुष्ट व चांडाळ जो **करीम** तो ( बोटानें दाखवून ) या **नानाचा** विश्वासू. यावरून **नानाची** काय योग्यता असावी हें **महाराजांच्या** सहज लक्षांत येणार आहे !

**करीम**—**महाराज**, मला व आणखीं दुसऱ्या दहा असामींस आपले **दादासाहेब** व **रामशास्त्री** यांनीं मोठ्या बक्षिसांच्या आशा लावून त्या निंद्य कर्मास प्रवृत्त केलें. **महाराज**, मला व माझ्या साथीदारांस त्या निंद्य, क्रूर व अमानुषीय कृत्या बद्दल अत्यंत वाईट वाटत आहे. (असें ह्मणून मोठ्यानें रडूं लागतो.)

**राजा**—( अत्यंत मोठ्यानें व एखाद्या मुला प्रमाणें रडावयास लागून ) हे **प्रभो**, माझ्या **धाकट्याचा** असा शेवट झालाना !!

**नाना**—आणि **महाराज**, आपल्यास **दादासाहेबां**-

नीं सांगून दिलें कीं त्यांचा अंत व्याघ्राच्या हातून झाला ह्मणून ! **महाराज**, आपल्या **धाकट्या महाराजांनीं** त्या वेळीं जो शोक केला, व परमेश्वराचा जो धांवा केला, तो ऐकून मला त्यावेळीं जें दुःख झालें तें माझ्यानें सांगवतही नाहीं. त्या मारेकऱ्यांचें ही हृदय विदारून गेलें असावें. हर हर! असा प्रसंग कोणावरही येऊं नये !.

**नागरीकलोक**—(अत्यंत दुःखानें व रागानें) **महाराज, दादा** व **शास्त्री** यांचीं शिरकमलें या वेळीं उडवून टाकण्याचा हुकूम व्हावा, व तो झालाच पाहिजे.

**करीम**—( नागरीक लोकांस उद्देशून ) अहो, **दादांस, दादासाहेब** म्हणा, नाहीं पेक्षां संभाळा. त्यांस राग येऊन त्यांनीं माझ्या घरादाराचें जसें वाटोळें करून माझ्या बायका मुलांस हद्दपार केलें, तशी तुमची व्यवस्था होईल. त्यांनून मीं त्यांच्या इच्छेनुरूप वागणारा बरें !

**नाना**—**महाराज, अंबाबाईच्या** वनांतील हा वृत्तांत झाल्यावर मीं बैराग्याच्या वेषानें **रामशास्त्री** व **जमनाबाईसाहेब** यांच्या घरीं जाऊन तीं कोणत्या प्रकारचीं मनुष्यें आहेत याची परिक्षा करून ठेविली. नंतर **राणीसाहे**बांची दासी **विठाई** इजकडे मोठा सरदार बनून गेलों. व जादू टोण्याची आपल्यास माहिती आहे, असें सांगून व कांहीं चमत्कार दाखवून तिला आपल्या मतास अनुकूळ करून घेतली. नंतर मीं तिच्या बहिणीचा मुलगा व ती माझी मावशी असें उभयतांमध्यें ठरून तिनें **राणी**साहेबांपाशीं माझी शिफ़ारस करून मला त्यांच्या तैनातीस ठेऊन दिलें. **महाराज**, माझा राजवाड्यामध्यें प्रवेश झाल्यावर आपल्या, **राणी**साहेबांच्या व **दादा**साहेबांच्या सर्व चाकर माणसांस मीं

अनुकूळ करून घेतलें. यामुळें जीं ह्मणून कांहीं खलबतें होत तीं सर्व मला कळत. **रामशास्त्री** यांजकडे **रामचंद्र राव** ह्मणून माझा एक जिवलग मित्र मीं ठेवून दिल्यामुळें तिकडीलही सर्व गुप्त गोष्टी मला कळत. असो. **पूर्णानंदस्वामीं**चा प्रसाद समारंभ ज्या दिवशीं झाला त्या दिवशीं रात्रीं **रामशास्त्र्यां**च्या मनांत **जमनाबाई** विषयीं कांहीं विकल्प येऊन त्या ज्या खोलींत निद्रिस्त होत्या त्याठिकाणीं अपरात्रीच्या समयास ते गेले. परंतु तेथेंही मीं अकस्मात जाऊन मोठया प्रसंगांतून **जमनाबाईची** मुक्तता केली. **महाराज, दादा**, आपले **प्रधानजी** व **रामशास्त्री**, यांचें एक मत असून त्यांनीं आपल्या राज्यांतील बहुतेक सर्व रूपवती स्त्रियांचें पातीव्रत्य हिरावून घेऊन कित्येक अल्पवयस्क मुलींचें कौमार्यत्व ही नष्ट केलें, याच्या स्पष्टीकरणार्थ त्यांनीं केलेल्या कांहीं ठळक ठळक गोष्टी निर्लज्जपणानें मला सांगणें भाग आहे. **महाराज**, आपल्या नगरींतील **मगनलाल** शेट सावकाराच्या स्त्रियेस **शास्त्रीबुवांनीं** कांहीं युक्ती लढवून आपल्या **दादासाहेबांकडे** अपरात्रीं आणिली. नंतर आपली पापवासना तृप्त करण्यासाठीं सामोपचारांची योजना लागू पडत नाहीं, असें पाहून त्या गरीब गाईवर हल्ला करण्याची तयारी होत होती, तों, मीं व माझे परम मित्र **कन्हयालाल** व दुसरे कांहीं, असे एकाएकीं **दादां**च्या खोलींत शिरून **दादा**साहेबांनीं त्या **मगनशेट**कडून त्याच रात्रीं शास्त्रीबुवांच्या द्वारें आणविलेले दोन लक्ष रुपये घेऊन त्या अबलेचें रक्षण करून यावेळीं तिजला येथें आणविली आहे. ती त्या हत्तीच्या अंबारींत आहे पहा. ( असें ह्मणून बोटानें दाखविलो. )

**नागरीकलोक**—( क्रोधायमान होऊन ) **दादासाहे-**

बांस सुळावर द्या, त्यांचे तुकडे तुकडे करा. महाराज, आपण त्यांस योग्य शिक्षा न कराल तर ती आम्हीं या वेळीं त्यांस आपल्या समक्ष करूं.

नाना—महाराज, आपल्या दादासाहेबांची इच्छा राजकन्या ताईसाहेब यांच्याशीं विवाह करण्याची असून आपणही त्या गोष्टीस रुकार दिलेला होता. राणीसाहेबां-चेंही त्यांस सहाय्य. मग काय विचारावें! त्यानीं ताईसाहेबां-स फार छळलें. पुढें ताई साहेबांनीं ती गोष्ट मला सांगून माझें साहाय्य मागितलें, व माझ्या हातून होईल तें करून मीं त्यांचें रक्षण केलें. महाराज, या वेळीं मी आपणांस हेंही सांगतों कीं त्यांची व माझी परस्परांवर बरीच प्रीती बसली आहे. असो. महाराज, परवां आपल्या राज्यांत जें बंड उत्पन्न झा-लें होतें तेंही आपले दादासाहेब व शास्त्रीबुवा यांनीं मुद्दाम उत्पन्न करविलें होतें. हें खरें किंवा खोटें या विषयीं खात्री व्हावी एतदर्थ त्या बंडवाल्यांसच आपल्या पुढें आणवितों. ) असें ह्मणून कन्हयालाल यास सांगून त्यांस पुढें आणवितो. नंतर त्यांनीं सर्व कबूल केल्यावर ) महाराज, दादासा-हेब व शास्त्री, यांनीं बंड उत्पन्न करून जिकडे तिकडे दंगा माजविला व आपल्या पदरच्या दोन विश्वासू व नीती-मान सज्जन गृहस्थांस, ह्मणजे न्यायाधीश व सेनापती, यांस कैद करून अटकेंत ठेवलें होतें. परंतु कांहीं तजविजीनें मीं त्यांसही येथें आणविले आहेत. महाराज, ते पहा.

( असें ह्मणून हातानें दाखवितो. )

आचार्य—( जरा जवळ येऊन मोठया नम्रतेनें ) महाराज, अपणांस आमचा विसर पडला हें आमचें दुर्भाग्य,

परंतु आह्मांस परमात्मा विसरला नाहीं. असें न ह्मणावें तर **नानासाहेबांस** आमची किंव कां येती !

**सेनापती—सरकार**, आह्मीं दोन्ही बी तुमास्नीं नकोसे झालों हय खरे, पण काय करावें! आह्मांस मरणबी येत न्हई ! ( असें ह्मणून गहींवर येऊन ) असो ! पण हें **नानासाब** ह्मंजे एक रत्न खरें. अहाहा ! (नंतर दुःखी होऊन) अहो, पण **नानासाब**, आमच्या **धाकट्या महाराजांस** त्या चांडाळांनीं कसें हो मारलें ! अरेरे ! त्यांचे हात हो त्या येळीं कसे न्हई तुटले ! ( असें ह्मणून रडूं लागतो. )

( सर्व लोकांसही अत्यंत दुःख होऊन त्यांच्या नेत्रांतून अश्रु गळतात. )

**नाना—महाराज, ताईसाहेबांस** आपल्या ताब्यांत पूर्ण पणें घ्यावें व **जमनाबाई साहेबांस** नाहींसें करून टाकावें या हेतूनें **कालिका** देवीच्या पुजाऱ्यास अनुकूल करून घेऊन देवीपुढें मोठा खड्डा खणवून **राणा**साहेब, **ताई**साहेब व **जमनाबाई** यांस शास्त्रीबुवा बराबर दर्शनास पाठवून **जमना**बाईस त्या खडयांत लोटून दिली. पुढें त्यांचाही वध करावा असा त्यांचा हेतू होता. परंतु मला हें वर्तमान समजलें असल्यामुळें मीं **जमना**बाईस आपल्या घरीं सुरक्षित नेऊन ठेवीली. **महाराज**, आपल्या **दादासाहेबांच्या** पराक्रमाचें आणखीं एकच्च उदाहरण सांगून हें त्यांचें रामायण पुरें करतों.

**महाराज**, आपले हेतू पूर्णपणें सिद्धीस जावे असें **दादासाहेब** व **रामशास्त्री** यांच्या मनांत होतें, ह्मणून आपल्या मनाची चलबिचल झालेली स्थिती पाहून त्या उभयतांनीं आपल्यावरच्च तरवार धरण्याचा बेत केला. **फत्तेसिंग** व **राम्या** यांस ती गोष्ट सांगितली. व त्या अतिनिंद्य, अघोर व महाक्रूर कामास **सदवा**

**व ग्यान्या** नांवाच्या दोन मारेकऱ्यांची योजना केली. हें वर्तमान मला समजलें असल्यामुळें **सटवा** यानें आपल्या हृदयांत बर्ची खुपसण्यासाठीं आपला हात वर केला होता, तों मीं त्या वेळीं तेथें एकाएकीं जाऊन **सटव्यास** खालीं पाडून तीच बर्ची त्याच्या हृदयांत खुपसली. ( हें ऐकतांच सर्व लोकांस मोठा आनंद व आश्चर्य वाटलें. )नंतर मीं आपणांस हांका मारिल्या व ओरडा आरड झाली यामुळें राजवाड्यांतील सर्वत्र जमा झाले; व त्या गडबडीच्या संधीमध्यें आपला खून करण्याच्या इरायानें मारेकऱ्यांसह मींच हा प्रयत्न केला असें उठवून **सटवा** यास आपण मारला असें **दादासाहेबांनीं** आपणांस जाहीर केलें. आपणांस तें खरें वाटून मजवर हा प्रसंग आला आहे. **महाराज**, मी सांगत आहें हें खरें किंवा खोटें या विषयीं **ग्यान्या** मारेकरी आपणांस स्वतः सांगेल त्यावरून आपली खात्री होईल. ( असें ह्मणून कन्हयालाल यास ग्यान्यास आणावयास सांगतो. नंतर ग्यान्यानें येऊन त्याच प्रमाणें सांगितल्यावर )

**राजा**—( दांतओंठ चावून व अत्यंत क्रोधायमान होऊन दादास उद्देशून ) अरे चांडाळा ! काय तुझें अघोर कृत्य हें ! ( नंतर दुःखी होऊन ) हाय हाय ! काय माझी स्थिती ही ! मी राजा आणि मला ठार मारण्याचा प्रयत्न, ज्यांच्यावर मीं जिवापलीकडे प्रीती करीत आलों त्यांनीं करावा ना ! हरहर ! **नारायणा** ! ( असें ह्मणून मोठा दुःखी होतो. )

**नाना**—**महाराज**, मला आतां एक दोन गोष्टी सांगावयाच्या आहेत. त्या मीं मागाहून सांगेन. आधीं **रामशास्त्र्यां**विषयीं आमचे **रामभटजी** आपणांस कांहीं सांगतील तें आपण कृपा करून ऐकून घ्यावें. (असें ह्मणून रामभटजीस हाक मारतो.)

**रामभट**—( पुढें येऊन सर्वांस मुजरा करून ) **महा**

**राज**, **संपतराव** सेनापती आपले श्वशूर, यांच्या घरीं आपले हल्लींचे न्यायाधीश वेदशास्त्र संपन्न शून्य उर्फ **रामशास्त्री**, हे देवपूजा करावयास होते. हे शून्य शास्त्री अत्यंत दुष्ट व नीच मनाचे असल्यामुळें, त्यांच्या मनांत पापवासना उत्पन्न होऊन त्यांनीं दुसऱ्या कांहीं नीच मनुष्यांच्या आश्रयानें **धवलपूरच्या** प्रधानाची ओळख करून घेऊन त्यांसही नीच कामास प्रवृत्त केलें. प्रधानजींनीं **संपतरावांस** कैद करून बंदीत टाकलें, व या शून्यशास्त्र्यांचा तपास चालविला. परंतु हे अट्टल शास्त्री, संपतरावांच्या स्त्रीस व मुलीस घेऊन जे पळाले ते एका क्षुद्र खेडेगांवीं गेले. तेथें त्यांनीं **राधाबाई**चा जो छल केला तो त्या स्वमुखानें सांगतां ऐकल्यावर हृदय अगदीं फाटून जातें. थोडक्यांत इतकेंच सांगतों कीं **राधाबाई** ह्या आपल्या इच्छेनुरूप वागत नाहींत असें पाहून, त्यांस पुष्कळ मारहाण करून व त्यांस अगदीं निर्धन करून संपतरावांच्या मुलीस घेऊन तेथूनही पलायन केलें. नंतर पुढें ती मुलगी त्यांनीं आपल्या आश्रयास कशी आणून ठेविली वगैरे गोष्टी, **महाराज**, आपणांस माहीतच आहेत. हे शास्त्री केवळ अक्षर शत्रू असतां आपल्या पदरीं वैद्य राज बनले. नंतर ते न्यायाधीश झाले. यांनींच आपल्या प्रथम राणीसाहेब कैलासवासी झाल्यावर आपल्या द्वितीय विवाहाची खटपट करून तो जुळवून दिला. नंतर **दादासाहेब** हे आपले शालक ह्मणून त्यांचा स्तुतिपाठ गाऊन त्यांची पूर्ण प्रीती संपादन केली. **महाराज**, आपला द्वितीय विवाह झाल्यापासून आपल्या राज्यांत जीं जीं ह्मणून अनन्वीत कृत्यें घडलीं त्या सर्वांचे मूळ उत्पादक हेच राजेश्री. **महाराज**, आपल्या पदरीं दुसरे एक वैद्यराज होते, ते कोठें आहेत याची आपणांस दादही नाहीं. त्यांच्या गतभर्तृका एकुलत्या

एक कन्येस या चांडाळानें पळवून आपल्या घरीं आणून ठेविली. ( असें ह्मणून त्या प्रकरणीं घडलेल्या सर्व गोष्टी निवेदन केल्या. )

**राजा**—( अत्यंत दुःखी होऊन) अरेरे ! कोण कुठें आहे याचें मला स्मरणही होऊं नयेना ! **देवा** मला जिवंत तरी कशास ठेविलास ! या सर्व अघोर पातकाबद्दल मज शिवाय दुसरा कोण बरें जबाबदार आहे ! हे **सच्चिदानंदा**, मला देहांत प्रायश्चितच योग्य आहे! ( असें म्हणून ढळढळां रडूं लागतो. )

**नाना**—**महाराज**,मला ज्या एक दोन गोष्टी सांगावयाच्या आहेत त्यांतील एक गोष्ट ही, कीं माझे वडील आज येथें या वेळीं हजर आहेत. त्यांनीं मला ओळखी पर्यंत मीं कोण हें माझ्यानें सांगवत नाहीं. असो. **महाराज**,आपल्या प्रधानजींच्या नीच वर्तनाविषयीं आतां आपण थोडें बहुत ऐकिलेंच आहे. परंतु मला जें सांगावयाचें आहे तें ऐकण्यास मात्र आपण तयार व्हावें. **महाराज**, तें आपण ऐकल्यावर आपल्या मनाची काय स्थिति होईल हें माझ्यानें सांगवत नाहीं. व या मुळें तें आपणांस सांगूं ही नये असें वाटतें. परंतु दुर्जनांस त्यांच्या दुष्ट व नीच कृत्यां बद्दल शासन व्हावें, निदान ते तशा प्रकारचे आहेत असें जगास समजलें तरी पाहिजे, याच हेतूनें आपल्या प्रधानजी विषयीं मला कांहीं सांगणें भाग आहे. परंतु **महाराज**, मला आपली आज्ञा असावी.

**राजा**—**नाना**, तुह्मांस आमच्या राज्यांतील ज्या कोणा विषयीं जें कांहीं सांगावयाचें असेल तें खुशाल या वेळीं सांगा. त्या सर्व दुष्टांस शिक्षा दिल्या शिवाय आह्मीं येथून जात नाहीं.

**नाना**— **महाराज**, परंतु तें ऐकून आपल्या मनाची काय स्थिती होईल या विषयीं मोठी काळजी आहे.

**सर्वलोक**— कांहीं असो. तें काय तें सांगा.

**राजा**—**नाना**, माझ्या मनाची कशी ही स्थिती होवो तुह्मीं काय असेल तें सांगा. प्रधान झाला ह्मणून काय झालें. त्यालाही शिक्षा दिलीच पाहिजे.

**नाना**—**महाराज**, माझा तर शिरच्छेद आपण करवीतच आहां. मला माझ्या जिवाची बिलकूल काळजी नाहीं. असो, जें होणें असेल तें होईल. मीं तरी काय करावें ! ( असें ह्मणून कन्हयालाल याजला आपली पेटी आणावयास सांगून त्यांतील एकदोन पत्रें घेऊन तीं **महाराजांच्या** हातांत देतो. )

**राजा**— ( पत्रें घेऊन एकाग्रतेनें वाचीत असतां **नाना साहेब** वगैरे राजेसाहेबांकडे मोठया दक्षतेनें एकसारखे पहात होते तों एकाएकीं मोठयानें सुस्कारा टाकून ) हाय हाय, या पत्रावरून आमचा अवतार सर्व सरला ! **नारायणा**, काय माझी ही स्थिती! असें सर्व व्हावें ह्मणूनच मला जिवंत ठेविलें काय! असो माझ्या मागें कांहीं का होईना. परंतु **नाना साहेब**, तुमच्या वरील दोषारोप सर्व जाऊन तुह्मांस मीं दोष मुक्त केलें आहे. ( नंतर प्रधान, दादा व शास्त्री यांजकडे बोट करून ) या नीचांचा तुह्मीं याच ठिकाणीं वध करावा हा मी तुह्मांस हुकुम करीत आहें. **नानासाहेब**, तुमचा कांहीं एक अपराध नसतां आह्मीं तुह्मांस फार छळलें, याची आह्मांस क्षमा करा. ( नंतर सर्व लोकांस उद्देशून ) **महाराज**, माझ्या राज्यांत जे अनीतीचे प्रकार घडले त्या सर्वांस मूळ कारण मींच आहें. या साठीं मला देहांत शिक्षाच पाहिजे. ( असें ह्मणून

अत्यंत त्वेषानें आपली बर्ची काढून आपल्यास मारून घेण्या-साठीं आपला हात वर उचलला. )

( इतक्यांत एक तरुण मुलगा धांवत येऊन व त्यांचा हात धरून )

**मुलगा—महाराज, महाराज,** हें काय आपण करतां! ( असें ह्मणून त्यांच्या हातांतील बर्ची हिसकून घेऊन महाराजां च्या चरणीं अत्यंत प्रेमानें व नेत्रांवाटे आनंदाश्रू गाळीत नमन करिता झाला. )

**नाना**—( जवळ जाऊन ) **महाराज,** हे आपले **धाकटे** महाराज आले आहेत त्यांच्याकडे बघा. **महाराज,** असे क्रोधायमान होऊं नका व आपल्या शूर व सद्गुणी धाकट्या महाराजांस जवळ घ्या. ( असें ह्मणून मोठ्या गहींवरानें तेही महाराजांच्या चरणीं नमन करिते झाले. )

( त्या वेळीं सर्वत्रांच्या नेत्रांतून आनंदाश्रु टपटप गळूंलागले. )

**संपतराव**—( महाराजांसंनिध येऊन ) **महाराज,** मीं **संपतराव** आलों आहें, मजकडे पहावें !

**राजा**—( शुद्धिवर येऊन ढळढळां रडावयास लागून व धाकट्या महाराजांस उठवून व कडकडून भेटून ) **परमेश्वरा,** वाघानें ठार केलेला आमचा हा **धाकटा** माझ्या पुढें मला दिसत आहे, हा काय चमत्कार आहे! मीं जागृतावस्थेंत आहें किंवा स्वप्नावस्थेंत आहें! ( नंतर धाकट्या महाराजांस स्फुंदत स्फुंदत एखाद्या वेड्या सारखें कुरवाळून ) **बाबा,** मीं तुला अगदींच विसरून गेलों ! मीं कोण, करतों काय, इकडे मीं अगदींच दुर्लक्ष केलें, याची मला परमेश्वर कशी क्षमा करील ती करो !

**राजपुत्र—महाराज,** आपला **धाकटा** तो मींच.

मला या ( नाना व कन्हयालाल यांजकडे बोट करून ) **नानासाहेब** व **कन्हयालाल** यांनीं प्राणदान दिलें आहे. आपण माझे वडील, परंतु यांनीं मला प्राणदान देऊन आज वर्षभर पुत्रवत् पालन केलें. यासाठीं या उभयतांचे मजवर जे उपकार झाले आहेत ते मीं कधीं ही फेडूं शकणार नाहीं. ( असें म्हणून त्यांस कडकडून भेटतो. )

**कन्हयालाल**—( गहींवरून प्रेमाश्रु टाकीत ) **धाकटे महाराज**, आपण सेनापतींस भेटलां काय ?

**राजपुत्र**—( जवळच ते उभे होते त्यांच्या संनिध जाऊन व त्यांस मोठ्या प्रेमानें नमन करून ) **सेनापती साहेब; दादासाहेब** व **शास्त्रीबुवा** यांनीं माझा वध करण्या विषयीं जो भगीरथ प्रयत्न केला होता तो, हे आपले चिरंजीव **जयसिंगराव** उर्फ **नानासाहेब** व आपण मुद्दाम माझ्या शोधार्थ पाठविलेले हे **कन्हयालाल**, यांनीं सिद्धीस जाऊं दिला नाहीं.

**नाना**—( धांवत जाऊन मोठा दुःखी होऊन सेनापतींच्या चरणीं लीन होऊन ) **बाबा बाबा**, मीं आपला उनाड **जयसिंगराव**, मजला माझ्या अपराधांची क्षमा करावी.

**सेनापती**—( अत्यानंदानें गहींवरून व ढळढळां रडत व स्फुंदत स्फुंत ) **जयसिंगा**, बा, तूं इतके दीस कुठें र होतास ! बाळा, मी एकटा, तुझी आठवण करून करून अगदीं मरावयास टेंकलों आहें पहा ! ( असें म्हणून वेड्या सारखा त्यास कडकडून भेटून ) बाबा ( नंतर आपलें दुःख किंचित आवरून ) तूं **धाकट्या महाराजां**ची सेवा केलीस त्याच्या मंदी अधिक काय केलेंस ? आपुन त्यांचें अन्नच खातों

मग चाकरी कराया नग ? ( असें म्हणून त्यास पुन्हां आलिंगन देतो. )

**लोक**—शाबास, जयसिंगराव, शाबास. जयसिंगराव, शाबास. धाकट्या महाराजांचा जयजयकार होवो. ( असा आनंदानें मोठा गजर करून दिला. )

**राजा**—( संपतरावांस लीनतेनें नमन करून व रडावयास लागून ) **संपतराव**, मी मोठा अपराधी आहें, मला क्षमा करावी ! ( नंतर सेनापती व आचार्य यांजकडे वळून ) **आचार्य**, मीं जीं पातकें केलीं त्या बद्दल मला जें शासन आपण सांगाल तें मला कबूल आहे.

**आचार्य**—**महाराज**, होणाऱ्या गोष्टीस उपाय नाहीं. असो ! ( नंतर नानासाहेबांकडे बोट करून ) आपण यांस प्रधानाचीं वस्त्रें देऊन धाकट्या महाराजांस गादीवर बसवावें, व आपण, **संपतराव** व आम्हीं दोघे ( मीं व सेनापती ) असे ईश्वरोपासनेंत कालक्षेप करूं.

**राजा**—**आचार्य**, आपण सुचविलेली गोष्ट मला सर्वथैव मान्य आहे.

**राजपुत्र**—( मोठ्या नम्रतेनें व आनंदीमुद्रेनें ) **महाराज**, आपल्या चरणीं माझी एक विनंती आहे.

**राजा**—काय ती बोल, **बाळा** ?

**राजपुत्र**— **नानासाहेबांस**, आपण जामात करावें.

**राजा**—( आनंदानें) **बाळा**, मोठ्या हौसेनें आपण त्या उभयतांचें लग्न करून देऊं बरें. ( नंतर नानासाहेबांनीं महाराजांची व ताई साहेबांची, राधाबाई व जमनाबाई यांची भेट करून दिली. )

( नंतर **ताईसाहेबांस** दुःख युक्त प्रेमालिंगन देऊन

**राधाबाई** व **जमनाबाई** यांच्याशीं अनूक्रमें पश्चात्ताप युक्त असें भाषण करून रडूं लागतो. )

**सेनापती**—( प्रधानादि त्रिवर्गांकडे बोटकरून व दयार्द्र अंतःकरणानें ) **महाराज**, आपण यांस कांहीं कमी शिक्षा न्हईंका करीत ? न्हाऊंद्याकी ते, आपलें काय करत्याती ?

**नाना**—**महाराज** सरकारांस हात जोडून माझी हीच प्रार्थना आहे. **महाराज**, माझ्या मनांत या त्रिवर्गांचा शिरच्छेद न करितां त्यांस प्रतिबंधांत ठेवावें असें आहे. कारण शिरच्छेद केल्यानें त्यांच्या दुष्टकृत्यांबद्दल त्यांना पश्चात्ताप व्हावयाचा नाहीं. व तसें न झालें तर अशी शिक्षा देण्याचा हेतु निर्फळ होतो. देहांत शिक्षा दिल्या मुळें अपराध्यांस पश्चात्तापानें आपलें वर्तन सुधारण्यास अवकाश मिळत नाहीं, व या शिक्षेचा कडकपणा लोकांच्याही मनांतून लवकर निघून जातो. यामुळेंच अशा प्रकारची शिक्षा देण्यांत येत असतां अपराधांची संख्या कमी होत नाहीं. या गोष्टी मनांत आणून, **महाराज**, आपण त्यांजवर दया करावी अशी माझी पुनःपुन्हां प्रार्थना आहे.

**आचार्य**—( सानंदाश्चर्यानें ) **महाराज**, **नाना** साहेबांचे विचार अत्यंत पोक्त व ग्राह्य आहेत. वहावा, वाः ! केव्हढें हें औदार्य !

( इतक्यांत कन्हयालाल करिमासह भरधांव घोडे टाकून निघून जातो. )

**राजा**—( सानंदाश्चर्यानें व अत्यंत गहिंवरून ) **आचार्य**, ज्यानीं मोठ्या शौर्यानें आमच्या **धाकट्या महाराजांचे** प्राणरक्षण केले, मोठ्या युक्तीनें राजवाड्यांत प्रवेश केला, सर्व नागरिकलोकांची प्रिती संपादन

केली, मोठ्या शौर्यानें व कारस्थान रचून मांडलिकराजांस जिंकिलें, मोठ्या भगिरथ प्रयत्नानें आमच्या **ताई साहेबांचें** व **जमनाचें** रक्षण केलें, **मगनशेटच्या** स्त्रीचें व **वैद्य-राजांच्या** कन्येचें पातिव्रत्य रक्षिलें, नुक्तेंच उत्पन्न झालेलें बंड मोडून टाकिलें, आमचे प्राणही ज्यानीं मोठ्या शौर्या-नें रक्षिले, आमचा व आमच्या राज्याचा उत्कर्ष होण्या विषयीं ज्यांनीं अत्यंत कळकळ दाखविली व इतकेंही करून जे स्वतः अत्यंत नीतीनें राहिले, अशा महान थोर व गुणवान पुरुषाचे असेच उत्तम विचार असावयाचे व ते कोण बरें अमान्य करील ? (नंतर सेनापतीकडे मोठ्या आनंदानें वळून) **सेनापती**, तुह्मीं मोठे पुण्यवान ह्मणूनच तुम्हांस असा सद्गुणी पुत्र मिळाला.

**सेनापती**—( फारच गहिंवरून व आनंदाश्रु टाकीत ) **महाराज**, हा सर्व आपल्या पुण्याईचा प्रताप आहे. मीं काय आपला गांवढळ !

**राजा**—**नानासाहेब**, तुमचे विचारमोठे थोर असून ग्राह्य आहेत. यासाठीं तुह्मीं आपल्या इच्छेनुरूप तजवीज ठेवा. ( नंतर त्यांस जवळ बलावून अत्यंतत्वेषानें कानांत कांहीं सांगतात. )

**नाना**—**महाराज**, आपण सांगतां त्याप्रमाणें करणें आपल्यास फारच अनुचित व आपल्या योग्यतेस कमीप-णा आणणारें आहे. यासाठीं त्यांच्या योग्यतेस यत् किंचि-तही धक्का न लावतां कायती व्यवस्था सरकारच्या संमत्तीनेंच मी करीन.

**आचार्य**—**महाराजां**चा जयजयकार होवो. **महा-राज**, **धाकटेमहाराज** सुरक्षित राहिले या बद्दल परमेश्वरा-

चे तर आभार मानिलेच पाहिजेत, परंतु त्या बद्दल आपल्या सर्व राजधानींत आनंदोत्सव झाला पाहिजे.

**राजा**—( आचार्य, सेनापती व सर्व लोकांस उद्देशून ) आमच्या राज्यांत जे पापाचार घडले, याचें कारण मुख्यत्वें करून मींच आहें. **महाराज**, मीं आपलें सदाचरण सोडून दिलें, बाईल बुध्या व हलक्या कानाचा झालों, त्याचें हें योग्य बक्षिस मला मिळालें. सदाचरणाला पराङ्मुख झालें असतां काय परिणाम होतात, नीतीनें वागलें असतां काय बक्षिस मिळतें, हें सर्वांच्या नजरेस स्पष्ट रीतीनें आलें आहे. आह्मीं आतां इश्वरोपासनेंत आपलें आयुष्य घालविणार. आह्मीं आपला सर्व राज्यकारभार **धाकटे महाराज** व **नानासाहेब** यांजवर सोंपविला आहे. **दादा, प्रधान** व **शास्त्री** यांस योग्य शिक्षा व्हावी. **कन्हयालाल** यांस सेनापतीचीं वस्त्रें देऊन **रामभट करीमखा** वगैरे इतर सर्वांस त्यांच्या योग्यतेनुरूप बक्षिसें देण्यांत यावीं. ( नंतर सर्वत्रांस मोठ्या लीनतेनें मुजरा करून व अत्यंत गहिंवरून ) यापुढें **धाकटे महाराज**, हे तुमचे राजे आहेत. ते तुम्हांस प्रियकर होवोत ! ( असें ह्मणून खालीं पहात स्तब्ध राहिला. )

( हें ऐकून सर्व लोकांनीं आपल्यास झालेला आनंद अती मोठ्या गर्जनेनें दर्शवून व त्या वेळीं कन्हयालाल यानीं आणून वाटिलेलीं पुष्पें **राजा, राजपुत्र आचार्य, सेनापती, नाना साहेब, कन्हयालाल**, वगैरे मंडळीवर अत्यानंदानें उडवून धाकट्या महाराजांचा जयजयकार करीत ते सर्व निघून जातात.)

**अंक ८ वा समाप्त.**

---

समाप्त.